*आंतरभारतीय पुस्तकमाला*

# मराठी लघुकथा

संपादक

**भालचंद्र फडके**





**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

प्रकाशकाने ह्या संग्रहातील कथांचे हक्कदार/त्यांचे वारस ह्यांच्याशी संपर्क साधून त्यांची सुयोग्य परवानगी मिळविण्याचा वारंवार प्रयत्न करुनही पुस्तक छपाईस जातेवेळी यातील काहींची परवानगी मिळालेली नाही. ह्याबाबत कुठलीही माहिती मिळाल्यास उपकृत होऊ.

ISBN 81-237-3644-4

2001 (शके 1923)



Original Marathi Title : *Marathi Laghukatha*

**रु. 65.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, ए-5, ग्रीन पार्क, नवी दिल्ली 110016 यांनी प्रकाशित केले.

# अनुक्रमणिका

# भूमिका

कथनप्रियता मानवी मनाची एक स्वाभाविक प्रवृत्ती आहे. अनादी कालापासून माणूस गोष्ट ऐकत आला आहे आणि सांगत आला आहे. आपण काय पाहिले, काय अनुभवले आणि आपल्याला काय वाटले ते दुसऱ्याला सांगावे ही अनिवार इच्छा माणसाला स्वस्थ बसू देत नाही. मानवाबरोबर गोष्टीचा जन्म झाला. गोष्टीने कालाच्या ओघात विविध रूपे धारण केली. तिला स्वतंत्र वाङ्मयप्रकार म्हणून प्रतिष्ठा लाभली ती इंग्रजी राजवटीत. गोष्ट, स्फुट गोष्ट, संपूर्ण गोष्ट, लघुकथा, नवकथा अशा ठळक टप्प्यांनी मराठी कथेची वाटचाल झाली आहे. अनेक वृत्त्यंतरे आणि स्थित्यंतरे घडून आली आणि आज मराठी कथा श्रीमंत आहे याचा अभिमान वाटतो.

इंग्रजी राजवटीच्या आरंभीच्या काळात गोष्ट मनोरंजनासाठी व उपदेश करण्यासाठी किंवा लोकोक्ती सिद्ध करण्यासाठी अवतरत होती. 'गोष्ट' हे एक वाचकांच्या मनावर एखादा नीतिपर विचार बिंबविण्याचे प्रभावी साधन आहे हे जाणून तिचा उपयोग स्वमत-प्रसारार्थ, ज्ञानप्रसारार्थ किंवा नीतिविचार प्रतिपादनार्थ करण्यात आला. गोष्ट भाषांतरित वा रूपांतरित असली तरी तिचे उद्दिष्ट बदलले नाही. इंग्रजी वाङ्मयाच्या परिशीलनाने गोष्टीच्या घाटात बदल होत चालला तरी या कालखंडातील गोष्ट घटनाप्रधान होती. रहस्यकथेशी नाते सांगणारी एखादी 'नवलकथा' वाचायला मिळे. बहुसंख्य गोष्टी बोधपर असत. त्यांचा तोंडवळा सारखाच असे.

हरी नारायण आपटे यांनी आपल्या साप्ताहिक 'करमणुकी'तून 'स्फुट गोष्टी' लिहिल्या. एका अर्थाने वाचकांना विश्वासात घेऊन चार सुखदुःखाच्या गोष्टी सांगण्याचे कार्य 'करमणुकी'ने तर केलेच पण 'पहिलेच भांडण', 'डिसपेप्शिया', 'काळ तर मोठा कठीण आला', 'दोन चित्रे' इत्यादी गोष्टींमुळे मराठी कथेचा शुभारंभ झाला असे म्हणता येईल. अद्‌भुतरम्यतेची सृष्टी सोडून कथा वास्तव-जगात आली. आपल्या भोवतालची कुटुंबे, त्यांत वावरणारे स्त्री-पुरुष, त्यांची सुखदुःखे यांचे हरिभाऊंनी आपल्या 'स्फुट गोष्टी'तून चित्रण केले. वाचकांची जाणीव ठेवणारी ही गोष्ट रंजनाबरोबर बोध करू पाहत होती. ही 'स्फुट गोष्ट' ऐसपैस होती. तिच्यातून व्यक्त होणारे जग पांढरपेशा ब्राह्मणांचे असले तरी या मर्यादित जगातल्या व्यक्तींचे 'माणूस' म्हणून चित्रण करण्याचा हरिभाऊंचा प्रयत्न होता.

'करमणूक' (1890) साप्ताहिकानंतर 'मासिक मनोरंजन' जवळ जवळ चार-पाच वर्षांतच सुरू झाले. (1895). आधुनिक मराठी लघुकथेची अग्रदूती असे म्हणता येईल अशी 'माझ्या मामाची एक वाईट खोड' ही कथा एप्रिल 1896 च्या 'मनोरंजना'त आली आणि

संपूर्ण गोष्ट लोकप्रिय केली. तिचा हेतू केवळ रंजन हाच होता. 'वाङ्मयवृक्षावरील प्रणयकथारूपी बांडगूळ' अशा शब्दांत या मासिकातून येणाऱ्या गोष्टींचा उपहासही झाला आहे. वाचकांच्या आनंदात भर घालण्यासाठी अवतरलेली संपूर्ण गोष्ट स्वप्नरंजन करू लागली. पाल्हाळ, पुनरुक्ती, अर्थशून्य तपशील, उपदेश, इत्यादी दोषांतून ती हळूहळू मुक्त होऊ लागली. तिचे वैशिष्ट्य म्हणजे ती 'श्रवणीय' होती. दोन घटका मनोरंजन करणाऱ्या 'गोष्टी' ची लघुकथा झाली. त्याचे श्रेय 'दिवाकर कृष्ण' आणि कॅ. लिमये यांच्या कथांना दिले पाहिजे.

1920-22 च्या आसपास कॅ. लिमये, दिवाकर कृष्ण यांनी गोष्ट 'श्रवणीय' होती ती 'वाचनीय' केली. जी मूलतः ऐकण्यासाठी होती ती वाचल्यावाचून तिच्यातील संपूर्ण रस आस्वादिता येईनासा झाला. तात्पर्य, स्वप्नरंजन, भावविवशता, उथळ करुणा, संकेत, जडभाषा अशा दोषांपासून मुक्त असलेली कथा कॅ. लिमये, दिवाकर कृष्ण यांनी लिहिली. गोष्ट केवळ सांगण्यासाठी नसून तिच्या ठिकाणी जीवनदर्शनाचे, व्यक्तिमनाचे दर्शन घडविण्याचे केवढे अफाट सामर्थ्य आहे ते 'मेकॅनो', 'किस्मत' (कॅ. गो. गं. लिमये), 'दंडकारण्यातील प्रणयिनी', 'मृणालिनीचे लावण्य' (दिवाकर कृष्ण), इत्यादी त्यांच्या कथांतून स्पष्ट झाले. लघुकथा म्हणजे अर्थपूर्ण अनुभवांचे कथात्म-रूप ही जाणीव या दोघांच्या लेखनातून स्पष्ट झाली. दिवाकर कृष्ण आणि कॅ. लिमये यांनी सातत्याने लेखन केले नाही त्यामुळे त्यांच्या कथालेखनाचा प्रभाव मराठी कथेवर फारसा झाला नाही.

1926 मध्ये 'रत्नाकर' मासिकाचा जन्म झाला आणि सर्वस्वी लघुकथेला वाहिलेले 'यशवंत' मासिक 1928 मध्ये सुरू झाले. किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, प्रतिभा, ज्योत्स्ना, पारिजात इत्यादी अनेक नियतकालिकांनी मराठी कथेच्या वाढीस हातभार लावला. कथेला तिचे असे स्वतंत्र स्थान आहे ही जाणीव ना. सी. फडके यांनी 'प्रतिभा साधना'तून स्पष्ट केली. शक्य तितक्या कमी पात्र प्रसंगांच्या साहाय्याने वाचकांच्या मनावर एकच एक संस्कार करण्यासाठी सांगितलेली गोष्ट म्हणजे लघुकथा अशी व्याख्या सर्वमान्य झाली ती याच काळात. 'जगातील पहिलं पाऊल', 'माणूस जगतो कशासाठी?', 'न्याय', 'वत्सला', 'मीरा', इत्यादी फडक्यांच्या कथांतून कथेच्या प्रसाधनांचे स्वरूप जाणवत गेले. त्यांची कथा रंजक आहे, कथानकप्रधान आहे आणि त्यांच्या कथेतील कथानक, आकर्षक आरंभ, गुंतागुंत, निरगाठ, उकल अशा अवस्थांतून विकसित होते. कधी कलाटणीवजा अखेर असते. 'योगायोगा'चा अधिक उपयोग करणारी फडक्यांची कथा 'अखेर' योजून लिहिलेली असते. फडक्यांना कथेतील अनुभवाच्या सामर्थ्यापेक्षा कथेच्या रचनेचे, निवेदनरितीचे महत्त्व वाटते. वि. स. खांडेकरांच्या कथालेखनामागची प्रेरणाच निराळी आहे. त्यांना कलेच्या द्वारे जीवनाची सेवा करण्याचे तत्त्व मान्य आहे. प्रणयाची मधुर स्वप्ने रेखाटणारी कथा लिहून प्रा. फडके लोकप्रिय झाले तसे ध्येयवादाचे चित्र रेखाटून वि. स. खांडेकर लोकप्रिय झाले. तसे पाहिले तर दोघांनी स्वप्नरंजन करणारी कथाच लिहिली. 'गार वारा', 'घरट्याबाहेर',

'देवदूत', 'जुना कोट', 'मुके प्रेम', इत्यादी त्यांच्या कथांतून कल्पनारम्य दृष्टीने रंगविलेले वास्तव जग आकारास येते. खांडेकरांच्या प्रकृतिधर्माला (Sensibility) साजेशी अशी त्यांची रूपककथा आहे. 'सागरा, अगस्ती आला', 'चकोर व चातक', 'फणसाचे काटे', इत्यादी त्यांच्या रूपककथा विचार व भावना यांचे उद्‌बोधन करण्यासाठी अवतरलेल्या आहेत. फडके-खांडेकर प्रणीत कथेचे अनुकरण करीतच मराठी कथा वाढली. पांढरपेशा मध्यमवर्गाची सुखदुःखे, त्यांच्या आशा-आकांक्षा, त्यांची स्वप्ने, त्यांचे पराभव चित्रित करण्यापलीकडे मराठी कथा अधिक काही करू शकली नाही. तंत्रप्राधान्याला विरोध करता करता य. गो. जोशी कथेविषयीच्या गैरसमजुतीच्या विळख्यात गवसले. त्यांच्या कथांतून सजीव होते ते पांढरपेशा मध्यमवर्गीय पुणेरी ब्राह्मणकुटुंबाचे जग! 'शेवग्याच्या शेंगा', 'पारिजातकाची फुले', 'कर्ज फिटले पण सावकार गमावला का?', 'धर्म ही अफू आहे', इत्यादी कथांतील त्यांच्या व्यक्ती, सात्त्विक, त्यागी, समंजस अशा आहेत. ती सारी 'देवमाणसे' आहेत. फुलांचा शेला पांघरून पारिजातकाचे झाड जसे डौलाने उभे असते तशी त्यांची कथा सद्‌विचारांचा, सद्‌भावनांचा सडा टाकीत उभी असते. या कालखंडातील कथा कुटुंबचित्रणातच रमलेली आहे. य. गो. जोश्यांच्या कथांतील अस्सल कौटुंबिक जिव्हाळा आणि त्यांच्या चित्रणात असलेला 'पुण्याचा गंध' वाचकाला आवडत होता. कुटुंबातील नवपरिणीत दांपत्याची बारीकसारीक रुसणी फुगणी वि. वि. बोकील रंगवीत होते तर दत्त रघुनाथ कवठेकर कुटुंबातील सोशीक, समंजस स्त्रीचे दुःख चित्रित करीत होते. कौटुंबिक जीवनाचे कवठेकरांचे चित्र उदारतेच्या रंगात रेखाटलेले आहे. 'अंध अंधारी बैसले', 'आई असती तर', 'मी लावते हं निरांजन', इत्यादी त्यांच्या कथांची मोहिनी भाबड्या वाचकांवर अधिक होती.

या कालखंडातील कथेचा प्रवास वेगवेगळ्या दिशेने झालेला दिसतो. गांधी, मार्क्स, फ्रॉइड यांच्या विचाराने प्रभावित झालेली ही लेखकमंडळी आपल्या कथांतून आपल्याला आवडलेल्या विचारांचे दर्शन घडवीत होती. एखाद्या विशिष्ट परिस्थितीत व्यक्ती कशी सापडते, कशी वागते आणि विशिष्ट परिस्थिती आणि व्यक्ती ह्यांचे आघात-प्रत्याघात कसे होतात त्यांचे चित्रण करण्याची रीत या कालखंडातील काही लेखक अवलंबू लागले. अनंत काणेकरांच्या 'काळी मेहुणी', 'मास्तरची मुलगी', 'कालप्रवाहाशी झुंज', इत्यादी कथा याच जातीच्या. कथेचे पात्र विशाल होत होते. 'सह्याद्रीच्या पायथ्याशी' या वि. स. सुखटणकरांच्या संग्रहातील कथांतून गोमंतकातील निसर्ग सौंदर्य, तेथील स्त्री-पुरुष आणि त्यांची सुख-दुःखे यांचे चित्रण घडत होते, ते मराठी कथेत नवे होते. ही वाट गवसल्यामुळे विशिष्ट प्रदेशाचे चित्रण करण्याच्या हौसेने कथालेखन करणाऱ्या लक्ष्मणराव सरदेसाई, वि. ल. बर्वे, गो. रा. दोडके, बी. रघुनाथ, इ. लेखकांचा नवा वर्ग उदयास आला. त्या त्या प्रदेशाचे रंग घेऊन आलेल्या स्त्री-पुरुषांचे दर्शन अनोखे होते तसेच त्या त्या पात्रांचे प्रदेशविशिष्ट बोलीतील संवादही वाचकांना आवडले. ग्रामीण वास्तवाचे दर्शन घडविणारी ग. ल. ठोकळ, र. वा. दिघेंसारख्या लेखकांची कथा वरवर आकर्षक वाटली तरी प्रवृत्तीने ती जुनीच होती. म्हणजे स्वप्नरंजन

करणारी, आदर्श पूजनात रमणारी अशी होती. आधी प्रेम, नंतर मामुली निराशा आणि पुनर्मिलन अशा ठरावीक पद्धतीने विकसित होणारी कथा लिहिण्याऐवजी कॅ. लिमये जीवन व्यवहारातील खुमासदार अनुभव सांगू लागले. पण खऱ्या अर्थाने विनोदी कथा लिहिली ती चिं. वि. जोशी यांनी. 'माझे दत्तक वडील', 'गुंड्याभाऊंचे दुखणे', 'सेकंडक्लासचा प्रवास', इत्यादी कथांतून त्यांनी माणसाच्या आचार-विचारांतील विसंगतींचे दर्शन घडविले आहे. आपल्या कथांतून त्यांना राजकीय, सामाजिक, धार्मिक, वाङ्मयीन व शैक्षणिक ढोंगे, दंभ, खुळे, अनृते आणि अन्याय यांच्यावर प्रकाश टाकावयाचा आहे. जीवनाकडे खेळकर दृष्टीने पाहणारे आचार्य प्र. के. अत्रे आपल्या कथांतून जी माणसे उभी करतात ती सारी व्यक्तिनमुने (Types) असतात. पी. जी. वुडहाऊसप्रमाणे अत्रे समाजातील अगदी सामान्य व्यक्तीच्या स्वभावाचे निरनिराळे नमुने विनोदी प्रसंगाच्या पार्श्वभूमीवर विशिष्ट तऱ्हेने रंगवितात. याची साक्ष देणाऱ्या कथा म्हणजे 'ब्रॅन्डीची बाटली', 'जांबुवंत दंतमंजन', 'फोटोग्राफर' इत्यादी होत. अत्र्यांची कथा व्यंगचित्रासारखी आहे.

या कालखंडात लेखिकांचा नवा वर्ग निर्माण झाला. 1925 पूर्वीच्या कालखंडात काशीताई कानिटकर, गिरिजाबाई केळकर, आनंदीबाई शिर्के यांनी कथालेखन केले होते. स्त्रीने आपली सुखदुःखे, आपल्या आकांक्षा आपल्या कथांतून अत्यंत मोकळेपणाने व्यक्त कराव्यात ही अपेक्षा पुरी झाली ती विभावरी शिरूरकरांच्या कथांमुळे. 1934 मध्ये 'कळ्यांचे निःश्वास' या संग्रहातून त्यांच्या ज्या कथा वाचनात आल्या त्यामुळे प्रौढ कुमारिकेच्या व्यथा कोणत्या, तरुण स्त्रीचा कोंडमारा कसा होतो, मिळवित्या मुलींसमोरील समस्या कोणत्या ते लक्षात आले. स्त्रीची कुचंबणा व तिच्या मनातील वादळे यांचे चित्रण करण्यासाठी कृष्णाबाई, कमलाबाई टिळक, पिरोज आनंदकर, कुमुदिनी प्रभावळकर, मालतीबाई दांडेकर, आनंदीबाई किर्लोस्कर इत्यादी कितीतरी लेखिका पांढरपेशा नवशिक्षित वर्गातून पुढे आलेल्या होत्या. त्यांचे लेखनादर्श आपटे-जोशी-फडके-खांडेकर असे लेखकच होते. त्यामुळे त्यांच्या कथालेखनाशी नाते सांगणारीच कथा त्यांनी लिहिली. या लेखिकांपेक्षा वेगळे सामर्थ्य प्रत्ययास येते ते कुसुमावती देशपांडे यांच्या कथा-लेखनात. 'मृगाचा पाऊस', 'चिमणी', 'गवताचे पाते' या आपल्या कथांतून त्यांनी आपल्या वाट्याला आलेली दुःखे निमूटपणे सहन करणाऱ्या पण आपले सत्व राखणाऱ्या व्यक्तींची काव्यात्म चित्रे रेखाटली आहेत.

मराठी कथेला आलेल्या साचेबंदपणातून तिला मुक्त करण्याचाच प्रयत्न य.गो.जोशी, कुसुमावती देशपांडे यांच्याप्रमाणे वामन चोरघडे यांनी केला. 1932 पासून त्यांनी कथा-लेखन केले. आरंभीच्या कथांनी वाचकांचे लक्ष वेधून घेतले. चोरघड्यांनी मराठी कथेला काही दिले असेल तर भावानुभवांची लयबद्ध रचना असलेली कथा. 'विहीर', 'घार', 'रात्रिरेवं व्यरंसीत्' इत्यादी त्यांच्या कथा क्षणचित्रासारख्या आहेत. ते चित्र कधी एखाद्या व्यक्तीचे असते, कधी एखाद्या भावस्थितीचे (mood) असते. जीवनात जे 'पाहिले', जे अनुभविले त्यातील 'दुःख' त्यांनी समर्थपणे आपल्या कथांतून रंगविले. दुःखचित्रणामुळे त्यांची कथा भावविवश होत नाही.

फडके-खांडेकरप्रणीत कथा या कालखंडातच बहरली. कादंबरी, नाटक, कविता ह्या वाङ्मयप्रकारांप्रमाणे लघुकथेला स्वतंत्र वाङ्मयीन प्रतिष्ठा लाभली. कथानक आणि स्वभावलेखन या दोन परिमाणांनी युक्त असलेल्या कथेला रंजनाची कांक्षा आहे आणि त्याबरोबर उद्‌बोधनाची. कथानक, व्यक्तिचित्रण, निवेदनपद्धती, वर्णनपद्धती, वातावरणनिर्मिती, संवाद, आरंभ-अखेरी अशांसारख्या कथेच्या विविध अंगोपांगांची नीटस जाणीव कथालेखकांच्या ठायी होती. तिच्या कथनपद्धतीत विविधता आली. मध्यमवर्गीय पांढरपेशा नवशिक्षितांचे विश्वच त्यातून प्राधान्याने व्यक्त झाले. कथेचा विस्तार होत होता तो 1935-36 नंतर मंदावत चालला.

दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभी मराठी कथेची जी रूपे आपल्यासमोर होती ती निर्जीव, निःसत्त्व वाटू लागली. कारण मराठी कथा तंत्राच्या, कृत्रिमतेच्या, कारागिरीच्या कृत्रिम चौकटीत जखडलेली होती. भावविवशतेच्या, चमत्कृतीच्या बंधनात गुरफटून गेली होती. तिला भडकपणाचा, आदर्शपूजनाचा, स्वप्नरंजनाचा हव्यास होता. आपला अवतार वाचकासाठी आहे. त्याच्या समोर प्रसाधन करून आले पाहिजे, त्याचे मनोविनोदन करणे, त्याला सत्प्रवृत्त करणे, त्याला एका कल्पनारम्य जगात नेऊन सुख देणे, त्याला दिलासा देणे, त्याला स्वप्नांची, आदर्शांची पूजा करावयास शिकविणे–यांसाठीच जणू आपले जीवित आहे असे मराठी कथा मानीत होती. दुसऱ्या महायुद्धानंतर ‘लघुकथा’ या वाङ्मयप्रकाराचे साधनरूप संपले. आपल्या स्वयंसिद्ध अशा रूपात अर्थपूर्ण अनुभवाला प्रकट होऊ देण्यातच खरोखर त्याची सार्थकता आहे या नव्या जाणिवेचा जन्म झाल्यामुळे कथा या वाङ्मयप्रकाराचा कायाकल्प आणि मनकल्पही घडून आला.

महायुद्धानंतर मराठी कथेचा विकास कितीतरी विविध दिशांनी झाला आहे. या विकासाला हातभार लावण्याचे श्रेय गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, दि.बा. मोकाशी, पु.भा. भावे, शांताराम, व्यंकटेश माडगूळकर, सदानंद रेगे, श्री.ज. जोशी. महादेवशास्त्री जोशी, वसुंधरा पटवर्धन, विजया राजाध्यक्ष, कमला देसाई, ज्ञानेश्वर नाडकर्णी, शंकर पाटील, द.मा. मिरासदार, ग.दि. माडगूळकर, दिलीप चित्रे, जी.ए. कुलकर्णी, विद्याधर पुंडलिक, शरच्चंद्र चिरमुले, चिं.त्र्यं. खानोलकर, ए.वि. जोशी, शंकरराव खरात, अण्णाभाऊ साठे, बाबुराव बागुल, जातेगावकर, रणजित देसाई, श्री. दा. पानवलकर, मधु मंगेश कर्णिक इत्यादी कितीतरी कथालेखकांना द्यावे लागेल.

1940 च्या सुमारास मराठी कथा स्वत्त्व गमावून बसते की काय असे वाटू लागले होते. फडके-खांडेकरादी लेखक तीच ती वळणे गिरवीत होते. निराळ्या दिशेने जाण्याचा प्रयत्न य.गो. जोशी, कुसुमावती देशपांडे, चोरघडे यांच्या कथेने केला. पण कोंडीत सापडलेल्या कथेला मुक्ती मिळू शकली नाही. चोरघडे, कुसुमावती इत्यादी कथालेखकांना कथाक्षेत्रातील आवर्त सांकेतिकता जाणवली होती. पण केवळ शैलीने वाङ्मयातील आवर्तांचा भेद करणे शक्य होत नाही.

या अवकळेची कारणमीमांसा करण्याचाही प्रयत्न झालेला आहे. महायुद्धामुळे जीवनमूल्यांची पडझड झाली, श्रद्धास्थाने कोसळली, माणसातला माणूस नष्ट झाला अशी भावना काही लेखकांच्या मनात होती. ज्या मध्यमवर्गातून विशेषतः मराठी कथालेखक पुढे येत होते त्या मध्यमवर्गाला चिंतेने घेरून टाकले होते, महागाईमुळे होरपळून टाकले होते, अनेक समस्यांनी हतबल करून सोडले होते. इतक्या झपाट्याने घडून येणाऱ्या परिवर्तनाचा अर्थ मराठी कथालेखकांच्या लक्षात येऊ शकला नाही. कारण ललित लेखक म्हणजे सुखस्वप्नांचा कारखानदार अशी वेडगळ समजूत उराशी कवटाळून बसलेला लेखक वास्तवाचे भान आणून देण्यास असमर्थ होता. 'काय' सांगावयाचे त्यापेक्षा 'कसे' सांगावयाचे हे अधिक महत्त्वाचे मानले गेले. प्रारंभ, उत्कर्ष आणि अखेरी साधण्याच्या प्रयत्नात त्याची कथा परिणामशून्य बनली.

एखाद्या कथेची श्रेष्ठता ठरवावी असा प्रयत्न केला गेला. कथेला या ना त्या कारणाने अवकळा आली आहे, कथेतून काही विशिष्ट आणि मर्यादित स्वरूपाचे अनुभव व्यक्त होत आहेत, कथालेखकांची संवेदनशीलता अश्मीभूत (fossilize) झाली आहे हे गाडगीळ, गोखले अशा लेखकांच्या लक्षात आले असावे. जीवनाचे अधिक भेदक, सूक्ष्म, प्रत्ययकारी आणि विविध पातळ्यांवरून जर दर्शन घडवावयाचे असेल, माणसाच्या मनाचे चित्र गोचर करावयाचे असेल, माणसा-माणसांतील संबंधांची, व्यक्तिजीवन व समाजजीवन ह्यांच्या अनेकविध संबंधांची अर्थपूर्णता व्यक्त करावयाची असेल तर कथेचे अंतर्बाह्य रूप बदलले पाहिजे हे त्यांच्या लक्षात आले असावे.

व्यक्तीचे बाह्यविश्व आणि अंतर्विश्व यांमध्ये एक अपरिहार्य नाते आहे आणि तिचे अनुभवविश्व स्वयंपूर्ण आहे ही फार महत्त्वाची जाणीव होय. यापूर्वी लेखक एखाद्या व्यक्तीची बाह्यकृती आणि त्या कृतीचे स्वरूप आपल्या कथेतून स्पष्ट करीत असे आणि तिला सुष्ट किंवा दुष्ट ठरवीत असे. एखादे पात्र सुष्ट किंवा दुष्ट आहे ते मनाशी पक्के ठरवून मग त्याची सुष्टता किंवा दुष्टता ज्यांतून स्पष्ट होईल अशा घटनांची साखळी गुंफावयाची ही तऱ्हाच अतिशय कृत्रिम आहे आणि या पद्धतीचा अवलंब प्रा. फडके आदी कथालेखक करीत असत. व्यक्तीकडे पाहण्याची ही दृष्टी फारच उथळ होती. वस्तुतः व्यक्तीच्या कृति-उक्तीमागे असलेल्या प्रेरक शक्तीचा शोध घेणे महत्त्वाचे आहे. पण फडकेप्रणीत कथेला हे महत्त्वाचे वाटले नाही.

प्रत्येक व्यक्ती हे एक गूढ असते. त्याच्या मनात परस्परविरुद्ध प्रवृत्ती नांदत असतात आणि हे लक्षात घेतल्याशिवाय कोणत्याही व्यक्तीचे खरेखुरे दर्शन घडविता येत नाही. एखाद्या घटनेच्या भोवऱ्यात सापडलेल्या व्यक्तीचे स्वभावविशेष आपल्या लक्षात येतात ते त्या व्यक्तीच्या कोणत्या क्रिया-प्रतिक्रिया दिसून आल्या, त्या तशाच का झाल्या याचा शोध घेतला म्हणूनच! जिचे मन मरगळले आहे आणि जिचे शरीर उत्सुक नाही आणि जिला एक प्रकारच्या किळसवाण्या कळेने घेरले आहे अशा 'मंजुळे' चे दर्शन अरविंद गोखले घडवतात तेव्हा त्यांनी तिचे स्वभावविशेष पक्के ठरविलेले नसतात. लोकलमधून

मरगळलेल्या माणसांच्या पुरात वाहत आलेल्या, दिवसभर चित्रविचित्र अनुभव पदरी बांधून आलेल्या मंजुळेच्या मनातील आंदोलने ते हलके हलके स्पष्ट करतात आणि त्यातूनच तिच्या बाह्यविश्वाबरोबर त्याच्या संबद्ध असलेल्या तिच्या उद्ध्वस्त अंतर्विश्वाची जाणीव होते. एखाद्या व्यक्तीच्या कृतीमध्ये जी विसंगती आहे असे आपल्याला वाटत असते त्यामागे असलेल्या संगतीचा शोध घेण्याचा प्रयत्न कथालेखनाला वेगळे परिमाण देऊ लागला. जी. ए. कुलकर्णी यांच्या 'अवशेष' या कथेतील लंगडा गोविंदाचार्य पहा. तसा तो कुणालाच आवडत नाही आणि आपणहून कोणी त्याच्याशी बोलत नाही. पण त्याला मुले फार आवडतात. 'आपल्या कुत्र्याच्या बावळ्या लेंडीप्रमाणे दिसणाऱ्या पोराचा त्याला सुपाएवढा अभिमान. त्याची बायको पालथे धंदे करून निघून जाते, पोरगं तडफडून प्राण सोडतं आणि मग कसरीनं खाल्यासारखं जीवनहीन आयुष्य तो जगत असतो. देवाचा कसला तरी शाप सावलीसारखा आयुष्यभर पाठलाग करीत असतो.' त्याचा शोध घेता घेता जी.ए. त्याच्या मनात दडून राहिलेल्या दुःखाला गोचर करतात. तो म्हणतो, 'बाकीची माणसं घर करतात, लग्न करतात, त्यांना मुलंबाळं होऊन सुख मिळतं म्हणून मीही लग्न केलं; पण आमचं साधलं नाही. मी देवापुढं नारळ फोडला. पण तो निघाला कुजका. कोण काय करणार सांगा?' नियतीसमोर माणूस हतबल ठरतो, अगतिक होतो, तरीही तो कसल्यातरी काडीचा आधार घेऊन जगत असतो हे या कथेतून जाणवते. याचा अर्थ 'व्यक्ती'च्या आकलनाची नवी जाणीव कथालेखनाच्या नव्या रूपामागे आहे हे लक्षात घ्यायला हवे. म्हणून तर ही नव्या घाटाची कथा व्यक्तिमनाच्या अधिक गुंतागुंतीवर, त्याच्या अनेकपदरीपणावर प्रकाश टाकू शकते.

नव्या कथेने बदल घडवून आणला तो 'कथानका' विषयीच्या संकल्पनेत. कथानकविरहित कथा म्हणजे नवकथा असा समज रूढ आहे, तो चुकीचा आहे. कथानक हे गणितातील प्रमेयासारखे नसते किंवा लहान मुले ठोकळ्यांची घरे बांधतात तसे रचलेले असते हे खरे नव्हे. प्रभाकर पाध्ये म्हणतात त्याप्रमाणे आजपर्यंत लेखक आपल्या कथानकाकडे स्थलकालावलंबी विकासाच्या रूढ कल्पनेने पाहात असत. एकामागून एक अशा स्थलकालानुक्रमाने घडलेल्या प्रसंगांच्या गुंफागुंफीने कथेची उभारणी होत असे (प्रतिमा-1 फेब्रु. 1935). मनोवेधक, वाचकांच्या अंतःकरणाला चटका लावणारे, हास्याचे फवारे उडविणारे, दिवाळीच्या आनंदात भर घालणारे कथानक रचावयाची पद्धती जुने लेखक अनुसरीत असत. वरवर पाहता क्षुद्र भासणाऱ्या जीवनांगावर नवी कथा आपले लक्ष केंद्रित करते आणि एखादी प्रकाशाची तिरीप जशी इवल्याशा भागाला दीप्तिमान करते तशी कथा अर्थपूर्ण वाटणाऱ्या जीवनांगाला उजळून टाकते. कथा व्यक्तिमनाचे किंवा व्यक्तीच्या एखाद्या भावस्थितीचे चित्र रेखाटते किंवा जीवनस्पंदनाचा आभास गोचर करते किंवा एखाद्या यःकश्चित भासणाऱ्या जीवनानुभवातील नाट्य रंगवते तेव्हा कथानकाच्या रूढ चौकटी झुगारून देणे कथेला अपरिहार्य वाटते. पेचप्रसंग,निरगाठ उकल अशा क्रमाने तिचा प्रवास अशक्य होतो. मुलाला सोळावे वर्ष लागले की त्याच्या मनात जे महत्त्वाचे फेरबदल घडून

येतात त्यांचे चित्रण करताना 'सतरावे वर्ष' कथेत पु,भा.भावे यांना कथानकाचा रूढ साचा मोडावा लागतो. मनात येणाऱ्या उडाणटप्पू आणि विक्षिप्त कल्पनांच्या मालिका चित्रण करताना (खरे सांगायचे म्हणजे) गाडगीळांना, ज्याला आपण कथानक–घटनांची स्थलकालाने बांधलेली आकृती-असे म्हणतो ते कथेला आवश्यक नाही अशी भूमिका पत्करावी लागते. कथा म्हणजे अर्थपूर्ण जीवनानुभव, तो कथात्म असतो. त्याचे एक केंद्र असते. या अनुभवावर कसलेही दडपण नसते. तो साधनभूत नसतो. वाचकांच्या मनावर परिणाम करण्यासाठी तो अवतरत नाही.

एकापुढे एक घटना मांडीत वाचकांची उत्कंठा सतत कायम ठेवून त्याला विस्मयाचा धक्का देण्याचे कार्य करणारी कथा कुतूहलपूर्तीनंतर संपत असे. आता कथा खऱ्या अर्थाने संपत नाही, किंबहुना संपल्यानंतर ती वाचकांच्या मनात सुरू होते. कथेने वाचकाला अंतर्मुख केलेले असते. तिचा स्वतःचा असा एक आकृतिबंध असतो. तिच्या निवेदनात एक अंगभूत क्रम असतो. निश्चित टप्प्याटप्प्यांतून पुढे सरकणारी जुनी कथा एकपदरी होती. नव्या कथेची वीण अनेकपदरी असते. कुणाला असे वाटते की या नव्या कथेत काही 'घडते' असे जाणवतच नाही.

जुन्या कथेतील कथानक एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूपर्यंत एका निश्चित आणि ठरविलेल्या मार्गाने पुढे सरकत असे. आदी, मध्य आणि अंत असे निश्चित टप्पे असलेली जुनी कथा सरळ रेषेत सरकते पण नवी कथा वर्तुळाकार फिरत राहते. रंग, रेषांमधून हळू हळू चित्र जसे निर्माण होते तसा कथेला आकार लाभतो.

जुन्या कथेपेक्षा नव्या कथेचे वेगळेपण जाणवते ते तिच्या भाषेमुळे. जुन्या कथेत भाषेचा उपयोग वर्णनात्मक रीतीने केला जाई. तर्कावर आधारलेल्या व्याकरणनिष्ठ भाषेची मोडतोड होणे अपरिहार्य होते. कारण माणसाच्या अंतर्विश्वाचे स्वरूप गोचर करण्याची शक्ती या भाषेत नव्हती. भाषेचा उपयोग नवा कथालेखक आशयसूचक (evocative) रीतीने करू लागला. त्याच्या कथेची भाषा 'प्रतिमां' ची होती. प्रतिमा जाणिवेतून प्रकट होते. ती नेणिवेतून स्फुरण घेऊन स्मृति-साहचर्य यांच्या आधारे जन्मलेली असते. अर्थाची एक स्फटिकभूत आकृती असे प्रतिमेचे रूप असले तरी कथेच्या वाहत्या ओघापासून तिला वेगळे अस्तित्व नसते. प्रतिमा या कथेतून व्यक्त होणाऱ्या अनुभवाचा अविभाज्य भाग असतात. 'तलावातील चांदणे' या कथेतील फुलांनी बहरलेली शेवगा,घडाच्या भाराने लवलेली केळ इत्यादी प्रतिमा भावानुभव कसा तोलून धरतात ते पाहण्यासारखे आहे.

शक्य तितक्या कमी पात्र - प्रसंगांच्या साहाय्याने वाचकांच्या मनावर एकच एक संस्कार करण्यासाठी फडकेप्रणीत कथेचा अवतार होता. त्यातून 'विशिष्ट' संस्कार करायला हवा या प्रेरणेमुळे कथा प्रयोजनवती झाली. तिला 'साधन' म्हणून स्थान लाभले. त्यामुळे जो लेखन करीत होता त्याने मानलेल्या श्रद्धा, त्याच्या निष्ठा, त्याचा ध्येयवाद त्याच्या लेखनातून प्रतिबिंबित होत गेला. पण दुसऱ्या महायुद्धानंतर श्रद्धा कोसळल्या, मूल्ये ढासळली. यंत्राकडे, विज्ञानाकडे आपल्या सुखसोयींचे, समृद्धीचे साधन म्हणून मानवी मन पाहत होते. पण

यंत्रशक्तीने विज्ञानाच्या संहारक सामर्थ्यामुळे मानवाला आपल्या दुर्बलतेची, अगतिकतेची, अर्थशून्यत्वाची जाणीव झाली. यंत्राने हात दिले पण हृदय काढून घेतले असे खांडेकर म्हणत ते खरेच होते. यंत्रशक्तीमुळे मानवाच्या सर्व व्यवहाराला यांत्रिकतेची कळा प्राप्त झाली आणि आपल्या व्यक्तिमत्त्वाचा लोप होत आहे हे त्याला जाणवले. 'मी एक मुंगी, ती एक मुंगी' अशा शब्दांत मर्ढेकरांनी ही नवी जाणीव व्यक्त केली आहे. जीवनातील श्रद्धांचे स्थानच लोपले आाणि मनुष्याला जीवघेणा रितेपणा जाणवू लागला.'जगायची पण सक्ती आहे, मरायची पण सक्ती आहे', अशा शब्दांत माणसाची व्यथा व्यक्त होऊ लागली. कशातच काही अर्थ नाही, ध्येयवादीवृत्ती, मांगल्य, निष्ठा हे सर्वच हास्यास्पद आहे, वात्सल्य, प्रेम, राग-लोभ, द्वेष सगळेच व्यर्थ आहे अशा जाणिवेने लेखकांचे मन विफलतेने ग्रासून गेले. 'कालचा अशांत मी, आजचा अशांत मी, उद्या तुझ्यामध्ये पाहतो उषा' अशा उद्‌गारात भविष्याबद्दल ओढ दिसते. पण ज्यांना जीवनाला आलेली यांत्रिकता, अवकळा जाणवली त्यांनी आपल्या कथालेखनातून मानवाचा एकाकीपणा, क्षुद्रपणा चित्रित केला. गंगाधर गाडगीळांना प्रामुख्याने जीवनाला आलेली अवकळा जाणवली होती. मर्ढेकरांनी जीवनाबद्दलची नवी जाणीव कवितेतून व्यक्त केली आणि गाडगीळांनी कथेतून अशीच नवी जाणीव मुखर केली. माणसा-माणसांतील दुराव्याची, विलगतेची, आपले अंतर्विश्व भंगले आहे याची जाणीव जी.ए.कथांतून व्यक्त करू पाहतात. म्हणजे एका दृष्टीने गाडगीळ, जी.ए. आदी नव्या घाटाची कथा लिहिणाऱ्या लेखकांना जे जीवन जाणवले त्या जीवनातले स्थैर्य, त्यातील व्यवस्था पार लोपलेली होती. याच्या उलट अरविंद गोखले, अनिरुद्ध पुनर्वसू, महादेवशास्त्री जोशी, इ. लेखक जीवनाला जरी अवकळा आली असली तरी माणसाने आपले माणूसपण टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे असे म्हणत राहतात. त्यांची मनोमन श्रद्धा आहे, की 'नव्रे श्रेय' गवसेल आणि अंधारातून प्रकाशाची वाट दिसेल. या कालखंडात लेखकांचा एक वर्ग असाही होता, की त्यांनी कठोर वास्तवाला सामोरे जाण्याऐवजी पलायनवादी भूमिका घेतली. अशा लेखकांचा दावा होता की, आपण वाचकांसाठी लिहितो.

म्हणून आपण मान्य करायला हवे, की महायुद्धोत्तर कालखंडात जिला नवकथा असे आपण म्हणतो ती कथा नव्या जाणिवेतून जन्मलेली होती आणि तिचा घाट नवा होता, विशिष्ट पोत लाभलेला तिचा आकृतिबंध होता. कार्यकारण शृंखलाबद्ध कथानक नसतानाही एखादी कथा वाचकांच्या मनात अर्थाची अनंत वलये निर्माण करू लागली. केवळ कुतूहलपूर्तीचा, उत्कंठातृप्तीचा, विस्मयाचा आनंद देण्यासाठी तिचा अवतार नव्हता. गतिमान, गुंतागुंतीच्या जीवनांगावर प्रकाशझोत टाकून जीवनाविषयी एक नवेच कुतूहल त्यांच्या मनात या नव्या कथेने उत्पन्न केले. अमुक एक विषय अगर अमुक एक प्रकारचा अनुभव कथेचा विषय होऊ शकतो ही समजूत चुकीची ठरली आणि अनेक प्रकारचे अनेक पातळ्यांवरचे अनुभव कथेचा विषय बनले. ज्या जीवनानुभवांकडे पाहण्याचे धैर्य लेखकांच्या ठिकाणी नव्हते त्या जीवनानुभवांकडे लेखक डोळे भरून पाहात आहे आणि त्यांचे मोठ्या धैर्याने दर्शन घडवीत आहे असे दृश्य या कालखंडात आपणास पाहावयास सापडते.

कृत्रिमता, भावविवशता, कल्पनारम्यता इत्यादी विविध बंधनांनी मराठी कथा निस्तेज झाली होती. तिला बंधमुक्त करून नवजीवन देण्याचे कार्य गाडगीळांच्या कथेनेच केले. त्यांची प्रयोगशील वृत्ती सतत ताजी टवटवीत राहिली. त्यामुळे दीर्घकाल लेखन करूनही त्यांच्या लेखनात तोच तोपणा आला नाही.

'मानसचित्रे' (1946) ते 'पाळणा' (1961) या कथासंग्रहापर्यंत त्यांच्या लेखनाचा प्रवास जर आपण पाहिला तर लक्षात येईल की, गाडगीळांच्या कथेने मराठी कथेला नवी दृष्टी दिली,नवे क्षेत्र उपलब्ध करून दिले. तसे त्यांनी आपल्या कथांतून मध्यमवर्गीय पांढरपेशा माणसांचे क्षुद्र विश्व, त्यांच्या किरट्या आशा-आकांक्षा, त्यांच्या प्रवृत्ती, त्यांची स्वप्ने चित्रित केली पण त्याचबरोबर माणसामाणसांतील संबंध, माणसाचे निर्सगाशी, विश्वाशी असलेले नाते, माणसाला खेळवीत राहाणाऱ्या नियतीची शक्ती इत्यादी मूलभूत प्रश्नांबद्दलची जाणीवही व्यक्त केली.

मर्ढेकरांच्या कवितेप्रमाणे त्यांच्या कथेने कथाक्षेत्रातील वातावरण विशुद्ध केले आणि यामुळे नव्या लेखकांना नव्या वाटा शोधता आल्या. कॅ. लिमये, दिवाकर कृष्ण यांच्यानंतर कथेचा अनेक दिशांनी विकास करण्याचे श्रेय गाडगीळांचेच.

महायुद्धोत्तर कालखंडातील मराठी कथेचे प्रमुख शिल्पकार म्हणून गंगाधर गाडगीळांचे स्थान जरी अनन्यसाधारण असले तरी त्यांचे सहप्रवासी म्हणता येतील अशा गोखले, भावे, माडगूळकर, शांताराम, मोकाशी इत्यादी कथालेखकांनी आपापल्या प्रकृतिधर्मानुसार कथालेखन करून मराठी कथा समृद्ध केली. प्रत्येक लेखकाचा प्रकृतिधर्म किंवा संवेदनस्वभाव निरनिराळा असतो. या संवेदन स्वभावाच्या गाभ्यातून कथा जीवनरस घेत असते. हाच गाभा त्या कथेला एक स्वतंत्र रूप, प्रसरणशक्ती, सर्वस्पर्शित्व आणि पारदर्शीपण देत असतो.

मराठी लेखक कुटुंबचित्रणात अधिक रंगतात. कुटुंबातील स्त्री-पुरुषांचे संबंध, त्यांच्यामधील ताण-तणाव यांचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न या कालखंडातील लेखकांनी केलेला आहे. नालायक नवऱ्याबरोबर संसार करण्याची पाळी आली म्हणून दुःखी होणारी आणि एक दिवस नवरा आणि मूल यांचे पाश तडातड तोडून टाकणारी 'तिचा नवरा' या कथेतील स्त्री, स्वतःला विसर म्हणजे सुखी होशील असा आईचा उपदेश कृतीत उतरविणारा 'स्वतःला विसर' या दि. बा. मोकाशी यांच्या कथेतील नायक ह्या व्यक्ती मध्यमवर्गीय कुटुंबातीलच आहेत. रेडिओवरची हकीकत आणि कुटुंबाची हकीकत यांच्यात एक तऱ्हेचा संबंध प्रस्थापित करण्याचा एक प्रयोग 'रेडिओची गोष्ट' या कथेत मोकाशी करून पाहतात तो लक्षणीय आहे पण एकूण महायुद्ध आणि महागाई यांच्यामुळे विविध चिंतांच्या अंधारात बुडून गेलेल्या कुटुंबात मोकाशी श्रद्धेचा, आशेचा 'लामणदिवा' लावण्याचा प्रयत्न करीत आहेत असे जाणवते. 'पांढरपेशांचे जग' चित्रित करणारे श्री.ज.जोशी 'सलमा' या कथेत तिच्या मनात निर्माण झालेल्या वेगळ्या जाणिवेचे (Consciousness) चित्रण करू पाहतात.'शांताराम' यांचाही पिंड परंपरागत कौटुंबिक संस्कार, मध्यमवर्गीय जीवनातील समाजविशिष्ट खाचाखोचा आणि या दोहोंनी जोपासलेल्या नेमस्त वृत्तीत अध्याहृत असलेले नीतिविषयक

तारतम्य या तीन परस्परपूरक वैशिष्ट्यांनी घडविला आहे असे ज्ञानेश्वर नाडकर्णी म्हणतात ते खरे आहे (छंद, वर्ष 6:1). 'शिरवा', 'नशा', 'वळण', इ. कथा लक्षात राहतात त्या त्यांच्या संथ आणि संयत निवेदनशैलीमुळे. प्रभाकर पाध्ये यांच्या कथांचा घाट थोडा निराळा आहे. कथेला काव्यात्म पातळीवर नेऊ शकेल अशी भाषा, जीवनाकडे पाहण्याचा गंभीर दृष्टिकोन अशा विशेषांमुळे त्यांची कथा चित्त वेधून घेते. त्यांना स्त्रीमनाचा वेध घ्यावासा वाटतो. पिंपळवृक्षाच्या वर्षभरातील चक्रनेमिक्रमाची आणि राधाबाईच्या भावजीवनाची अभंग जोड असल्याचे चित्रण 'पिंपळाचे झाड' या कथेतून त्यांनी अतिशय नाजूक शैलीने केले आहे. आपल्या भावविश्वातील सूक्ष्म पण सतत सलत राहणाऱ्या दुःखाचे ते चित्रण करतात. आपल्या अनुभवविश्वाच्या आगळेपणामुळे विविध थरांतील वाचकांचे लक्ष वेधून घेणारे सदानंद रेगे 'काळोखाची पिसे' या कथेत मृत्यूचे चित्रण उत्कटतेने करतात. रेग्यांच्या कथांतून भुतेखेते, चेटकिणी यांचा वावर अधिक. भुताखेतांची सृष्टी आणि मानवाचे विश्व यांच्या संबंधातून ते कथा कौशल्याने फुलवितात. वाचकांची करमणूक तर व्हावीच पण त्याबरोबर माणुसकीचा, सद्‌भावनांचा, सत्प्रवृत्तीचा ठसा त्याच्या मनावर उमटावा असा स्वच्छ हेतू ठेवून महादेवशास्त्री जोशी यांनी कथालेखन केले आहे. त्यांनी गोमंतकातील मध्यमवर्गीय कुटुंबातील स्त्री-पुरुषांची सुखदुःखे रंगविली. 'घररिघी', 'अत्र आणि परत्र','पर्जन्यकुंड', 'वैशाखवणवा', 'जगावेगळे सासर', इत्यादी कथा वाचताना अंगणात रांगोळी काढलेल्या, आंब्याच्या डहाळ्यांचे तोरण लावलेल्या प्रसन्न घरात आपण वावरतो आहोत असे वाटते. या सगळ्या लेखकांनी आपापल्या संवेदनस्वभावानुसार लक्षणीय कथालेखन केले असले तरी यांपैकी कुणीही गाडगीळांची उंची गाठू शकला नाही. या कालखंडातील स्त्रियांचे कथालेखन थोडे वेगळ्या दिशेने जाण्याचा प्रयत्न करीत होते. स्त्रिया स्त्रीजीवनातील समस्यांचे चित्रण करीत होत्या आणि स्त्रीच्या दुःखाचा शोध घेत होत्या. 'शोध' पासून 'प्रतिबिंब' पर्यंत वसुंधरा पटवर्धन यांचा लेखन प्रवास पाहिला तर आपल्या लक्षात येईल की, त्या सामान्य व्यक्तीत असामान्यत्व पाहत असाव्यात. पतीचे पाऊल वाकडे पडत आहे आणि तो दुसऱ्या स्त्रीशी लग्न करू इच्छीत आहे हे माहीत असूनही सरल आपल्या पतीच्या सेवेत खंड पडू देत नाही. (सरल). दुःख सोसणाऱ्या स्त्रियांच्या कथा लिहिण्यात त्या रंगतात. वसुंधराबाईप्रमाणे सरिता पदकी प्रौढ कुमारिकांचा एकाकीपणा कथांतून व्यक्त करतात, तर कधी त्यांना निपुत्रिकेची व्यथा रंगवायची असते किंवा हव्या असलेल्या पुरुषाकडून प्रतिसाद न मिळालेल्या स्त्रीचे दुःख चित्रित करायचे असते. शांता शेळके, शिरीष पै, सुधा नरवणे, सरोजिनी बाबर इत्यादी लेखिकांच्या कथा स्त्रीमनाची कहाणी सांगतात.

गाडगीळ-गोखले यांच्या कथांपेक्षा वेगळे जग गोचर करणारी कथा लिहिली ती व्यंकटेश माडगूळकरांनी. माडगूळकरांच्या पूर्वी 'ग्रामीण कथा' म्हणून मिरविणारी दिघे-ठोकळांची कथा खऱ्या अर्थाने ग्रामीण नव्हती. कारण शहरी मनाने शहरी दृष्टिकोनातून लिहिली ती एक रोमॅन्टिक, व्याजग्रामीण कथा होती. त्या नकली कथेतील माणसांचे नाते मातीशी नव्हते. त्या कथेतला परिसर ग्रामीण होता पण माणसे मात्र उपरी होती. व्यंकटेश माडगूळकर ही

माणदेशी मातीने मराठी कथावाङ्मयाला दिलेली अमोल देणगी आहे असे जे म्हटले जाते ते सर्वार्थाने खरे आहे.

माडगूळकरांची कथा माणदेशी माणसाची म्हणजे अखेरीस माणसांची कथा आहे. ऊन ऊन कालवणाप्रमाणे दारिद्र्य भुरकणारी माणसे, जीवन उजाड करून टाकणारे दुष्काळ, कलागती, अंतर्गत घटना, पाळीव कुत्री, मांजरे, जंगली जनावरे, रानपाखरे इत्यादींनी त्यांचे कथाविश्व नुसते गजबजलेले आहे. माडगूळकरांची कथा म्हणजे विश्वाची व्यथा!

माडगूळकरांच्या लेखनासंबंधी अरविन्द गोखल्यांनी म्हटले आहे की त्यांचे लेखन tame का वाटावे? त्यात violenceचे प्रमाण कमी का? याचे कारण तर असे असावे की, माडगूळकरांचे व्यक्तिमत्त्व 'संयत' असावे. ते कारुण्याने अंतर्मुख होतात. भडकपणाचा, प्रक्षोभाचा, नटवेपणाचा त्यांना 'सोस' नसावा. अपरिचित जीवनाविषयी लिहायचे म्हणून ते लिहीत नाहीत. ते सरळ-सरळ 'माणदेशी माती' या ओढीने लिहितात. त्यांच्या सर्व कथांतून या मातीचा गंध दरवळत राहतो. या कथांची भाषा अस्सल माणदेशी. ज्या 'ग्रामजीवना'ला ते गोचर करतात त्या जीवनाचीच भाषा ते योजतात. आता हे मात्र खरे की पात्रांचे संवाद बोलीतून आणि अन्य निवेदन मात्र 'पुस्तकी' मराठीतून केल्यामुळे थोडे खटकते.

शंकर पाटील यांची कथा वेगळ्याच जातीची आहे. त्यांची अनुभव घेण्याची आणि तो व्यक्त करण्याची तऱ्हाही निराळी आहे. त्यांचे लक्ष ग्रामीण परिसरातील एकाच व्यक्तीवर केंद्रित होत नाही तर ते वेगवेगळ्या नात्यांनी बांधलेल्या व्यक्तीच्या विविध भावसंबंधांचे चित्रण करतात म्हणजे एका अर्थाने ते कुटुंबकथा लिहितात. 'ऊन', 'भेटीगाठी', 'भार' इत्यादी कथा वाचीत असताना हे जाणवते.

शंकर पाटील यांची कथा अधिकाधिक प्रगल्भ होत गेलेली आहे. 'भुजंग' ही एक जातिवंत कथा. चोहोबाजूंनी कोंडीत सापडलेल्या जनाईचे बावरलेले मन पाटील अशा तऱ्हेने चित्रित करतात की वाचक जनाईच्या विश्वात पार मिळून जातो.

पाटील जीवनव्यवहाराकडे जसे गांभीर्याने पाहतात तसे ते मिस्कीलपणेही पाहतात. त्यांना ग्रामीण विश्वातील विसंगती सहज टिकवता येतात आणि हास्योत्पादक कथा रंगवायला जे निवेदन कौशल्य लागते ते त्यांच्या जवळ आहे. द. मा. मिरासदार देखील याच निवेदन कौशल्याच्या जोरावर 'बापाची पेंड', 'माझी पहिली चोरी', 'व्यंकूची शिकवणी' इ. कथांची रंगत वाढवितात.

चिं. य. मराठे, व्यंकटेश माडगूळकर, शंकर पाटील, रा. रं. बोराडे, आनंद यादव, उद्धव शेळके, द. मा. मिरासदार, मधु मंगेश कर्णिक इ. लेखकांनी ग्रामीण परिसर जसा जिवंत केला तसे मराठी मुलखातील बोलीचे एक न्यारे लावण्य प्रकट केले. एका अर्थाने या सर्व लेखकांनी ग्रामीण कथेसंबंधी अनेक अपसमजुती होत्या त्या नाहीशा केल्या. शेतीचा बांध किंवा मोटवण यांची पार्श्वभूमी योजून नागरी भाषेतील एरव्हीचेच प्रणयसंवाद ग्रामीण बोलीत लिहिणे म्हणजे ग्रामीण कथा किंवा खेडेगावातील विवाहबाह्य संबंधाची खरीखोटी लफडी खमंग भाषेत लिहिली की झाली ग्रामीण कथा किंवा खेड्यातील माणसांना भाबडी, निरागस

मानून त्यांच्या दारिद्र्याविषयी, अज्ञानाविषयी आणि मूढतेविषयी लिहिले की झाली ग्रामीण कथा इत्यादी खुळ्या समजुती या लेखकांनी बदलून टाकल्या. या लेखकांनी आपण जगलो-वाढलो तो परिसर, तिथल्या माणसांचे भावविश्व, तिथल्या निसर्गाची विविध रूपे चित्रित केली.

1958 साली मालवण येथील साहित्य संमेलनाच्या कथाशाखेच्या अध्यक्षीय भाषणात वा.ल.कुलकर्णी यांनी नवकथेच्या मर्यादा सविस्तर स्पष्ट केल्या. त्यांच्या भाषणात एक तक्रार अशी होती की, साचेबंदपणाविरुद्ध बंड करून उठलेल्या कथेने नवे साचे बनविले आहेत आणि लेखकाचे अनुभव-दारिद्र्य अधिक जाणवते आहे. नवी कथा मनोविश्लेषणात्मक खरी पण पुष्कळदा मनोविश्लेषणासाठी मनोविश्लेषण केले जाते. त्यांच्या तक्रारीत तथ्य होते.

भावविवशता, सांकेतिकता, तंत्रबद्धता इत्यादी बंधनांनी खुरटलेल्या मराठी कथेला गाडगीळांनी मुक्ती दिली आणि तिच्या विकासाला दिशा मोकळ्या करून दिल्या. जी.ए.कुलकर्णी यांनी मराठी कथेला एका वेगळ्याच टप्प्यावर आणून सोडले. जीवनाचा अनेकांगांनी शोध घेणे त्यांना सहज शक्य झाले. त्यांचा पहिला कथासंग्रह ‘निळासावळा’ 1959 मध्ये प्रसिद्ध झाला. त्यातील ‘चंद्रावळ’, ‘मुखवटा’, ‘सांगाडा’, ‘अवशेष’, ‘गुंतवळ’, इत्यादी कथा वाचताना लक्षात आले की, जी.ए.यांची कथा केवळ एखाद्या व्यक्तीची व्यथा किंवा तिच्या एखाद्या भाववृत्तीचे चित्रण करीत नाही. तिच्या निर्मितीमागे जीव, जगत आणि अदृश्य शक्ती यांच्या विषयी मूलभूत प्रश्नांचा विचार करणारे जी.ए.यांचे मन आहे. त्यांना वाटत असावे की, दु:खांची, चिंतांची, वेदनांची ओझी शिरावर घेऊन माणसे वाटचाल करतात ती जीवनेच्छा जबर म्हणूनच.

जी.ए.यांच्या कथेचा घाट चित्रकथेसारखा आहे. चित्रांच्या मालिकेतून चित्रकथा एक अनुभवच गोचर करीत असते. त्यात चित्रामागून चित्रे सरकत असतात आणि गतीचा आभास उत्पन्न होऊन चित्र जिवंत होते. चित्रकथेला सूचकतेचा ठायी ठायी अवलंब करावा लागतो. तिला स्पष्टीकरण, शब्दजंजाळ, संथपणा मानवतच नाही. तशी जी.ए.यांची कथा म्हणजे गतिमान चित्रमालिका आहे.

जी.ए. यांचे अनुभवविश्व कथेचे किती विविध घाट धारण करून गोचर होते. कधी त्याला ‘वृंदगाना’ चा घाट लाभतो तर कधी मुक्तचिंतन तर कधी त्यातून चित्रमालिका आकारते तर कधी ‘फॅन्टसी’ चे रूप असते.

महायुद्धोत्तर कालखंडातील उत्तरकालात जी.ए. यांच्या कथालेखनाच्या तुलनेत अन्य कथालेखकांचे लेखन लक्षणीय असेल पण ते जी.ए.यांच्या कथेची उंची गाठू शकत नाही. नाट्यक्षेत्रात मानाचे स्थान मिळविणारे विजय तेंडुलकर ‘काचपात्रे’, ‘मेषपात्रे’, ‘गाणे’ इत्यादी संग्रहांतून मध्यमवर्गीय पांढरपेशांचेच जग चित्रित करतात. या जगात घमेंडखोर, ढोंगी, लाचार, आत्मविश्वासाचा अभाव असलेली थर्डरेट माणसे आहेत, तशी त्यात विवाहबाह्य संबंध ठेवणारी, भ्रष्टाचरण करणारी माणसेही आहेत. पु.शि.रेगे यांची ‘मनू’

ही कथा सोडली तर अन्य कथा रुजते, वाढते पण परिपूर्ण होते असे वाटत नाही. 'मनू' या कथेत मनूने जे दिले त्याने तिचा प्रियकर अधिक अंतर्मुख होतो, मनूचे रूप सर्वत्र पाहू लागतो. प्रेमसंबंधाचा विकास याच मार्गाने होत असतो हे दर्शविण्याचा प्रयत्न रेगे करतात. त्यांच्या कथेतील 'प्रेमानुभवा' चे चित्रण अतिशय नाजूक, सूक्ष्म असते. 'गजगा', 'औदुंबर', 'सूर्य' या कथासंग्रहांचे लेखक श्री.दा.पानवलकर एक वेगळेच अनुभवविश्व उभे करतात. उत्कटपणे जीवन जगणारा अच्युत, अच्युताला तनमन वाहून कृतार्थ झालेली त्याची पत्नी वेणू आणि अच्युताचे मन जिच्याकडे खेचले जाते ती कुमुद यांच्या परस्पर-संबंधांतून पानवलकरांची 'या परि सांडूनि दमयंती' ही कथा उमलते. जीवनाशी झुंज घेणारी, आयुष्याशी अहोरात्र वैर करणारी आणि पौरुषाने जीवनाला पादाक्रांत करू इच्छिणारी, स्त्रीशी निषिद्ध संबंध ठेवणारी अशी बेडर माणसे त्यांच्या कथेचे विषय बनतात. विद्याधर पुंडलिक कुटुंबचित्रणातच रंगलेले आहेत. या कुटुंबातील माणसे दुःख भोगणारी पण आशेची दोरी बळकट धरणारी अशी आहेत. त्यांच्या कथा गोखल्यांच्या घराण्यात शोभतील अशा. निष्ठावान, ध्येयवादी माणसांचे अनुभवविश्व त्यांतून उमलते. 'सामोरी', 'एका मांजरीची कथा', वॉर्ड नं. सात', 'दवणा', 'माळ' यांसारख्या तशा 'कोमट' पण भारून टाकणाऱ्या कथा त्यांनी लिहिल्या. ए. वि. जोशी यांना लोकविलक्षण माणसांच्याच कथा रंगवाव्या असे वाटते हे 'कृष्णाकाठचे देव', 'वेलबुट्टी' हे संग्रह वाचताना ध्यानात येते. समर्थ निसर्गकथा लिहिणारे रणजित देसाई गतकालातील स्त्री-पुरुषांच्या रोमॅन्टिक कथा लिहितात. तरल अनुभव व्यक्त करणारी 'चिद्घोष' सारखी कथा लिहिणाऱ्या ज्ञानेश्वर नाडकर्ण्यांना जीवनातील चमत्कृतीची, वैचित्र्यपूर्णतेची ओढ आहे. जयवंत दळवींनी प्रेमानुभवाचे चित्रण केले तसे जीवितातील विसंगती टिपणाऱ्या विनोदी कथा लिहिल्या. एक शंकर पाटील, द. मा. मिरासदारांचे अपवाद वगळले तर 'विनोदी कथे'ला साचेबंद रूप प्राप्त झाले आहे असेच जाणवते. मधु मंगेश कर्णिक प्रसन्न शैलीने कोकणच्या माणसांचे जीवन, त्यांचे दारिद्र्य, त्यांना सोसावे लागणारे हाल, त्यांची स्वप्ने, त्यांच्या श्रद्धा यांचे चित्रण करतात. सिनिक यांच्या कथेतून उमलते ते हैद्राबादचे संस्थानी सुस्त आणि धुंद जग. त्यांच्या कथा वाचीत असताना लक्षात राहते ती त्यांची ढंगदार शैली आणि कामजीवनाचे अनेक पातळींवरचे चित्रण. शरच्चंद्र चिरमुल्यांनी अतिशय रेखीव, मानवी मनाची उकल मुलायमपणे करणारी कथा लिहिली. हे 'श्री शिल्लक', 'युधिष्ठिराचा रथ' इत्यादी कथा वाचताना जाणवते. नाट्य, कादंबरी, कविता ह्या क्षेत्रात यश कमावणाऱ्या चिं. त्र्यं. खानोलकरांची कथा जी. ए. यांच्याप्रमाणेच मानवी अस्तित्वाचा संबंध शोधते. 'सनई' मधून ते लहान मुलाला जाणवले आहे तसे भोवतालचे जग, भोवतालची माणसे चित्रित करतात. उत्कटतेने जीवन जगणाऱ्या माणसांची ओढ खानोलकरांना आहे. त्यांना जाणवते की आजचा काळ हा सांस्कृतिक क्षयाचा काळ आहे. या समाजात व्यक्तीच्या नैतिक, सांस्कृतिक विकासाची मुळीच शक्यता नाही, श्रेय गवसण्याचीही शक्यता नाही. त्यांच्या कथांतून सजीव होतो तो कोकणचा दरिद्री भाग, तेथील परंपरेची, धार्मिक श्रद्धांची, देवभोळेपणाची खोलवर गेलेली मुळे आणि तिथेच 'माणूस' म्हणून जगण्याचा प्रयत्न करणाऱ्या व्यक्तीची धडपड.

दिलीप चित्र्यांची कथा नव्या दिशेने जाणारी आणि वादळ उठविणारी ठरली. त्यांची कथा कुणाला आवडली नाही तर कुणाला बीभत्स वाटली. पण ती खऱ्या अर्थाने प्रश्नार्थक कथा आहे. ज्या प्रश्नचिन्हांनी चित्र्यांना ग्रासले आहे तीच ते आपल्या कथांतून उभी करतात आणि त्याची उत्तरे शोधणे आवश्यक करतात. नायकाचा एकाकीपणा आणि जीवनेच्छा एकत्रपणे व्यक्त करण्याचा प्रयत्न 'केसाळ काळेभोर पिल्लू' या सारख्या कथांतून ते करतात. अस्वस्थ करून सोडावे, वाचकांच्या वाङ्मयीन, सांस्कृतिक, सामाजिक, नैतिक कल्पनांवर आघात करावा असे त्यांना वाटत असावे. म्हणजे एका परीने चित्र्यांची भूमिका विद्रोह्याची आहे.

चित्र्यांची कथा जसे एक आव्हान आहे तसेच कमल देसाई यांच्या कथेचे स्वरूप आहे. या कालखंडात, वसुंधरा पटवर्धन, तारा वनारसे, सुधा नरवणे, विजया राजाध्यक्ष, ज्योत्स्ना देवधर इत्यादी स्त्रिया लेखन करीत होत्या. धपापत्या उराच्या लेखिका म्हणून ज्यांचे वर्णन केले गेले त्या तारा वनारस्यांच्या कथाविश्वात दुःखात कुढणारी, पिचणारी पात्रे असतात. व्यक्तीच्या भावविश्वाचे चित्रण करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. विजया राजाध्यक्षांचे लेखन 1955 पासून चालले आहे. 'अधांतर', 'टिंबे', 'विदेही', 'अनोळखी' इत्यादी त्यांच्या संग्रहांतून स्त्री मनाचा वेध घेण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. त्यांची कथा प्रयोगशील आहे पण त्या विषयांच्या शोधात असतात असे वाटते. त्यांनी आपल्या कथांतून ज्या स्त्रियांची चित्रे रंगविली त्या स्त्रिया स्वतःच्या विश्वात पार बुडून गेलेल्या आहेत असे जाणवते. तशी त्यांची कुटुंबकथाच आहे. कुटुंबातच वावरणाऱ्या आणि त्याच्यासाठीच जगणाऱ्या स्त्रीला बदलत्या परिस्थितीमुळे कोणते ताण सोसावे लागतात याचे चित्रण करण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. पण या सर्व लेखिकांपेक्षा कमल देसाई यांचे कथालेखन अगदी निराळे आहे. 'रंग'मधील कथालेखनासंबंधी अभिप्राय व्यक्त करताना ज्ञानेश्वर नाडकर्णी म्हणतात, "निवेदनाच्या बुडाशी असलेल्या कालप्रवाहाच्या भूतभविष्यातील चैतन्यशीलतेचा वेध कमल देसाई यांनीच घेतला." त्यांच्या कथा म्हणजे संवेदनेने घेतलेल्या अनुभवाचे चित्र असते. कथा लिहिण्याची त्यांची अशी खास शैली आहे. त्यांची कथा एकाच वेळी अनेक पातळ्यांवरून व तिन्ही काळांतून विकास पावते.

महायुद्धानंतर जी कथा विकास पावत होती ती कथा सत्ता, संपत्ती आणि प्रतिष्ठा यांपासून वंचित झालेल्या मध्यमवर्गीय पांढरपेशा लेखकांनी प्रामुख्याने घडविली होती. पण याच कालखंडात उपेक्षितांचे, दलितांचे अंतरंग उकलून दाखविण्याच्या प्रेरणेचा उदय झाला. 'बन्सीधर, तू आता कुठे रे जाशील?' या कथेने श्री. म. माट्यांनी कथालेखनाला एक नवे वळण दिले. माट्यांना एक उपेक्षित स्तर दिसला. त्या स्तराचे जीवन त्यांनी जवळून पाहिले होते. या उपेक्षितांची सुखदुःखे, त्यांनी सोसलेला छळ, त्यांचे अवमानित जिणे यांविषयी माट्यांना कळवळा होता. त्यातूनच त्यांची कथा जन्मली. पण स्वातंत्र्य मिळाल्यानंतर 'अस्मिता' जागृत झालेला, दलितवर्गातून पुढे आलेला लेखक आपले अनुभव कथांतून मांडू लागला. गावकुसाबाहेर जनावरापेक्षाही क्षुद्र, रौरव नरकापेक्षाही भीषण जीवन ज्यांना विशिष्ट समाजव्यवस्थेमुळे वाट्याला

आले आहे त्या वर्गातून पुढे आलेला होता. कितीतरी वर्षे हा समाज माणुसकीला पारखा झाला होता. पिढ्यान्‌पिढ्या अज्ञानात बुडालेला, दारिद्र्याने जर्जर झालेला हा वर्ग दिशाहीन जीवन जगत होता. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांसारख्या महापुरुषाने या उपेक्षित समाजाला स्वाभिमान दिला, त्यांच्या जीवनाला दिशा दिली. फिनिक्स पक्ष्यासारखा हा समाज पेटून उठला तो बाबासाहेबांची विचारप्रणाली घेऊनच. या नव्यानेच जाग आलेल्या समाजातील शंकरराव खरात, अण्णाभाऊ साठे, बाबुराव बागुल यांनी नव्या जाणिवा व्यक्त करणारी कथा लिहिली. ही कथा आव्हानाच्या पावित्र्यात उभी आहे. या कथेतून व्यक्त होणारा अनुभव हा त्या जमातीचा समूहमनाचा अनुभव आहे. ‘ऊस डोंगा परी रस नव्हे डोंगा’ या अभंगातून चोखामेळा जसे आपल्या जमातीच्या मनाची वेदना व्यक्त करीत होता तसे खरात-बागुल आपण ज्या वर्गात जगलो-वाढलो, ज्या वर्गाचे दैन्य, दारिद्र्य भोगले, विषम समाजरचनेमुळे अनंत दुःखे भोगली त्या वर्गाचे मनच कथांतून गोचर करतात. शंकरराव खरातांनी बारा बलुतेदारांची दुःखे तीव्र शब्दांत व्यक्त केली. गुन्हेगार ठरलेल्या माणसांचे मन उकलून दाखविले. एकुलता एक पोरगा मेला तरी ते दुःख गिळून पोटासाठी बाहेर पडावे लागलेल्या माणसांची दुःखे त्यांनी सांगितली. अण्णाभाऊ साठे यांच्या कथांतून वारणेचा परिसर उभा राहतो, तरी तेथील दलित माणसांचे दुःख वेगळे नाही. त्यांना पांढरपेशा वर्गाविषयी चीड आहे. ‘भुताचा मळा’ ह्या कथेतील त्यांचा नायक म्हणतो, ‘अरं ती टारफुल्यावानी मानसं’. अण्णाभाऊंच्या कथेतून चीड व्यक्त होते ती सामाजिक अन्यायाविरुद्ध, आर्थिक विषमतेविरुद्ध, मढ्याच्या राखेतील सोने मिळविण्याच्या जिद्दीने मसणवटी धुंडाळणारा भीमा, नागाशी झुंज घेणारा जिवा, बिलवरीची अब्रू वाचवणारा अमीन, मृत्यूशी झुंजणारा नसरू अशा मनस्वी व्यक्तींनी गजबजलेले जग पाहून पांढरपेशे वाचक स्तिमित झाले तर नवल नाही.

मध्यमवर्गीय पराभूत माणूस एक तर अध्यात्माची वाट चाचपडत राहतो किंवा षंढ संताप व्यक्त करतो. पण बागूल मात्र दलितांच्या मुक्तिसंग्रामाची तुतारी फुंकतात. भोवतालच्या अन्याय, छळ करणाऱ्या समाजविषयीचे कडवट उद्‌गार व अशा समाजातले आपण घटक आहोत म्हणून बागुलांसारखा कथालेखक तुच्छता व्यक्त करतो. आपल्या वाट्याला आलेले दैन्य, अपमान, दारिद्र्य आणि त्यातून उत्पन्न झालेला उबग, अस्मितेला आलेली जाग आणि विद्रोहाची भाषा असा प्रवास त्यांच्या कथालेखनात दिसतो. मुंबईसारख्या मोहनगरीत लेबर कॅम्पसारखी नरकपुरी असावी आणि तेथील माणसांचे जीवन किड्याप्रमाणे वळवळणारे असावे याबद्दलची चीड ते व्यक्त करतात. जेव्हा ‘मी जात चोरली होती’ किंवा ‘मरण स्वस्त होत आहे’ यांमधून बागुलांच्या कथा आपण वाचतो तेव्हा या कथा आक्रस्ताळ्या, अतिरेकी, भडक वाटतात. वस्तुतः बागुलांच्या कथांतून व्यक्त होणारा अनुभव इतका अनोळखी आहे की, तो मध्यमवर्गीय माणसाला हलवीत नाही. सुरक्षित, चाकोरीबद्ध माणसाला बागुलांच्या कथेतील अनुभवविश्व परके वाटणे साहजिकच आहे. विद्रोह, चीड, संताप अशा भावनांतून व्यक्त होणारे तीव्र अनुभव कथात्मरूप घेऊ शकत नाहीत, हे मानणे गैर आहे. कामक्षुधेपेक्षा

अन्नक्षुधेचे चित्रण करणे मध्यमवर्गीय लेखकाला जमायचे नाही. तो गरिबांना त्रस्त करणाऱ्या भुकेचे चित्रण करू लागला की, त्याची कथा भावविवश होते, ऊरबडवी होते. पण बागुलांनी 'भूक' या कथेत आपल्या पोरांच्या तोंडी धड भाकरतुकडादेखील पडत नाही याचे आईच्या मनात कसे दुःख सलत असते त्याचे चित्र रेखाटले आहे.

स्वातंत्र्य मिळूनही या देशातील सामान्य माणूस आज अतृप्त आहे. आपण अधिक असुरक्षित होत चाललो आहोत ही त्याची जाणीव बळावतच चालली आहे. जीवनाची व्यर्थता, पोकळपणा त्याला जाणवतो तसा त्याला नीतिकल्पनांचा बेगडीपणा, अध्यात्माचा फसवेपणा जाणवला आहे. एक भयाण निष्क्रिय पोकळी हीच जीवनाची वास्तविक जाणीव. चाकोरीबद्ध जीवन जगणे तर भाग असते पण चाकोरीच्या बाहेर जाण्याची धडपड तर चालू असते. निष्ठा, मूल्ये जपत जगणे अशक्य होऊन बसले आहे. गतकाल तुटता तुटत नाही. भविष्य तर अंधारात पार बुडून गेले आहे. कर्कगार्दचे एक वाक्य सहज आठवते. तो म्हणतो, 'हेगेलच्या शुद्ध विचाराच्या मार्गदर्शनाखाली जीवन जगणे म्हणजे युरोपच्या नकाशाच्या साह्याने डेन्मार्कमध्ये प्रवास करण्यासारखे आहे.' याचा अर्थ स्वतःच जीवन जगले पाहिजे. हे जीवन जगताना अतृप्ती, अशांतीवाचून दुसरे काय वाट्याला येणार? या ना त्या कारणाने शापित अश्वत्थाम्यासारखा माणूस वेदना उरी घेऊन जगत आहे. म्हणूनच लेखकाला जाणवलेल्या अशांतीचे, अतृप्तीचे, अस्वस्थतेचे, असुरक्षिततेचे चित्र इतर वाङ्मयप्रकारांप्रमाणे कथेत उमटणे अपरिहार्य आहे. आपल्याला जे उत्कटपणे अर्थपूर्ण अनुभव जाणवले ते तितक्याच उत्कटपणे व्यक्त करावे या प्रेरणेतून या कालखंडातील कथा उदयास आली. कथा-लेखक 'अर्थपूर्ण अनुभव' व्यक्त करतो त्या अनुभवांत अंगभूत व्यापकपणा असावा, ते अनुभव जीवनाच्या मूलभूत स्वरूपावर प्रकाश टाकणारे व मानवी अस्तित्वाचा अर्थ शोधण्याचा प्रयत्न करत असावेत या जाणिवेचा जन्म झाल्यामुळे कथेकडे पाहण्याची दृष्टीही बदलली. कथेची कितीतरी रूपे या कालखंडात आपल्यासमोर आली. कथेसारखा अतिशय नाजूक वाङ्मयप्रकार जीवनाच्या अंगोपांगांवर, मानवी मनावर कितीतरी तऱ्हेने प्रकाश टाकीत आहे. तसे सगळेच अज्ञात आहे. जे अज्ञात ते जाणून घेण्याची प्रेरणा प्रत्येक कलावंतात प्रकर्षाने असते. अज्ञात गोपाळाच्या शोधार्थ निघालेली मीरा विषाचा प्याला ओठी लावण्यास सिद्ध आहे कारण 'गिरिधरा' ला जाणून घ्यावयाचे आहे. 'गोपाळा'ला जाणण्याच्या ओढीतून मीरेच्या अनुभवांनी काव्यात्मरूप घेतले. त्याप्रमाणे जीवन आणि मानवी अस्तित्व जाणण्याच्या ओढीतून कथालेखकाला जाणवलेले अनुभवविश्व कथारूप धारण करते. क्षणात नाहीसे होऊ शकणारे हे 'दिव्य' भास कथालेखकाच्या लेखनसृष्टीत लयबद्ध आकृतिबंध घेऊन अवतरतात तेव्हा त्या लेखनाचे लावण्य केवढे अपूर्व असते.

**भालचंद्र फडके**

एक

# दंडकारण्यातील प्रणयिनी

## दिवाकर कृष्ण

फार प्राचीन काळी - किती वर्षांपूर्वी हे जरी कुणाला माहीत नाही; तरी दंडकारण्याला आपले नाव मिळाले नव्हते, आर्य लोकांना तो प्रदेश पुरता माहीतही नव्हता, आणि तेथे वसती करणारे - ज्यांना आर्य, उत्तरेकडून आलेले लोक दस्यू म्हणत - अजून जित होऊन या श्रेष्ठ पाहुण्यांचे गुलाम झाले नव्हते, आर्यांचे या दुर्गम, घनघोर आणि भयप्रद प्रदेशावर आक्रमण चालू होते - अशा इतिहासपूर्व संक्रमणकाली विंध्यगिरीच्या पूर्व टोकाला कृष्णावेणीच्या उत्तरतीरावर मदनपल्ली म्हणून एक दस्यूंचे वसतिस्थान होते. याच्या शेजारीच चार हाकांच्या अंतरावर या नदीला दुसरी एक नदी येऊन मिळून संगम झाला होता. या नदीचे नाव आज लुप्त झाले आहे, पण फार बारीक शोध करता असे कळते की, तिला म्मुस्सई असे म्हणत. या वसतीच्या आजूबाजूचा प्रदेश विरल व दाट झाडी, मोठमोठे पाषाण, लहान लहान टेकाडे, लहान लहान खिंडी इत्यादी निसर्गाच्या विविधतेने भरलेला होता. विशेषतः उजव्या बाजूला म्मुस्सई नदी एका मोठ्या डोंगराला खिंड पाडून एकदम कृष्णावेणीला मिळत असल्यामुळे ती जागा विशेषच रमणीय व भयप्रद होती. वसतीमध्ये उंचवट्यांवरून लहानमोठ्या पर्णकुटिका बांधलेल्या असून लोक नदीच्या काठी पिकणारे एक प्रकारचे धान्य, वन्य फळेमुळे आणि रानातील प्राणी यांवर उपजीविका करीत. वसती आणि संगम यांच्यामध्ये ताडासारख्या उंच वाढणाऱ्या, कल्लुसंज्ञक मद्यार्क देणाऱ्या झाडांचे वन माजले होते. लोक मातीच्या भांड्यांत हा मद्यार्क साचवून पीत, आणि धुंद होऊन नाचू गाऊ लागत. रोज सायंकाळी हे रान तरुण दस्युकन्यांचे विहारवन होत असे.

"ती पाहिलीस का नीलम येते आहे," अशाच एका दस्युकामिनींच्या समूहातील एक म्हणाली. त्यांच्या सर्वांच्या हातांत मद्याची भांडी होती. त्यांचे घोट घेत घेत त्या आपापसांत कलकलत होत्या. पलीकडे ठिकठिकाणी पुरुष आणि स्त्रिया खात-पीत, ओरडत-गात, शुद्धीवर आणि बेशुद्ध, अस्ताव्यस्त आणि सावरून पडल्या होत्या.

अशा त्या संस्कृतिपूर्वकालीन अपूर्व मद्यालयात ती नीलम उड्या मारीत आली. तिचे केस मोकळेही नव्हते, आणि ती वेणी घालणेही जाणत नव्हती. तिचे अनावृत बाहू कृष्णसर्पाप्रमाणे इकडून तिकडे हालताना शोभत होते. तिच्या अंगावर केळीच्या सोपटांनी

चटईसारखे विणलेले, डाव्या खांद्यावरून सोडलेले, कमरेभोवती घट्ट बांधलेले वस्त्र होते. तिच्या वेणीपेक्षा तिच्या नीटसपणाचेच वर्णन करावे. तिच्या नाजूकपणापेक्षा तिच्या अंगसौष्ठवावर काव्ये करावी. तिच्या तारुण्यापेक्षा तिच्या डोळ्यांतील पाणीदारपणाचे कौतुक करावे.

ती दस्युकुमारी आपल्या मैत्रिणींच्या घोळक्यात येऊन पोचली तेव्हा त्यांपैकी एकीने तिच्यापुढे कल्लूचा लोटा केला. तिचे डोळे आधीच लाल झाले होते. तिने एकीकडे तोंड केले, दुसरीला हाताने नको म्हटले आणि तिसरीला हसत म्हणाली, "आपल्या गावापाशी यर्रा लोक आले आहेत बरं का ग!" (यर्रा म्हणजे आर्य किंवा गोरे.)

"मग आम्हांला काय त्यांचं भय घालतेस?" त्यांपैकी एक हातपाय आणि डोळे ताणून म्हणाली.

"ते म्हणे दस्यूंच्या पोरी उचलून नेतात आणि आपल्या देशात कोंडून ठेवतात."

दुसरी म्हणाली, "मग मल्ली, तू सांभाळ हो; नाही तर - "

पण नीलमला पुरती बोलू न देता मल्ली म्हणाली, "माझ्यापेक्षा तुलाच जास्त भीती आहे. तुझ्यावर तर सगळ्यांचा डोळा आहे!"

"तिला ग कशाची भीती? पल्लीपतीच्या पोराची ती आवडती आहे!" मल्ली म्हणाली.

"पण हिला कुठं तो आवडतो?" कोणशी उद्गारली.

"तो तर इच्या मागंमागं फिरत असतो," पेटी म्हणाली.

इतक्यात तो जवळच झाडाआड एकीला दिसलाच.

"तो समोर पाहा, तो तिथं आहेच. तिच्या मागं तो!"

तो समोर आला; पण त्यांपैकी कुणीच त्याला लाजली नाही किंवा उठली नाही किंवा सावरली नाही, उलट्या सगळ्या त्याच्याकडे पाहून खोखो हसू लागल्या. "तुला यायचं आहे का नाही पलीकडल्या तीराला?" तो ओरडून नीलमला म्हणाला, "नदी भरली आहे, पुन्हा कुणी तुला पलीकडे नेणार नाही मी नाव घेऊन गेलो म्हणजे."

"पलीकडे काय करायचं आहे? तिकडे यर्रा आले आहेत ना? तुला माहीत नाही का?" मल्ली खरीच भिऊन म्हणाली. ती त्या सर्वांत लहान होती.

"यर्रांना कुणीही द्रव्वी भीत नाही." तो छाती फुगवून आणि आपल्या हातातील कोयत्यासारखे हत्यार सावरून म्हणाला. द्रव्वी हा शब्द बलवान या अर्थाचाच वाचक आहे. "तिला आवडणारी उसरीची फळं पलीकडच्या तीरावर आहेत, ती आम्ही घेऊन येणार आहोत." असे म्हणून त्याने येऊन तिचा हात धरला. त्याच्या उंच, धिप्पाड, बांधेसूद देहाकडे दुसऱ्या पोरी पाहत राहिल्या.

"मी नाही येत तुझ्या नावेत!" तिने आपला हात सोडवून घेतला.

"तू माझ्या अगदी जवळ बसतोस आणि मला अडचण करतोस. तू आपल्या नाव चालविण्याकडे लक्ष देत नाहीस म्हणून ती कुणीकडे तरी वाहत जाते आणि उशीर झाला म्हणजे आई करते पूजा!" ती डोळे मिचकावीत म्हणाली.

"आणि पलीकडे यर्रा आले आहेत, तू जाऊ नको आक्का!" मल्ली तिच्याजवळ येऊन तिला ओढू लागली.

"तू यर्रांना भितेस काय?"

"हो, भ्यायला बसले आहे! हवं तर त्यांतल्या एखाद्याशी लग्नसुद्धा करीन," नीलमने पाठमोरी होऊन मान वळवून त्याला खिजवण्यासाठी म्हटले.

त्याने कोयता कमरेला खोचला; मल्लीच्या गालावर एक टिचकी मारली आणि नीलमला दोन्ही हातांनी उचलून तो नावेकडे चालू लागला.

"पाहिलंस का नीलमचं भाग्य?" त्यातली एक कल्लूचे बोळके ढोसून म्हणाली.

दुसरी एक उंच सुरात गाऊ लागली -

यर्रा आले बाई गावात
रत्नम्माची सुंदर बेटी
चोरून नेली मेल्यांनी
गांवामधले वीर धावले
रक्ताचे बाई सडे सांडले

कोण ग काळ्या केसांची
लाल लाल डोळ्यांची
दिला देवीनं नवस तिला
केव्हा ग आलीस रानातून?
पाणी का डोळ्यांतून
कुठं ग बाई नीलम गेली
पल्लीपतिपुत्राच्या गळ्यात -

ती जेव्हा हाताने ताल धरू लागली तेव्हा तिसरी तिला म्हणाली,

"पुरे झाली तुझी कटकट! मला एक चांगलं स्वप्न पडत आहे."

नीलेच्या प्रियकराने जेंव्हा तिला उचलून नेले तेव्हा ती त्याच्या गालावर चापट्या मारू लागली. त्याने तिला नावेत ठेवले आणि नाव दूरपर्यंत नेली तेव्हा ती म्हणाली, "तू मला का त्रास देत आहेस? मी काही झालं तरी तुझ्याशी लग्न करणार नाही!"

"का बरं? मी तुझी किती तरी सेवा करीत नाही का? हा पाहा मी एखाद्या सेवकासारखा दूर बसतो."

"पण मी तुझ्याशी लग्न करणार नाही."

"मी तुला आवडत नाही का?"

तिने उत्तर दिले नाही. नाव संगमाच्या मध्यावर आली होती. तो काही तरी बोलणार इतक्यात एक बाण येऊन त्या दोघांच्या मध्ये तळात घुसला!

"अय्ययो," ती विवळली.

त्याने वल्हे बाजूला ठेवले, इकडे तिकडे पाहिले आणि म्हटले, "ते पहा त्या पलीकडच्या एका झाडावरून एका यर्राने तो बाण मारला आहे. तुला लागला काय?"

"नाही, पण त्याची कुसळं पायात बोचत आहेत."

त्याने जोराने तो बाण उपटून नदीत फेकला, पण तो भोक पाडून गेला असल्यामुळे पाणी आत येऊ लागले. त्याने टाचेने पाणी अडविले आणि वल्हे मारू लागला. पण दुसऱ्या बाणाने त्याच्या हातातले वल्हे उडाले, त्यामुळे त्याचा झोक जाऊन तो नदीत पडला; आणि त्याने नावेला धरण्याचा प्रयत्न केल्यामुळे नाव उलटली.

दुसरे दिवशी सकाळी पलीकडच्या तीरावर उतरलेल्या आर्यकुलाच्या पर्णागर्तेवर एका दस्युकन्येला आणून उभे केले. कुलपती उच्चासनावर बसले होते. कुलगुरु काही लोक बरोबर घेऊन समिधा आणण्यास गेले होते. ती दस्युकन्या नीलम आपल्या अविहित मांड्यांमध्ये हात जोडून खाली मान घालून उभी होती. पुष्कळसे तरुण तिच्याभोवती जमले होते. त्यांतला एक तरुण तिच्या मागे उभा राहून विजयी मुद्रेने तिच्याकडे व इतरांकडे पाहत होता. "वाहवा प्रवीर, वाहवा प्रवीर," असे काही म्हणत होते. काही तिच्या निरनिराळ्या अंगांना स्पर्श करीत होते. त्यांतील एक कुलपतीकडे जाऊन म्हणाला, "कुलपतींच्या चरणी प्रवीराची अशी विनंती आहे, की त्यानं जिंकलेली ही दस्युकन्या, इचं देवतांना यजन करून, त्याच्या स्वाधीन तिला करावी."

"प्रवीरा, ही तुला कशी मिळाली?" कुलपतींनी विचारले.

"एक दस्युहत हिला आपल्या नौकेत घालून नेत होता. मी बाणानं त्यांच्या नौकेला बुडविले, आणि ही वाहत नदीतीराला आली."

इतक्यात कुलगुरू आले. त्यांना सर्व हकीकत सांगण्यात आली. त्यांनी मान्यता देऊन यजनयोग्य अशी तिची स्नानादी शुद्धी करण्यासाठी आपल्याबरोबरच्या शिष्यांपैकी देवव्रत भार्गव नावाच्या शिष्याचे स्वाधीन केले आणि सायंकाळी होमाच्या वेळी यज्ञस्थळी उपस्थित करण्याची आज्ञा दिली.

इकडे मदनपल्लीतील मधल्या पटांगणात बरीच मंडळी जमली होती. पल्लीपती स्वतः झाडाला टेकून बसला होता. त्याचे अजस्र शरीर, लांब दाढी, उग्र चेहरा आज जास्तच चढलेला दिसत होता. त्याच्या पाठीमागे त्याचा पुत्र खाली मान घालून उभा होता. समोर काही मंडळींच्या घोळक्यात एक पोक्त बाई मोठमोठ्याने बोलत व पुष्कळशा शिव्या देत आणि बोटे मोडीत होती. पलीकडे काही तरुण आपापल्यांत कुजबुजत होते. काही बायका एकीकडे जमून पाहत राहिल्या होत्या. नीलमच्या मैत्रिणी त्यांत होत्या. कडकडत होती ती नीलेची आई. तिला तेवढीच मुलगी होती. तिचा नवरा पूर्वी पल्लीपती होता आणि आर्यांच्या हातून मेला होता. सर्वांत शक्तिमान असेल त्याला पल्लीपती करण्याची वहिवाट होती. तो कल्लूचे झाड हाताने हालवून उपटीत असे आणि डाव्या हातांनी मानगुटी दाबून शत्रूला मारीत असे. ते सगळे आठवून ती शोक करीत होती आणि भोवती जमलेल्या द्रव्वी तरुणांची निर्भर्त्सना करीत होती.

पल्लीपतीचा पहाडी आवाज वायूवर प्रतिध्वनित होताच सर्वत्र शांतता झाली.

"तू तिला लगेच हात न देता कशी वाहू दिलीस?" त्याने मुलाला विचारले.

"ती बुडताच दिसेनाशी झाली आणि पुढं अंधार पडेपर्यंत मी तिला पाण्यात शोधली. पुन्हा सकाळी मी शोधण्यास गेलो तेव्हा ती शत्रूच्या हाती दिसली," त्याने खिन्नपणे उत्तर दिले.

पल्लीपतीने करकरा दात खाल्ले आणि गर्जून म्हटले, "जा, त्यांचा निःपात करा."

"माझ्याबरोबर कोण येईल?"

"मी येईन, मी नीलेसाठी जीव वाहीन." आणि सर्वांनी त्याचा अनुवाद केला.

इतक्यात एक ओरडला, "ते पहा, पलीकडच्या तीरावर यर्रा तिला घेऊन आले आहेत." आणि सर्वांचे लक्ष तिकडे वेधले.

मध्ये नदी अथांग भरून वाहत होती. दस्यूंना आर्यांच्या तिरंदाजीचे फार भय होते; नाही तर आत्ताच पोहून जाऊन त्यांनी आपली ठेव हस्तगत करून घेतली असती. नीलेच्या बरोबर देवव्रत होता, आणि इतर सशस्त्र तरुण संरक्षणार्थ होते. प्रवीर नव्हता.

देवव्रताला दस्यूंची भाषा येत होती. नदीच्या वाटेला लागताच त्याने नीलमला विचारले, "तुझं नाव काय?" ती स्तिमितच झाली. तिला कुणी असे विचारील अशी कल्पनाही नव्हती.

"भिऊ नको, सांग तुझं नाव."

तिने त्याच्याकडे डोळे भरून पाहिले आणि म्हटले, "नीलम."

तोही तिचे अथांग निरीक्षण करीत होता. नदीवर नेल्यावर तिला गोमयमृत्तिकादिकांनी अभ्यंग स्नान घालण्यात आले. शेवटी तिला राहवेना. तिने देवव्रताला विचारले,

"माझं तुम्ही करणार तरी काय?"

"हवन करणार."

"म्हणजे काय? विस्तवात टाकून देणार?"

"तुला अग्नीभोवती फिरवणार आणि मंत्र म्हणणार."

"आणि पुढं -"

"ज्याला तू सापडलीस त्याला देऊन टाकणार."

"मग तो माझं काय करणार?"

"उपभोग घेणार."

"लग्न करणार नाही?"

"दस्युकन्येशी कुणी लग्न करतं का?"

"मग मला त्याची सगळी सेवा करावी लागणार?"

"होय."

"पण आम्ही दस्युकन्या आपल्या इच्छेविरुद्ध कुणाला देह अर्पण करीत नाही."

"पण ते तुला भाग पाडतील."

यावर नीलम काही बोलली नाही. ती दीन झाली. परत येताना ती सारखी त्याच्याकडे सतृष्ण पाहत होती, पण तिला बोलायला धीर होत नव्हता. झाले, दुपारचा वेळ तसाच गेला. तिच्या रक्षकांना यांपैकी एक अक्षरही समजले नाही. सायंकाळी देवव्रत तिला वेदीच्या स्थळी नेण्यासाठी आला तेव्हा ती त्याचे पाय धरून म्हणाली, "मला एक भिक्षा घाला."

"काय?"

"मला या विटंबनेतून वाचवा. इच्छेविरुद्ध भोग मरणाहून जास्त आहे. मला तुमच्या अग्नीत द्या."

देवव्रताला आश्चर्य वाटले, दुःख झाले आणि तिची दया आली. दया ही प्रीतीचीच बहीण नव्हे का? त्याच्या डोळ्यांत पाणी उभे राहिले, आणि तिच्या पाण्याने भरलेल्या डोळ्यांकडे पाहून त्याला कसेसेच वाटले. यज्ञानंतर प्रवीर तिला घेऊन चालला तेव्हा पूर्वी दिलेल्या वचनाची आठवण देऊन दक्षिणा म्हणून ती दासी त्याने मागून घेतली. ब्राह्मण आणि दासीशी व्यवहार करणार? सर्वांच्या दृष्टीने तो हीन, पतित ठरला. प्रवीर तर जळफळू लागला, त्याने ब्राह्मण्याला दूषणे दिली. त्याला ती फार आवडली होती, तिच्याबरोबर करावयाच्या अनेक विलासांची त्याने मनात कल्पना केली होती. त्या काळी दासीगमन ब्राह्मणांना अगदी निषिद्ध होते; पण -

देवव्रताने तिचा हात धरून तिला नदीतीरावर आणिले आणि सांगितले की, "तू स्वतंत्र आहेस. आपल्या गावी जा." ती त्याला सोडून जायला तयार होईना. तिला जवळ ठेवण्यात आपल्याला केवढे पातित्य आहे हे त्याने सांगितले, आणि तिला मुक्त करण्यासाठी आपल्याला लोकदृष्ट्या केवढे हीनत्व स्वीकारावे लागले हेही सांगितले; पण जायला तयार होण्याऐवजी ती त्याला जास्तच बिलगू लागली; कारण आपल्यासाठी इतका त्याग करणारे तिला कुणीच भेटले नव्हते. शेवटी मोठ्या कष्टाने त्याने परत जाण्यासाठी तिचे मन वळवले. ती जायला निघाली. तिने पाण्यात उडी टाकली, पोहून परतीर गाठले, असे पाहून तो परत गेला. पण ती गावात गेली नाही. ती परत नदी तरून आली; आणि ते अरण्य तिच्या पूर्ण माहितीचे असल्यामुळे प्रियेप्रमाणे देवव्रताच्या मागोमाग राहू लागली.

दिवसा लढाई करून आपल्याला आर्यांच्या तिरंदाजीपुढे यश मिळणार नाही असे पाहून पल्लीपतीने रात्री छापा घालण्याचे ठरवले. मध्यरात्रीच्या सुमारात असंख्य धाडसी द्रव्वी वीर, कोयते कमरेला बांधून नदी तरून आले. आर्यांच्या तळावर काही जागे होते पण बाकीचे निजलेले होते. मध्ये मात्र संध्याकाळी पेटविलेले पाच अग्नी धडधडत होते. द्रव्वी आले ते आर्यांना जागे होण्याचीसुद्धा फुरसद न देता त्यांनी जो दिसेल त्याला कापून काढण्याचा किंवा अग्नीत फेकून देण्याचा धडाका चालविला. या टोळीचा पुढारी पल्लीपतीचा मुलगा होता. तो या संहारामध्ये रुद्रासारखा तळपत होता. त्याने दोन आर्य फरफटत आणले आणि अग्नीत टाकून म्हटले, "ज्या अग्नीत तुम्ही माझ्या नीलेला टाकून दिलंत त्यातच तुमची सर्वांची आता आहुती देतो." हे कृत्य नीलम लपून पाहात होती. तिने धावत जाऊन देवव्रताचे कुटीर गाठले.

एका बाजूच्या झाडीत देवव्रताचे कुटीर होते. त्याच्या आत गवताच्या शय्येवर एक सुंदर तरुणी निजलेली होती. दाराशी देवव्रत पहारा करीत बसला होता. नीलम त्याच्याजवळ धावत आली आणि म्हणाली, "चला, माझ्याबरोबर चला, नाही तर तुमचं रक्षण होणं शक्य नाही. आमच्या लोकांनी तुमच्या यर्रांचा संहार केला आहे. उठा लवकर –"

देवव्रताचा या गोष्टीवर विश्वास बसेना. त्याने खात्री करून घेण्यासाठी एका उंच झाडावर चढून पाहिले, तो बहुतेक लोक मृत्युमुखी पडले होते आणि उरलेले सैरावैरा पळत होते. तो खाली येऊन म्हणाला, "मी येऊ शकत नाही, मजजवळीचा ठेवा कुठे ठेवू?" त्याने कुटिरात निजलेल्या तरुणीकडे बोट दाखविले. त्याच वेळी अग्नीतील एक कोलीत पेटले आणि त्याचा प्रकाश तिच्या तोंडावर पडला.

नीलम तिचे लावण्य पाहून चकित झाली. क्षणभर ती विचारात पडली. तिने तिच्याकडे व देवव्रताकडे पुनःपुन्हा पाहिले; आणि शेवटी ती म्हणाली, "तुमचा हा ठेवा आपण घेऊन जाऊ." त्यांचे हे बोलणे होत आहे तो जवळच माणसांची चाहूल ऐकू आली. त्यासरशी तिने जाऊन त्या सुप्त तरुणीला उचलले आणि देवव्रताला आपल्या मागे येण्यास सांगून ती चालती झाली. देवव्रत एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणे तिच्यामागे गेला.

नीलमच्या घरी रक्षिलेली ही दोनच आर्य माणसे त्या प्रदेशात राहिली. या संहाराचे भय बसून पुन्हा आर्यकुल या बाजूला आले नाही. केवळ नीलमच्या आग्रहास्तव त्यांना जीवदान आणि स्वातंत्र्य देण्यात आले. ती उभयता तिच्यापाशी राहिली. या गोष्टीला किती तरी काळ लोटला.

नीलमच्या घरी राहिलेली ती गौरांगी त्या सर्व दस्युसंघात अभिलाष विषय होऊन बसली; त्यामुळे तिचे रक्षण करणे देवव्रताला अतिशय कठीण होऊ लागले होते. पल्लीपती मरून त्याच्या जागी त्याचा मुलगा सर्वांत बलवान म्हणून पल्लीपती झाला होता. त्याच्या आधी त्याने एका मोठ्या सुसरीच्या दाढा धरून तिला नदीतून बाहेर ओढून काढले होते. नीलेवरची त्याची निष्ठा कायम होती. तिला प्रसन्न करण्यासाठी तो सारखा झटत असे; पण ती शक्यतो त्याला टाळी.

देवव्रताचा तो जीवरक्ष्य ठेवा, ती मोहक तरुणी - ती अतुललावण्य आर्यकन्या - तिचे नाव ऋता होते. तिच्या रक्षणासाठी त्याला सदैव धनुष्य बांधून तिच्या भोवती भोवती राहावे लागे. तिला बोलण्याचालण्याला, जिवाभावाला त्या पल्लीमध्ये तो एकटाच होता. त्याच्याशिवाय तिला क्षणभरही राहवत नसे. ती दस्यूंची भाषा शिकेना, त्यांच्या बायकांतून वागेना, त्यांचे कल्लु - संज्ञक मद्य पिईना; झोपडीत बसून असे, किंवा रानात हिंडे, फुलेफळे तोडी, बोलली तर देवव्रताशीच बोले, त्याच्याबरोबर जाई, त्यालाच आपल्या लीलांनी रंजवी. आणि नीलम - जिच्यासाठी स्वतः महाबली पल्लीपती अधीर होता, जिच्यासाठी एका सबंध आर्यकुलाचा संहार झाला, जिच्या लावण्याची सबंध द्रव्वीमंडलांत ख्याती होती - ती नीलम देवव्रताला एक क्षणभरहि विसंबत नसे. जणू काय तिचा तो बंदीच होता आणि त्याच्यावर नजर ठेवली नाही तर तो पळून जाईल.

एके दिवशी सूर्योदयाच्या वेळी देवव्रत नदीकाठी भगवान सूर्यनारायणाला अर्घ्यादी समर्पून संध्यावंदन करीत होता.

त्याने प्रातःसंध्येचे ध्यान केले -

*प्रातः संध्यां बालां बालादित्यमंडलमध्यस्थां रक्तवर्णां रक्ताम्बरां रक्तानुलेपनस्रगाभरणाम् ॥*

पण त्याच्या समोरच्या पाण्यात त्याला वेगळेच प्रतिबिंब दिसू लागले. त्याला पाण्यात दिसू लागलेली मूर्ती श्यामा, अल्पांबरा, श्वेतपुष्पस्रगाभरणा अशी होती. तिने हसत येऊन त्याचे डोळे झाकले. जणू काय माझे ध्यान करू नको असेच तिने सांगितले. त्याने वळून पाहिले तो तिने आपले ओठ त्याचे ओठांवर ठेवले. अजून उजाडले नव्हते; प्रकाश आणि अंधःकार यांचा संगमच झाला. तिने आपले बाहू त्याच्या गळ्याभोवती घातले. प्रकाशाने नीलवलयाचे आवरण घेतले.

"हे काय केलंस? मी देवकार्य करीत होतो."

"मग हे तरी देवकार्यच आहे. आपण काय करीत होता?"

"मी संध्या करीत होतो."

"संध्या म्हणजे काय?"

"संध्या - म्हणजे - म्हणजे - एकत्र येणं, मिळणं, संगम."

"मग मी तरी तेच केलं."

"तू माझ्या धर्मकृत्यात अडथळे करू नकोस."

"मला आपली धर्मकृत्यं शिकवा."

"तुझी जात वेगळी, धर्म वेगळा; देव वेगळे, उपासना वेगळी; तुझं आमचं कसं जुळेल?"

"तुमच्या जातीत बायकापुरुष नाहीत का?"

"आहेत."

"तुमच्या धर्मात, संस्कृतीत, प्रेम करीत नाहीत का? करतात ना?"

"होय."

"तुमच्या कुलात लग्न करीत नाहीत का?"

त्याने उत्तर दिले नाही. तिने त्याचे पुन्हा एकदा चुंबन घेतले आणि ती पळून गेली.

त्या दिवशी संध्याकाळी त्याला आपले पर्णशय्यास्थान शृंगारलेले दिसले. त्याला वाटले हे त्या नीलमचेच कार्य आहे. चांदणे पिठासारखे पडले होते, पण त्यामुळेच देवव्रताला झोप येईना. कदाचित काळाकुट्ट अंधार असता तर त्याला झोप आली असती! नीलमने त्याला संकट घातले होते.

त्याचे एक मन त्याला म्हणत होते, 'जर तू नीलमवर प्रेम करतोस तर तिला सुखी कर.' पण त्याचा उच्चकुलाचा अभिमान म्हणत होता, 'काय, दस्यु - कन्येशी विवाह! अब्रह्मण्यम्!' दुसरे मन म्हणत होते, 'मग ऋतेची काय वाट होईल? तिच्या संरक्षणाची जबाबदारी तुझ्या हातून नीट पाळली जाणार नाही.' त्याच्या डोळ्यांसमोर नीलमच्या उपकाराची चित्रे येऊ लागली. ऋतेला घेऊन ती नदी तरून आली कुणासाठी? त्या संहारातून आपले तिने संरक्षण

केले कशासाठी? अनेक प्रसंगी ऋतेची अब्रू तिने पराक्रमाने दस्यूंच्या हातून वाचविली ती का? आता त्याला जागेपणी स्वप्ने पडू लागली. नीलम एका झाडावर चढली असून आपण खाली उभे आहो. तिनं कसलीशी फळे गोळा केली असून ती ती आपल्याला देत आहे. ती स्वतः अर्धे फळ तोडून खाऊन उरलेले अर्धे आपल्या तोंडात घालीत आहे, आणि आपल्याला दस्यूंच्या देवतांची एक फार मनोरंजक कथा सांगत आहे. "एकदा भवदेवांनी भवानीला सोडून दिले आणि विरक्त होऊन ते तपाला बसले. आमची देवी जातीची द्रव्वीच आहे. तेव्हा तिच्यासाठी आमचा जो कामदेव, जो मनुष्याला स्त्रियांविषयी आसक्त बनवितो- त्या वनात जाऊन महादेवांना मोहित करण्याचा प्रयत्न करू लागला - आम्ही देवाच्या लिंगाचे पूजन करितो - कामाची बायको रती - बेलाचे पान देवाला आवडते - त्या स्वप्नात त्याला झोप लागू लागली. इतक्यात कुणाचा तरी मऊ स्पर्श त्याच्या शरीराला झाला; त्याने त्याला अतिशय सुख झाले. खास ती नीलम असली पाहिजे. त्या सौख्याचा कदाचित भंग होईल म्हणून त्याने डोळे उघडले नाहीत. त्याने आपले बाहू पसरले आणि तिला हृदयाशी घट्ट धरणार - इतक्यात ती त्याच्या कानाशी लागून म्हणाली -

*"उपोप मे परामृष न मे दभ्राणि मन्मथा."*

देवव्रत हे शब्द ऐकून चमकला. खास ती नीलम नव्हती. आर्यांची भाषा बोलणारे त्या ठिकाणी ऋतेशिवाय दुसरे कोण होते? त्याने डोळे उघडून पाहिले तो ऋताच त्याला बिलगून होती. तो चटकन उठून बसला आणि म्हणाला, "हे काय ऋते?"

"मला आता राहवत नाही."

"म्हणतेस तरी काय तू?"

"माझा जायात्वानं स्वीकार कर."

"शांत हो, तू माझी बहीण आहेस; आपण एक गोत्रातले आहो."

"मग आता मी काय करू?"

देवव्रताला या प्रश्नाने सुन्न करून सोडले. तिने काय करावे? ऋतेने काय करावे? एखाद्या दस्यूशी तिने लग्न करावे ही कल्पनासुद्धा त्याच्या आर्यमनाला सहन होईना! स्वतः दस्युकन्येचा स्वीकार करण्याच्या कल्पनेहून ती उग्र होती. तरी पण त्याने म्हटले -

"एखाद्या दस्यु –"

तिने अत्यंत तिरस्काराने म्हटले, "एखादा पशु –"

देवव्रताला काय करावे सुचेना. तो म्हणाला, "बहीणभावाचा संबंध! शीः शीः –"

"सृष्टीच्या आधी नाही का बहीणभावांचा संबंध झाला? यमीनं नाही का यमाचं आराधन केलं? नाही तर मला मारून टाक!" ती म्हणाली.

जिवापलीकडे जिचे जतन केले तिचे आता काय करावे हे त्याला समजेना. "तू इथं नीज, मी पुन्हा परत येतो." असे सांगून तो निघून गेला. उरलेली रात्र त्याने कशीबशी घालविली. सकाळी त्याला संध्यावंदन सुचले नाही. नीलेचे काय करावे? ऋतेचे काय करावे? का स्वतःचे काही तरी बरेबाईट करावे? मग ऋतेचे काय होईल? नीलम काय करील? स्वसेर्शी

विवाह करावा की अनार्यापाणिग्रहण करावे? का स्त्रीहत्या, आत्महत्या आणि वंशक्षयाला कारण व्हावे? काय करावे? काय करावे –?

त्याने नदीतीरी जाऊन स्नान केले, नित्यकर्म संपवून वरुणाचे आराधन केले.

"जिथे तिथे, हे वरुणा, तुझे दूत तुझे नियम लोकांकडून पाळविण्यासाठी लोकी लोकी फिरत असतात."

"मला सोडू नको नाही तर तुझ्या आज्ञा न मानल्याबद्दल जे लोकांचा नाश करतात त्यांच्या रागाला बळी जाईन."

"माझे मन दुष्कृतीपासून वळव, जसा रवी आपल्या अश्वाला वळवितो; माझ्या वंशाचे रक्षण कर, आणि माझ्या व्रताचे रक्षण कर. तू जसा शासन करणारा आहेस तसा क्षमा करणाराही आहेस."

"तू जर आपल्या भक्तांना दुर्धर डोंगरातून मार्ग दाखवितोस तर मला या संकटांतून का मार्ग दाखवीत नाहीस?"

वरुणाने त्याची प्रार्थना ऐकली की नाही कुणास ठाऊक, पण काही दिवस त्याला व ऋतेला एकमेकांपुढे लाजिरवाणे असे गेले. ऋतेची अधीरता सारखी वाढत गेली, आणि ती तिच्या वागणुकीत आणि चेहऱ्यावर प्रतीत होऊ लागली. देवव्रत आता आपला झाला म्हणून जितकी ती दस्युकुमारी नीलम निश्चिंत होती तितकीच जास्त अशान्तता त्याच्या मनाशी वाढत गेली होती. आता ती पल्लीपतीला टाळीनाशी झाली. केव्हा तरी त्याला हे गोड सत्य सांगून टाकण्याचे तिने ठरवले.

एके दिवशी संध्याकाळी नदीच्या काठच्या वेळूच्या बेटाच्या बाजूला देवव्रत आपले धनुष्य घेऊन निभ्रान्त फिरत होता. त्या बाजूला कोणी सहसा येत नसे. त्यामुळे तो स्वस्थपणे आपल्या भवितव्यासंबंधी विचार करीत होता आणि संध्याकाळ होत होती. त्या वेळूच्या बेटात चाहूल लागली म्हणून त्याने आपले शस्त्र सावरले आणि थोडा पुढे होऊन काय श्वापद आहे हे पाहू लागला. तो त्याला पल्लीपती व नीलम दोघे आपापसांत मोठ्याने बोलताना दिसले. चोरपावली जवळ जाऊन तो ऐकू लागला.

"आता यापुढं मी जास्त वाट पाहणार नाही."

"पाहूच नको, मी दुसऱ्याला वरलं आहे."

"तू माझ्यावर प्रेम केलं नाहीस काय?"

"मुळीच नाही. मी तुला आधीपासून सांगत आले आहे. तू उगीच कष्टलास!"

"असा तो आहे तरी कोण?"

"सांगत नाही."

"तुला सांगितले पाहिजे."

"ज्या आर्याला मी तुझ्या हातून वाचविलं तोच."

"तो वैरी, तो तस्कर! त्याच्यात तू काय पाहिलंस?"

"जे तुमच्यात नाही ते. पुण्य आणि प्रेम!"

"मग मी प्रेम करीत नाही काय?"

"पुण्यमय प्रेम!"

पल्लीपती लाल झाला. तो म्हणाला,

"मी ते काही जाणीत नाही. मला तू हवी आहेस, आणि आता या क्षणी -" असे म्हणून त्याने एक हिसडा देऊन तिचे वस्त्र फाडून दूर फेकून दिले, आणि तिला धरणार इतक्यात त्याच्या पाठीत एक बाण येऊन घुसला व तो उताणा पडला. तो बाण त्याच्या छातीतून बाहेर आला.

ती दस्युकन्या नीलम घाबरली, गोंधळली, लाजली आणि आनंदित झाली. पल्लीपतीने तिचे नाव घेत, तिच्याकडे पहात तिचीच अभिलाषा धरून प्राण सोडला. देवव्रत पुढे येताच तिने चटकन ते फाटके वल्कल स्वत:भोवती धरले. बाण मृताच्या छातीतून उपसला, आणि त्याला मागे येण्यास सांगून तिथून पाय काढला.

झोपडीत येऊन पोहोचेपर्यंत रात्र झाली होती. घरात येताच त्याच्या पायाला विळखा घालून ती म्हणाली,

"जा, कुठं तरी दूर जा. रात्रीतल्या रात्रीत इथून दुसरीकडे जा! पल्लीपतीला बाणानं मृत्यू आलेला पाहताच दस्युसंघ तुम्हांला जिवंत ठेवणार नाही."

"तुला सोडून कुठं आणि कसा जाऊ?"

"इतकं माझं भाग्य आहे का?"

"पण तू आपल्या आप्तेष्टांना सोडून कशी येशील?"

"मला इथं कोण आहे? एकटी आई होती तीही मरून गेली."

"तू आमच्यासाठी वनवासाचे कष्ट सोसणार?"

"मला वनाची फार माहिती आहे. मी आपल्याला सुरक्षित दूर नेऊ शकेन."

"ऋतेचं कसं होणार? तिला कष्ट होतील आणि ..."

त्याला कसली आठवण झाली. तो एकदम विचारात का पडला हे तिला कळेना.

तिने जरा धीट होऊन विचारले,

"मग माझा स्वीकार केला ना?"

तिला उत्तर मिळाले नाही; पण काय हवे होते ते मिळाले. मध्यरात्रीला त्या तिघांनी ते मदनपल्लीचे वसतिस्थान सोडले. ताऱ्यांच्या प्रकाशात त्यांना वाट दिसली आणि वनातील देवतांनी त्यांचे रक्षण केले.

थोड्या वेळाने चंद्र उगवला. एकाएकी आपण अपरात्री कुठे आणि का जातो हे ऋतेला कळले नाही. तिच्या पायांना नीलेने वनस्पतींची सोपटे बांधली होती त्यामुळे त्यांना इजा झाली नाही. पण चालण्यामुळे तिला शीण आला. झाडीतून उघड्यावर येईपर्यंत देवव्रताला तिला उचलून घ्यावी लागली. ऋतेला त्या वेळी कितीतरी बरे वाटले. भीतीमुळे जणू काय ती त्याला अगदी बिलगली. पण त्याला कसेसेच वाटले. नीलम त्याच्या शेजारी चालत होती. तिला काय वाटले हे पाहणारे त्या गर्द झाडीत कोण होते?

त्या रात्री त्या उघड्या मैदानावर त्यांनी वसती केली. दुसरे दिवशी सबंध त्यांना चालावे लागले. संध्याकाळपर्यंत त्या वनाच्या सीमाप्रान्तावर त्यांना पोचणे भाग होते. वाटेत त्यांना एकदा पल्लीपतीची हत्या करणाऱ्या आर्यनष्टाच्या शोधात निघालेले लोक भेटलेच; पण नीलने एक अगदीच आडवाट धरून त्यांना चकविले. एक भरलेली नदी तरून जायचे होते. तर ऋतेला एका ओंडक्याला बांधून नीलमने पैलतीरी नेले. संध्याकाळी ते वन ओलांडून ते विंध्यगिरीच्या दक्षिण पायथ्याला आले. नीलमने एक दीर्घ निःश्वास सोडला व म्हटले, "आपण आता द्रव्वींच्या हातातून सुटलो. पण यापुढं मला माहिती नाही." त्या रात्री तेथे विश्रांती झाली. दुसरे दिवशी उजाडताच देवव्रताला आपण पूर्वी आर्यकुलाबरोबर इथून गेल्याचे आठवले व त्या अनुरोधाने तो त्या दोघींसह डोंगर चढू लागला. वन्य फळेमुळे भक्षण करावी, झाडाखाली राहावे, हळूहळू मार्ग आक्रमावा असे चालले होते.

अशीच एक खिंड चढून ते वर आले होते. सूर्य अस्ताच्या बाजूला फार कलला असल्यामुळे पुढे जाणे शक्य नव्हते. एका जलाशयाच्या शेजारी त्यांनी राहण्याचे ठरविले. नीलम जवळपासची फळे गोळा करण्यास गेली. देवव्रत तिथेच बसून राहिला. ऋता जलाशयावर पाणी पिण्यास गेली.

चढण्याच्या श्रमाने तिला फार थकवा आला होता. पाणी पिऊन आल्यावर ती त्याच्याजवळ आली आणि म्हणाली, "पल्लीपतीला कशासाठी मारलं?"

देवव्रताने उत्तर दिले नाही. ती तिथेच आडवी झाली व आळोखेपिळोखे देऊ लागली.

"नीलम किती तरी चांगली आहे, नाही? आपल्यासाठी ती किती श्रम करते?"

देवव्रताने उत्तर दिले नाही.

"आता तिला आपली भाषा येऊ लागली. मला ती म्हणत होती, ऋते, तू किती गोड आहेस."

देवव्रत खळखळणाऱ्या ओढ्याच्या पाण्यावर उन्हाने जी चमक उत्पन्न केली होती तिकडे पाहत होता.

"ती मला फार आवडते."

देवव्रताने एकदा तिच्याकडे वळून पाहिले. ती त्याच्या जवळ सरकून म्हणाली,

"मी तुझ्या अंकावर डोके ठेवून निजू का?"

त्याने काही उत्तर दिले नाही; पण तिने जेव्हा त्याच्या अंकावर डोके ठेवले तेव्हा त्याने तिच्या केसांवरून हात फिरवला. थोड्या वेळात तिला गाढ झोप लागली.

अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे किरण तिच्या डोळ्यांवर आले म्हणून ती जागी झाली. तिच्या कानांवर काही शब्द आले; पण त्यांचा तिला अर्थ समजला नाही. तिने किंचित मान वळवली, डोळे उघडले आणि पाहिले, की नीलम धावत येऊन त्याच्या दुसऱ्या अंकावर बसली. तिने काही फळे त्याच्या तोंडात घातली व ते बंद केले. "ही तुसरीची फळं बरं का, मला फार आवडतात ती!"

तो तिच्या गालावर कुजबुजला,

"ऋता माझ्याजवळ निजली आहे ना?"

त्या दोघांची मुखे आपल्याकडे वळत आहेत असे पाहून ऋतेने डोळे मिटून घेतले. देवव्रताने तिचे डोके हलकेच उचलून चर्माच्या घडीवर ठेवले. नीलमने तिच्या गालांवर हात फिरवून म्हटले,

"किती नाजूक आणि सुंदर आहे नाही ऋता? हिच्या जवळ नेहमी राहावंसं वाटतं."

यानंतर ती दुसरीकडे कुठे निघून गेली. ऋतेने त्यांना हातात हात घालून जाताना पाहिले. अस्ताला जाणाऱ्या सूर्याने तिच्या गालांवर मोत्यांचे सर पाहिले.

दुसरे दिवशी सकाळी एक कडा चढून जायचा होता. ऋता आज मोठ्या उत्साहाने चढत होती. एकदा ती नीलमचा हात धरी, एकदा देवव्रताचा धरी, एखादे वेळी दोघांचेही हात धरी. "अवघड वाट असली म्हणजे कोणाचा तरी आधार लागतो, नाही?" ती म्हणाली.

"जपून चाला; खाली फार भयंकर दरी आहे," नीलम म्हणाली.

ऋतेने वाकून पाहिले व म्हटले, "अग बाई ग!" थोडा वेळ चालल्यानंतर म्हणाली, "मला ही भयंकर दरी पाहून घेरी येत आहे. तुम्ही दोघं मिळून मला सावरा."

त्या दोघांनी एकमेकांच्या हातात हात घातले आणि त्यावर रेलून दोघांच्या खांद्यावर हात ठेवून ती जात होती. एका अति अवघड स्थळी ती आली तोच नीलमच्या हाताला हिसका बसला. त्यासरशी ती देवव्रताच्या वक्षःस्थळावर जाऊन पडली आणि त्यांच्या कानावर वाणी आली, "तुम्ही उभयतांनी सुखी व्हावं यासाठी ऋतेचं जीवित होतं!"

देवव्रत व नीलम स्तिमित होऊन पाहू लागली तो त्या दरीतून वाहणाऱ्या निर्झरात काही पडल्याचा आवाज सातवार प्रतिध्वनित झाला. पुढे त्यांचे काय झाले ही हकीकत त्या वनाइतकी, त्या रात्रीइतकी, आणि त्या कालाइतकीच अज्ञात आहे.

दोन

# माणूस जगतो कशासाठी?

**ना. सी. फडके**

'टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्...टक् टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्...'

टाइपरायटरची ही कटकट जगाच्या अंतापर्यंत किंवा निदान आपल्या स्वतःच्या जीविताच्या अंतापर्यंत - कधी संपणारच नाही असे भास्करला त्या क्षणी वाटले.

एकीकडे त्याच्या दोन्ही हातांची बोटे त्याच्या पुढच्या टाइपरायटरच्या चाव्यांवर वेगाने चालली होती, आणि एकीकडे स्वतःच्या आयुष्याचे क्षुद्रत्व आणि वैयर्थ्य त्याच्या मनात घोळत होते.

त्याच्या मागे, पुढे, चहूकडे टायपिस्ट बसले होते, आणि जो तो घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणे खाली मान करून दाही बोटांनी आवाज करीत होता.

'टक् टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्...'

बाहेर मुसळधार पाऊस पडत होता. दिवसाचे दोन वाजले असूनही असा काळोख पडला होता, की सॉलिसिटरच्या त्या ऑफिसातले सारे विजेचे दिवे चालू केले होते; पण कितीही कृत्रिम प्रकाश पडला तरी खऱ्या सूर्यप्रकाशाची सर त्याला येणे शक्य नाही हे स्पष्ट भासत होते. मधूनच सोसाट्याच्या वाऱ्याचा झोत आला, की पावसाच्या पाण्याचे फवारे खिडक्यांवाटे आत येत होते, आणि क्वचित विजेच्या बत्त्याही हिंदकळून कारकुनांच्या सावल्या वाकड्यातिकड्या हलून एकमेकींत मिसळत होत्या. पण त्या सावल्यांकडे अगर एकमेकांकडे पाहायला त्या कारकुनांना वेळ नव्हता. वाऱ्याने फडफडणारे कागद सावरण्यापुरतेच ते काय थांबत असतील तेवढेच; बाकी त्यांचे हात यंत्रावर वेगाने चालू होते. शेकडो कज्ज्यांतल्या शेकडो कागदांच्या नकला तयार होत होत्या. कुणाच्या यंत्रावर लाखो रुपयांच्या इस्टेटीचे वर्णन तयार होत होते; कुणाच्या यंत्रावर वेश्येने केलेली पोटगीची कैफियत तयार होत होती; कुणाच्या यंत्रावर दत्तकाच्या दाव्यातले मुद्दे नमूद केले जात होते; पण या साऱ्या अनेकविध घटनांचे सार त्या कारकुनांच्या दृष्टीने एकच होते -

'टक् टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्!'

भास्करची बोटे दुखू लागली, आणि त्याच्या कानांना तो आवाज असह्य झाला. त्या आवाजापुढे पावसाच्या सरींचा आवाजसुद्धा त्याला ऐकू येत नव्हता. त्या साऱ्या इमारतीत, इतकेच नव्हे, तर साऱ्या विश्वात तो एकच आवाज भरलेला आहे की काय असा भ्रम त्याला

आताशा नेहमी होत असे; आणि त्या विचित्र, एकाच सुरातल्या आवाजाची त्याला अगदी किळस आली होती.

तो आवाज म्हणजे आपल्या क्षुद्र, कष्टी आयुष्याचे थोडक्यात सार आहे असे त्याला वाटे.

तो पुनःपुन्हा दचकून क्षणभर थांबे, व उजव्या अंगठ्याने डाव्या हाताची, आणि डाव्या अंगठ्याने उजव्या हाताची बोटे मोडीत स्वतःशी म्हणे, 'माणूस कशासाठी जिवंत राहतो कुणास ठाऊक!'

तीन वर्षांपूर्वी सॉलिसिटरच्या या ऑफिसात तो टायपिस्ट म्हणून नोकरीस राहिला होता. त्या वेळेपासून दोन वेळा बढती मिळून त्याला आता पंचावन्न रुपये पगार मिळत असे. तो माटुंग्याला एका चाळीच्या तळमजल्यावर लहानश्या खोलीत राहत असे आणि तिथल्याच एका स्वस्त खाणावळीत जेवत असे. तरी त्याला तीसपस्तीस रुपये महिन्याकाठी लागत, आणि उरलेले पैसे साताऱ्यास त्याचे म्हातारे आईबाप, दोन विधवा बहिणी आणि चार धाकटी भावंडे होती त्यांच्यासाठी त्याला धाडावे लागत.

दहा वाजल्यापासून तो सहा वाजेपर्यंत त्याचा वेळ टाइपरायटरवर बोटे हापटण्यात जात असे, आणि बाकीचा वेळ कसा जात असे ते त्याचे त्यालाच कळत नसे. साऱ्या शरीराला आणि मनाला शीण येईपर्यंत कचेरीत श्रम करावेत, आणि चार घास पोटात घालून व हुश् हुश् करीत अंथरुणावर काही घटका काढून सकाळी पुन्हा कामाच्या घाण्यावर रुजू व्हावे, यापलीकडे भास्करला कसली जाणीवच नव्हती.

सकाळी ठरीव वेळेस मेडोज स्ट्रीटमधल्या कोंदट इमारतीतल्या त्या कचेरीत दाखल होताच त्याच्या अंगावर शहारे येत. ते तो कसेबसे सहन करी आणि टाइपरायटरचे झाकण उघडून तो आपली बोटे चालवू लागे -

'टक् टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्...'

कधीकधी भोवतालच्या त्या समव्यवसायी टायपिस्टांकडे पाहून तो मनाशी विचार करी,

'यांनाही माझ्यासारखंच हे जीवित असह्य झालेलं नाही का! यांनाही माझ्याइतकाच पगार मिळतो. यांनाही माझ्यासारख्या संसाराच्या कमी-अधिक जबाबदाऱ्या असल्याच पाहिजेत. यांचेही हात माझ्यासारखे शिणत असले पाहिजेत. रात्रंदिवस कष्ट करूनही रक्तपितीसारखं अंगाला चिकटलेलं दारिद्र्य यांनाही तळमळायला लावीत असलंच पाहिजे! मग हे बेटे सारे जगतात कशासाठी? असल्या या क्षुद्र, सुखहीन, तिरस्करणीय जीवनाचा यांना संताप आणखी कंटाळा कसा येत नाही? काही कळत नाही!'

'काही कळत नाही!' हा त्याच्या विचारमालिकेचा समारोप ठरून गेल्यासारखा झाला होता.

आजही तेच उद्गार त्याने मनाशी काढले आणि क्षणभर त्या सर्व लोकांकडे निरखून दृष्टी टाकली.

अगदी चूर होते सगळे आपापल्या कामात!

'टक् टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्!'

भास्करने एकदा लहानपणी एक कापडाची गिरणी पाहिली होती. तेथे प्रत्येक मागावर स्त्रीपुरुष कामकरी असेच कामात गुंग झालेले त्याला दिसले होते. त्यांची त्याला एकाएकी आठवण झाली, आणि त्याच्या विचारांचा कडूपणा अधिकच वाढला.

त्याच्या मनात आले,

'या इतरांचं काहीही असो, मला आता हे सहन होत नाही. मी आपल्या जिवाचा आज अंत करणार!'

आत्मघाताच्या या विचारात आता त्याला भयंकर असे काही वाटेनासे झाले होते. जगण्याची त्याला विलक्षण किळस आली होती, म्हणूनही कदाचित असे असेल.

काही असो; भास्करने आत्मघाताचा विचार ठरविला एवढेच खरे.

उद्या या नरकवासात हजर व्हायला जिवंतच राहायचं नाही असा त्याने निश्चय केला.

आणि काय चमत्कार पाहा, मनाशी हा निश्चय करताच त्याने परत आपल्या टेबलावरच्या कागदांची चाळवाचाळव केली, आणि पुन्हा टाइपरायटरवर बोटे चालविण्यास प्रारंभ केला. जणू अंगात भिनलेली सवय त्याला म्हणाली, 'उद्या मेलेला असणार आहेस. ते उद्याचं उद्या पाहू; पण आजची हमाली तर पुरी करशील?'

मग तो किती वेळ टाइप करीत राहिला कुणास ठाऊक! मात्र एकीकडे टाइप करीत असताना, दुसरीकडे त्याने मनाशी विचार चालविला होता 'जीव तर द्यायचा; पण तो कसा द्यायचा बुवा? आपल्याला तर अगदीच प्रॅक्टीस नाही!'

आजपर्यंत वाचलेल्या आत्महत्येच्या हकीकती त्याने आठवून पाहिल्या. पाणी, गळफास, अग्नी, विष कितीतरी साधने होती आत्मघात करायला.

पण भास्करने एकेकाचा जो जो विचार केला, तो तो त्यांपैकी कोणतेच सोपे नाही असे त्याला वाटू लागले.

शेवटी त्याने त्रासून मनाशी ठरविले,

'जाऊ द्या. आजचं हे काम एवढं पुरं करून टाकू अन् ऑफिसातनं सुटलो, की कशा रीतीनं जीव द्यायचा ते निवांतपणी ठरवू.'

मग तो आपल्या कामात मग्न झाला, आणि पहिल्याप्रमाणेच 'टक् टक् टक्...टिक् टिक् टिक् ...ठण्' या एकाच आवाजाने त्याने सारे विश्व व्यापले गेले.

ऑफिस सुटताच कुणाशीही न बोलता घरी जाण्याचा त्याचा बेत होता; पण त्याच्या पलीकडच्या टेबलावर बसणारा बॅनर्जी नावाचा एक टायपिस्ट होता, त्याने त्याला हटकून म्हटले,

"काय मिस्टर दामले, चहा घ्यायला येणार का इराण्याच्या हॉटेलात?"

"नको. Thank you."

"बरं, आईस्क्रीम घ्या."

"No. Thank you."

"अहो, आज आईस्क्रीम देतो आहे. उद्या कदाचित बडी फीस्ट देईन मी तुम्हांला."

"बरं, समजलं."

"चेष्टा नाही अं! उद्या या घटकेला कदाचित लाखोपती होईन मी!"

"म्हणजे?"

"अरे, डर्बीचं तिकीट घेतलं आहे. उद्या निकाल आहे. मिस्टर दामले, तुम्ही नाही घेऊ एखादं तिकीट?"

भास्करने बॅनर्जीकडे पाहिले. जंगी फुगीर पोटाची, वातुळ देहाची ती स्वारी आपल्या पाच नंबरच्या चष्म्यातून आपल्याकडे बघून पिवळट दातांची कवळी का विचकते आहे त्याला कळेना!

तो एकदम म्हणाला,

"आज काढणार आहे मी एक मोठं तिकीट!"

"आज? आता कुठलं मिळणार? You're too late." बॅनर्जीचे लठ्ठ पोट हसण्याने गदगदले.

यावर भास्करने विचित्र मुद्रा केली, आणि तेथून पाय काढला.

रस्त्यात येताच तो मनाशी म्हणाला,

'ठीक, आता आपल्याला कुणाचा उपसर्ग नाही. कसं मरायचं ते ठरवून टाकलं पाहिजे.'

पाणी, गळफास, आणि आग यांपैकी एकही भानगड आपल्याला साधायची नाही असे त्याला वाटले.

विषाबद्दल तो विचार करू लागला, पण काही वेळ विषारी पदार्थांची नावेच आठवेनात, व ती आठवली तरी ते पदार्थ कसे मिळवायचे त्याची त्याला कल्पना होईना. अफूच्या दुकानात सरळ जाऊन अफू कशी मागायची? किंवा एखाद्या विलायती औषधांच्या दुकानात जाऊन विषारी पदार्थ कसा मागायचा? दुकानदाराने कशाला, काय असे चौकस प्रश्न केले, की आपण खास घाबरून जाऊ असे भास्करला वाटले...

त्याची मती नीटशी चालेना.

मरायचं ठरवलं तरी ते वाटतं तितकं सोपं नाही याचा त्याला विलक्षण चमत्कार वाटला.

त्याने आजूबाजूस पाहिले, जो तो मरायचं टाळीत होता. मोटारी, ट्रॅमगाड्या असे कितीतरी यमदूत लोकांच्यावर चाल करून जात होते; आणि त्यांच्या हल्ल्यातून लोक सफाईने आणि मोठ्या तत्परतेने आपापला बचाव करून घेत होते. कुष्ठ रोगाने पीडलेल्या एका आंधळ्या म्हाताऱ्यानेसुद्धा एका मोठ्या लॉरीचे शिंग वाजताच टण्‌दिशी बाजूच्या फूटपाथवर उडी मारली ते त्याच्या पाहण्यात आले.

त्या दुर्दैवी माणसालासुद्धा जगावेसे वाटत होते!

माणूस कशासाठी जगतो?

हा प्रश्न भास्करला आज कित्येक दिवस कूटप्रश्नासारखा वाटत होता, आणि तोच त्या क्षणी तीव्रतेने त्याच्या मनात उद्भवला.

पण पुन्हा स्वतःच्या आत्महत्येच्या बेताची त्याला आठवण झाली, व तो विचार करू लागला...

विचार करू लागला याचा अर्थ मघाशी त्याला जे काही सुचेनासे झाले होते तेच पुन्हा होऊ लागले. आत्महत्येचे साधन त्याला ठरविता येईना...

चर्चगेट स्टेशनवर जाऊन लोकलमध्ये बसल्याबरोबर मात्र त्याला एकदम एक कल्पना सुचली –

आपण आगगाडीखाली पडलो तर? –

यात काही विकत घ्यायला नको, किंवा फार वेळ यातनाही भोगायला नकोत. एका क्षणात आपल्या शरीराचा चक्काचूर होईल!

ही कल्पना त्याला पटली.

व मग आगगाडीखाली पडायचे ते सुद्धा अगदी कुणाच्याही लक्षात येणार नाही अशा प्रकारे कोठे व केव्हा पडायचे ते तो ठरवू लागला.

तो ज्या चाळीत राहत असे तेथून दहापंधरा मिनिटांच्या अंतरावर एक रेल्वेचे फाटक होते. भरवस्तीपासून ते बरेच दूर होते. तेथून रात्री सुमारे पावणे अकरा वाजता एक फास्ट लोकल जात असे.

भास्करने सर्व प्रकारे विचार करून त्या फाटकाजवळ त्या गाडीखाली पडावयाचे ठरविले.

त्याने आपल्या आजूबाजूच्या लोकांकडे वळून पाहिले, व तसे पाहताच आपल्या स्वतःच्या निश्चयाचा भयंकरपणा त्याच्या लक्षात आला.

त्याच्या शेजारी एक इसम संध्याकाळचे 'बॉम्बे सेंटिनल' वाचीत होता. तो पत्रातील काही मजकूर दाखवीत आपल्या सवंगड्याला म्हणाला,

"हे पाहिलंत का हो?"

"काय हो?"

"जर्मनीनं एक नवी तोफ तयार केली आहे म्हणे. तिच्या सहाय्यानं विमानातून हल्ला केला, की लंडन शहराएवढं एक शहर दहा मिनिटांत बेचिराख करता येईल म्हणतात!"

"खरं की काय? अरे बापरे!"

भास्कर मनाशी म्हणाला,

"जर्मन लोक चिरायू होवोत!"

तो माटुंग्याच्या स्टेशनवर उतरला, तेव्हा पावसाची सर चालूच होती. मोठा डांबरी रस्ता ओलांडून बाजाररस्त्याने तो आपल्या चाळीच्या गल्लीत वळला तेव्हा तेथे पावसाचे पाणी गुडघागुडघा साठले होते असे त्याला दिसून आले. सारी माणसे त्या पाण्यातून जात-येत होती, व आजूबाजूच्या दुकानांतल्या दिव्यांमुळे त्या माणसांच्या सावल्या त्या पाण्यावर काही वेळ हेलकावे खाताना दिसत होत्या. हॉटेलातल्या तळकटांची घाण सुटली होती. एके ठिकाणी पिठाची लहानशी गिरणी होती. तेथे दोन लहान मुले दारात उभी राहिलेली दिसली; त्यांचे सर्वांग व चेहरे पिठाने माखले जाऊन ती सोंगासारखी दिसत होती, आणि पुढे एके ठिकाणी

एका दूधवाल्याच्या दुकानातला छोकरा पितळेची भांडी घासून साफ करता करता रस्त्यातल्या पाण्यात तोंडातल्या पानतंबाखूच्या पिचकाऱ्या टाकीत होता.

ती सारी दृश्ये पाहून भास्करला वाटले, जर्मन लोक विमानातून या ठिकाणी येऊन आपली तोफ उडवतील तर काय छान होईल! काय हे दारिद्र्य! काय ही घाण! काय हे आयुष्य! कशासाठी जगताहेत हे सारे लोक? त्यांना मरावंसं का वाटत नाही? आणि यांना मरावंसं वाटत नसलं तर कोणी यांना सक्तीनं मारून टाकलं तर काय वाईट? ...

तो खोलीत पोचला, व कपडे काढून हातपाय स्वच्छ धुतल्यावर काही वेळ चटईवर स्वस्थ पडून राहिला.

घटकाभराने त्याला वाटले, खाणावळीत जाऊन जेवून यावे.

पण पुन्हा त्याला वाटले, आता आपण जेवलो काय, अन् न जेवलो काय सारखेच. आपले जेवणखाण कायमचे संपायला आता कितीसा अवकाश?

पण पुन्हा त्याच्या मनात काय आले कुणास ठाऊक, तो उठला आणि खुंटीवरचा कोट घेऊन चालू लागला. त्याने मनाशी ठरविले, की खाणावळीत जाऊन जेवावे आणि मग खोलीकडे परत न येता सावकाश फिरत रेल्वेच्या फाटकाकडे जावे, आणि घ्यावा निरोप या सगळ्या कटकटीचा आणि जंजाळाचा! –

तो खोलीबाहेर पडला व खाणावळीच्या वाटेला लागला.

खाणावळीच्या दारात त्याचा पाय एका बेटकुळीवर पडत होता, पण तितक्यात त्या एवढ्याशा बेटकुळीने उडी मारली, व मग तशाच आणखी एकदोन उड्या मारून ती पलीकडच्या सांडपाण्याच्या खळग्यात शिरली.

तिचीसुद्धा मरायची इच्छा नव्हती!

भास्करला त्याचे मोठे नवल वाटले.

जिकडे तिकडे जगण्याची ही प्रक्रिया कशासाठी चालली आहे त्याला कळेना ....

एखाद्या यंत्रासारखे जेवण उरकून तो खाणावळीबाहेर पडला व चालू लागला.

आता पावसाची सर अजिबात थांबली होती. आभाळसुद्धा बरेचसे निरभ्र झाले होते, आणि काही ठिकाणी चांदण्या स्पष्ट दिसू लागल्या होत्या.

भास्करने जे रेल्वेचे फाटक मनाशी ठरविले होते, तेथे पोचायसाठी गावची सबंध वस्ती ओलांडून जाणे भाग होते.

त्याने दोन रस्ते ओलांडले. तिसऱ्या रस्त्याला लागताच उजव्या हाताच्या एका बंगलीपुढे बरेचसे लोक जमलेले त्याला दिसले. बंगलीत दिव्यांची झगझगीत रोषणाई झालेली दिसत होती. तो जवळ गेला तेव्हा त्याला गाण्याचे व सारंगीचे स्वर ऐकू आले.

"काय हो, काय आहे गडबड?" बंगलीसमोर जमलेल्या गर्दीतल्या एका माणसाला त्याने विचारले.

"गडबड? हं:!"

असे म्हणून जणू भास्करची त्याच्या विचित्र प्रश्नाबद्दल कीव आल्याचे त्या माणसाने दर्शविले व मान उंच करून तो अगदी एकाग्र चित्ताने गाणे ऐकू लागला.

भास्करने दुसऱ्या एका गृहस्थाला विचारले,

"काय हो, काय गडबड आहे?"

"स्! ... थांबा हो."

यापलीकडे त्याही गृहस्थाने काही उत्तर दिले नाही.

रस्त्यावर जमलेली ती सगळी माणसे माडीवरून ऐकू येणारे गाणे ऐकण्यात अगदी तल्लीन झालेली दिसली.

भास्करही अंमळ उभा राहिला –

आणि काही वेळाने तसे उभे राहिल्यावर त्याचीही स्थिती गर्दीतल्या त्या लोकांसारखीच झाली. त्या गाण्याने त्यालाही बेभान करून टाकले!

भास्करला गाण्यातली समज अशी काहीच नव्हती. ऐकू येणाऱ्या गाण्याचा कोठला राग आणि कोठला ताल होता, त्याची यत्किंचितही जाणीव नव्हती; पण त्या गाण्याच्या माधुर्यात त्याची सगळीच जाणीव हरपली एवढे खास!

किती मधुर स्वरमालांच्या लहरींवर लहरी त्या माडीतून बाहेर पडत होत्या, आणि सारे अंतराळ व्यापून टाकीत होत्या! एक लकेर संपताच तिच्या पाठोपाठ दुसरी लकेर निघे, आणि पहिलीच्या रेंगाळणाऱ्या मधुर ध्वनीत मिसळून जाई. श्रुतिमनोहर झंकारांची विलक्षण गर्दी होऊन गेली होती. जिकडेतिकडे दिव्य स्वरांची कारंजी फुटल्यासारखे झाले होते. कोठल्यातरी विस्तीर्ण उपवनातल्या असंख्य फुलवेली बहरल्या होत्या. कोठेतरी नानाविध सुगंधांचे घडेच्या घडे सांडले जाऊन त्यांचा परिमल आकाशात भिडून गेला होता. कसल्यातरी अवर्णनीय सुखसंवेदनेचे तरंग जिकडे तिकडे उठून त्यांवर सारी सृष्टी हेलकावत होती.

भास्कर ते गाणे ऐकत तेथे किती वेळ उभा राहिला ते त्याचे त्यालाच कळले नाही. अखेर गाणे बंद होऊन तो ज्या गर्दीत उभा होता ती विस्कळीत होऊ लागली तेव्हा तो शुद्धीवर आला. आतापर्यंत त्याच्या स्मरणातून पार गेलेली एक गोष्ट त्याला मग एकदम आठवली.

आपल्याला आत्महत्या करण्यासाठी रेल्वेच्या फाटकाकडे जायचे आहे!

तितक्यात त्याच्या जवळच्या एका माणसाने दुसऱ्याला विचारले,

"किती वाजले हो?"

दुसऱ्याने उत्तर दिले,

"साडेअकरा!"

ते ऐकताच भास्कर एकदम विलक्षण चपापला.

"साडेअकरा?"

'म्हणजे आपण ज्या गाडीखाली आत्महत्या करणार होतो ती केव्हाच निघून गेली तर!–'

"आता काय करावं?"

पण या प्रश्नात वास्तविक असावयास पाहिजे तितकी बोच भास्करच्या अनुभवाला आली नाही.

का कुणास ठाऊक, आत्महत्या करण्याचा त्याचा निर्धार त्याच्या मनातून गळून पडल्यासारखे झाले होते. त्या विचाराची तीव्रता नाहीशी झाली होती. किंबहुना, तो विचार आपण केला नव्हता तर दुसऱ्याच कोणीतरी फार वर्षांपूर्वी केव्हातरी केला होता असा विचित्र भास भास्करला झाला!

तो काही वेळ तसाच जागच्या जागी उभा राहिला. वर माडीवर सगळी मंडळी एकदम खो खो हसली ते त्याने ऐकले, व मग एखाद्या यंत्रासारखा तो परत आपल्या खोलीच्या वाटेस लागला.

दुसऱ्या दिवशी हवा पार बदलली होती!

वर्षा ऋतूचा कुणाला संशयही येऊ नये इतके आभाळ स्वच्छ होते. सूर्यप्रकाशाने सारी सृष्टी प्रफुल्ल झाली होती. वारा वाहात होता तोसुद्धा कालचा सारा दांडगेपणा टाकून अगदी बेताने. भास्करच्या चाळीपुढच्या गल्लीतील सारी घाण आणि सांडपाणी नाहीसे झाले होते, आणि समोरच्या चाळीत एका पारश्याच्या घरात कसल्यातरी निमित्ताने खूप चंदन जाळण्यात येत होते, त्याचा दरवळ जिकडे तिकडे सुटला होता.

भास्कर रोजच्याप्रमाणे दहा वाजता ऑफिसात आपल्या खुर्चीवर जाऊन बसला, व टाइपरायटरचे झाकण उघडू लागला.

तितक्यात दुसरा एक टायपिस्ट त्याच्याजवळ येऊन म्हणाला,

"दामले, अरे बातमी ऐकलीस का?"

"काय रे बुवा?"

"अरे, आपला बॅनर्जी मेला!"

झाकणावरचा हात तसाच ठेवून भास्करने विचारले,

"काय सांगतोस काय भलतंच? काल संध्याकाळी तो चांगला माझ्याशी बोलला –"

"मग नाही कोण म्हणतो?"

"अरे, मग मेला केव्हा?"

"आज सकाळी!"

"आत्महत्या केलीन् की काय?"

"काय वेडा आहेस! आत्महत्या करणं सोपं का आहे?"

"मग कसं म्हणतोस?"

"अरे, त्यानं डर्बीचं तिकीट काढलं होतंन्. त्या तिकिटावर एक लाख रुपये त्याला मिळाल्याची आज सकाळी तार आली, अन् ती येताच हर्षातिशयाचा धक्का बसून बॅनर्जीची हृदयक्रिया बंद पडली, अन् स्वारी आटपली! आधीच भयंकर लठ्ठ होती स्वारी. नेहमी श्वास लागत असे त्याला, माहीतच आहे तुला.'

तो टायपिस्ट आणखी काय म्हणाला ते भास्करला ऐकू आले नाही. त्याने सांगितलेली बातमी ऐकल्यापासून भास्करच्या बुद्धीने चांगलीच चक्कर खाल्ली होती.

ज्या क्षणी बॅनर्जीला खूपखूप जगावे असे वाटलेच असले पाहिजे, त्याच क्षणी बिचाऱ्याचा प्राण नाहीसा झाला होता! ...

आपण काल प्राण द्यावयाचे ठरविले असूनही तो न देता आज आपल्या कामावर हजर आहोत! ...

आणि आपल्यापेक्षाही अनेक पटींनी हतभागी असलेले कितीतरी जीव आपल्या क्षुद्र जीविताला अगदी चिकटून, बिलगून काळ कंठीत आहेत!

माणूस मरतो का? –

का कसले! ती गोष्ट त्याच्या हातातली नाही! ...

माणूस जगतो कशासाठी! –

कुणास ठाऊक?

कदाचित तीही गोष्ट त्याच्या हातातली नाही म्हणून! ... कोठल्या तरी गूढ प्रेरणेच्या लाटेसरशी पुढे पुढे ढकलले जाण्यापलीकडे त्याच्या हातात काहीच नाही म्हणून! ...

भास्करने टाइपरायटरचे झाकण पुरते उघडले. डाव्या हाताची कागदांची चवड व्यवस्थित जुळविली; आणि वरच्या कागदातला मजकूर पाहून बोटे चालविण्यास प्रारंभ केला,

'टक् टक् टक्...टिक् टिक् टिक्...ठण्...!'

तीन

# मुके प्रेम

## वि. स. खांडेकर

'बॅ-बॅ-बॅ' अंगठा नसलेल्या उजव्या हाताने जयरामची पैरण ओढणाऱ्या त्या मुलाच्या तोंडून एकच अक्षर सारखे निघत होते. जणू काय 'बें-एं-एं' करून आईला हाक मारणारे कोकरू अगर 'म्यांव म्यांव' करीत दूध मागणारे मांजरच! एकच करुण स्वर! 'बॅ-बॅ-बॅ.'

कामाच्या वेळी मांजर पायाला अंग घासू लागले की त्याचा कसा राग येतो! जयरामाला त्या मुक्याचा तसाच संताप आला. त्याने डोळे वटारले आणि पैरण त्याच्या हातून हिसकावून घेऊन तो आपला पोशाख चढवू लागला. त्या मुक्या मुलाचे डोळे भरून आले. त्याचे मन जाणण्याच्या स्थितीत जयराम होता कुठे?

पोस्टाचे मळकट खाकी कपडे तो एका महिन्याने आज अंगात घालीत होता. ते घालता घालता बायकोचे एक वाक्य त्याला आठवले अन् - आज आपणाला नोकरीवर रुजू व्हायचे आहे ही गोष्ट तो क्षणभर विसरून गेला. आठवण काही विलक्षण नव्हती अशी; पण आवडत्या माणसाचे साधे पत्रही मनुष्य जपून ठेवतोच की नाही? आठवण म्हणजे तरी काय? मनाला आलेले पत्र!

पाच-सहा वर्षांपूर्वीची गोष्ट. मुक्याच्या वेळचे डोहाळे होते ते! कशावर म्हटल्या कशावरच वांच्छा जाईना तिची! दिवेलागणीला जयराम घरी आला की म्हणे, 'कशी काय राणीसाहेबांची तब्येत?' ती हसून त्याच्याकडे पाही आणि त्याला पाय धुवायला ऊन पाणी आणून देण्याकरिता घरात निघून जाई.

कितीही प्रयोग झाले तरी नाटकातल्या संवादांत जसा कधी बदल होत नाही त्याप्रमाणे जयरामचा प्रश्न आणि त्याच्या बायकोचे मुके उत्तर यांचा हा क्रम बरेच दिवस अखंड चालला होता. एके दिवशी मात्र ती हसून न जाता ओट्यावरच उभी राहिली. नाटकातल्या संवादात एका पात्राने ठरावीक वेळी ठरलेली कृती केली नाही की दुसरे पात्र जसे गोंधळून जाते तसे जयरामचे झाले. राणीसाहेबांचा बेत काय आहे तो त्याला कळेना!

शेवटी आश्चर्यचकित मुद्रेने त्याने विचारले, "कसल्या स्वारीचे बेत चालले आहेत मनात?" तिने न बोलता एक हस्तपत्रक त्याच्या हातात ठेवले. 'मानापमान' नाटकाची जाहिरात होती ती! त्या रात्री जयरामाच्या राणीसाहेबांनी राजेसाहेबांसह नाटकगृहावर स्वारी केली. दुसरे दिवशी सकाळी जयराम आपला पोस्टाचा पोशाख चढवून कामावर जायला निघाला; त्या वेळी राणीसाहेब त्याच्याकडे पाहून म्हणाल्या, "लढाईवर निघाले धैर्यधरजी."

हीच काय ती आठवण! पण जयरामाचे मन तिच्यात अगदी रंगून गेले. हजारो अद्भुत प्रसंगांनी भरलेल्या जगाला या साध्यासुध्या आठवणीची किंमत वाटली नसती! पण जयरामाला - समुद्राला एक जलबिंदू अगदी क्षुद्र वाटतो; पण अळवाचे पान त्यालाच मौक्तिक मानून आनंदाने अंगावर धारण करीत नाही का?

या आठवणीत जयराम रंगून गेला असताना मुक्याने त्याची पैरण ओढली आणि 'बॅ-बॅ-बॅ' हाक मारली. जयरामाला त्याचा असा राग आला! 'ती गेली आणि हे विद्रूप कारटं मात्र मागं राहिलं. याच्या उलट झालं असतं तर?' लगेच आपल्या दुष्ट मनाचा त्याला क्षणभर रागही आला; पण दुसऱ्याच क्षणी त्याला वाटले, 'सोन्यासारखी बायको गेली आणि हे खापर तेवढं घरात उरलं. जन्मभर हा धोंडा गळ्यात बांधून फिरलं पाहिजे आता!'

बायकोच्या आठवणीने त्याच्या डोळ्यांत पाणी उभे राहिले. हवापालटाने बरे वाटेल म्हणून महिन्यापूर्वी बायकोला तो तिच्या माहेरी घेऊन गेला. अवघा एक महिना! त्या वेळचा पावसाळा अजून सुरूच होता; पण जयरामाच्या आयुष्याचा मात्र याच अवधीत रखरखीत उन्हाळा झाला. जयरामाने करुण दृष्टीने घरातल्या सर्व वस्तूंकडे पाहिले. प्रत्येक वस्तू नव्या नव्या आठवणींचा घाव त्याच्या अंतःकरणावर घालू लागली. मुक्या माराप्रमाणे मुके दुःखही असह्य असते. अगदी ओक्साबोक्शी रडावे असे त्याला वाटू लागले. पण हृदय आभाळाप्रमाणे भरून आले होते तरी त्याच्या डोळ्यांतून एकही थेंब पडेना! अंतःकरणातल्या उकाड्याने त्याचे प्राण अगदी गुदमरून गेले. कोणी प्रेमाने जवळ बसले म्हणून आजार कमी होतो असे नाही; पण आजाऱ्याला तेवढ्यानेच किती बरे वाटते! जयरामाच्या दुःखी मनालाही अशाच सहानुभूतीची जरुरी होती. कुणीतरी आपल्या बायकोविषयी चौकशी करावी आणि डोळे पुशीत आपण गेल्या महिन्यातील सर्व हकीकत सांगावी अशी उत्कट इच्छा त्याच्या अंतःकरणात उत्पन्न झाली. त्याने इकडे तिकडे पाहिले. मुका कोपऱ्यात स्वस्थ बसला होता. 'आपल्या दुःखात हा कसला भागीदार होणार?' असा तुच्छतेचा विचार जयरामाच्या मनात आला! इंग्रजी शाळेतले शास्त्रीबोवा, मधल्या आळीतले ते कवी आणि 'मित्रमंडळ' क्लबाची मंडळी - सारे कसे अघळपघळ बोलतात आपल्याशी! आजच्या टपालात जर त्यांची पत्रे असली तर ही सारी माणसं 'काय जयराम, कुठं होती स्वारी गेला महिना?' असे विचारतील अन् मग आपण –

मुक्याकडे तिरस्काराने पाहून जयराम कामावर रुजू होण्याकरिता गेला.

तो खाकी पोशाख - त्यामुळे आठवलेले बायकोचे वाक्य - मुक्याने 'बॅ-बॅ-बॅ' करीत पैरण ओढणे - इत्यादी गोष्टींमुळे जयरामाला पोस्टात पोहोचायला पाच मिनिटे उशीर झाला. पोस्टात पाऊल टाकताच जयरामाच्या कानावर मास्तरांचे शब्द पडले, "आजपर्यंत काय कुणाच्या बायका मेल्याच नाहीत वाटतं जगात! पण याचं आपलं निराळंच सारं. कवी शिरले असतील आज अंगात!"

आपल्या अंगात कवी अगर भूत यांच्यापैकी कुणाचाच संचार झालेला नाही हे जयरामाला पक्के ठाऊक होते; पण प्रत्येक गोष्ट पाहिली की त्याला काही ना काही कल्पना सुचे आणि त्या कल्पनेचा संबंध - लांबून का होईना - त्याच्या बायकोच्या मृत्यूशी लागे. टपालातल्या पत्रांवर तो भराभर छाप मारीत होता. त्याला एकदम वाटलं - छाप म्हणजे मरण ! तिकिटावर छाप नाही तोपर्यंत ते चालतं. छाप बसला की संपलं सारं! तिकीट मरतं; पण ते काम संपवून मग मरतं. माणसं अशी मरतात का?

कोटाच्या बाहीने डोळ्यांतील पाणी पुसून जयरामाने आलेल्या टपालाची वर्गवारी केली. मुंबईहून आलेली दोन पत्रे - एक गावाच्या दक्षिण टोकाला द्यायचे तर दुसरे उत्तर टोकाला! मुंबईपासूनची दोघांची सोबत संपली नि आता पुन्हा उभ्या जन्मात गाठ नाही. माणसे आणि पत्रे यांची गत सारखीच नाही का? पण ही इतकी हाडामांसाची पत्र देव एकदम कुठे नेतो? कुणाला देतो? पुढे काय होतं त्यांचे? आपली बायको आता कुठे आहे? ती काय करीत असेल बरे?

सुन्न मनाने जयरामाने खाकेला पिशवी लावली व तो टपाल वाटायला निघाला. शास्त्रीबोवा, कवी, मित्रमंडळ, साऱ्यांची पत्रे होती आज पिशवीत. कोंडलेली वाफ बाहेर पडण्याकरिता जसे वरचे झाकण खडखड उडवू लागते त्याप्रमाणे सहानुभूतीच्या उत्कट इच्छेने त्याचे हृदय धडधड उडू लागले. प्रथम शाळा आली. शास्त्रीबोवा अजविलापाची गोष्ट वर्गात सांगत होते. जयरामाला पुढे जाण्याचे धैर्य झाले नाही. तो वर्गाबाहेर उभा राहिला. अजाच्या शोकाचे वर्णन ऐकताना त्याला जणू काही आपले दुःखच शास्त्रीबोवा वर्णन करून सांगत आहेत असा भास झाला. अजराजात अन् आपल्यात केवढे अंतर! पण दोघांची बायको मेलेली, दोघेही दुःखी! तिकडे शास्त्रीबोवा अजाच्या मुलाचे - रघुराजाचे - वर्णन करू लागले. ते ऐकताच जयरामाला आपल्या मुक्या मुलाचा असा तिटकारा वाटू लागला की ...

टपाल वाटायला उशीर होत आहे हे ध्यानात येऊन तो चपापला व शास्त्रीबोवांच्या वर्गात गेला.

"उशीर का बोवा टपालाला?" शास्त्रीबोवांनी पृच्छा केली. त्यांची बायको माहेरी गेली आहे हे जयरामाला कुठे ठाऊक होते?

"त - त- त-"

"त-त-त काय अन् च-च–च काय? उशिरा पत्रं मिळाली तर आजच्या बोटीनं त्यांची उत्तर जायची कशी?"

शास्त्रीबोवा वर्गाकडे पाहून हसले. त्यांना आपल्या नियमितपणाचा मोठा अभिमान होता. मग त्याचे प्रदर्शन करण्याची ही सोन्यासारखी संधी ते थोडेच दवडतात!

बिचारा जयराम जड पावलांनी शाळेतून बाहेर पडला. सहज खाली पाहता पाहता त्याचे लक्ष आपल्या पोशाखाकडे गेले. लगेच त्याला ते वाक्य आठवले - 'लढाईवर निघाले धैर्यधरजी' - जयरामाच्या डोळ्यांपुढे निराळेच 'मानापमान' नाचू लागले. धैर्यधर एखाद्या लढाईत मारला गेला की भामिनी तापाने मेली? त्याच्या मनातले हे विचार पोस्टमास्तरांना

कळले असते तर कवीप्रमाणे नाटककारांची एक पलटणही त्याच्या अंगात शिरली आहे असा त्यांनी तर्क केला असता.

मधली पत्रे देऊन जयराम कवीच्या घरापाशी आला. त्याला दुरून पाहताच कवी अंगणात धावतच आले. आपले सांत्वन करण्याकरिता त्यांनी चार पावले पुढे यावे याबद्दल जयरामाला कृतज्ञता वाटू लागली. आपल्या अंतःकरणात तुंबलेले दुःख आता मोकळे करायला मिळणार म्हणून त्याला आनंद झाला. टपाल द्यायचे आणि - कवींनी त्याच्या हातातून आपले टपाल जवळ जवळ हिसकावून घेतले. टपाल म्हणजे कुठल्याशा मासिकाचा फक्त एक अंक होता. त्यांनी घाईघाईने तो अंक फोडला आणि ते ओरडले, 'अग - ए-' त्या वीररसात्मक हाकेचा अर्थच जयरामाला कळेना! कवींनी सप्तमात स्वर चढवून हाक मारली, 'अग ए- ए-' 'ए' ने 'ओ' दिली व ती स्वयंपाकघराच्या पिछाडीवरून सोप्याच्या आघाडीवर आली.

"आली की कविता छापून!" कवी विजयानंदाने ओरडले. "छापली की अशी छान दिसते!" तव्यावरची भाकरी करपेल या भीतीने कविपत्नी स्वयंपाकघरात अंतर्धान पावली. पण कविवर्यांना ती गेल्याचे अगर जयराम उभा असल्याचे भान होते कुठे? ते मोठमोठ्याने ओरडू लागले ...

'सोडोनी सखये सुगंधकलिके जाशी कशी गे मला?'

जयराम कवींच्या गद्याचा भुकेलेला होता. पण ते पद्यप्रांतात शिरलेले पाहून त्याने आपली पाठ फिरवली. तो भराभरा पत्रे वाटीत चालला. मित्रमंडळाच्या इतक्या सभासदांपैकी कुणी ना कुणी तरी आपली चौकशी करील अशी त्याला खात्री होती. जाता जाता रस्त्यावर फुले विकायला बसलेल्या  बाया त्याने पाहिल्या! त्याच्या अंतःकरणाला विलक्षण वेदना झाल्या. फुले पूर्वीप्रमाणेच फुलत आहेत - हे गुलाब, ही सोनचाफी, त्या जुईच्या माळा; पण - पण आता फुले घेऊन काय करायची?

मित्रमंडळाच्या इमारतीजवळ तो आला. 'ठोका! कुणाचा आहे हा गुलाम?' वगैरे वरचे वीरश्रीयुक्त शब्द त्याला रस्त्यावरच ऐकू आले. पत्ते खेळायला बसलेल्या मंडळींपैकी कुणी ना कुणी तरी आपली चौकशी करणारच करणार, या खात्रीने तो जिन्याच्या पायऱ्या लगबग चढून वर गेला. त्याचे दुःख करटाप्रमाणे ठणकत होते; पण करट आपोआप फुटणे जसे बरे, त्याचप्रमाणे आपले दुःखही स्वाभाविक रीतीने बाहेर पडावे असे त्याला वाटत होते.

हातातले पत्र मित्रमंडळाच्या पेटीत टाकून तो उभा राहिला. पत्ते खेळणारे 'मित्र' महायुद्धातील शत्रूप्रमाणे गंभीर चेहऱ्याने लढण्यात गढून गेले होते. जग बुडाले असते तरीसुद्धा त्याची त्यांना या वेळी दाद लागली नसती! मग बिचाऱ्या जयरामाला कोण विचारतो?

डाव ऐन रंगात आला होता. एकाने बदामची राणी टाकली. आपली राणी सर आहे अशी त्याची खात्री होती; पण प्रतिपक्षाने राजा हातात राखून ठेवला होता, त्याचा राजा रणांगणात उतरला आणि - "हा घ्या राजा! मेली की नाही राणी?" अशी गर्जनाही लगेच ऐकू आली.

दुसऱ्या डावाची पिसणी सुरू झाली. जयरामाला पत्त्यांत काहीच कळत नव्हते. पण बोलायला काही तरी विषय पाहिजे म्हणून त्याने सहज विचारले,

"राजाने राणी कशी हो मारली मघाशी?"

"अरे, तू नाही का मारून आलास आपली? तशीच!" जखमेवर मलमाऐवजी मीठ चोळावे तसे जयरामाला झाले. काम संपवून तो पोस्टात परत आला. गावातले सर्व व्यवहार नित्याप्रमाणे चालले होते. पोस्टातून तो घरी परत यायला निघाला. सर्व काही जिथल्या तिथे होते. पण त्याच्या दृष्टीला ते असून नसल्यासारखे वाटत होते. आपल्या दुःखाचा भार आपणच सोसला पाहिजे, उभ्या जगात त्याला कोणी भागीदार नाही, या विचाराने त्याचे मन अत्यंत उदासवाणे होऊन गेले.

बिऱ्हाडाच्या दारातच मुका उभा होता. त्याने अंगठा नसलेला उजवा हात पुढे करून 'कुठं आहे?' असा मुका प्रश्न केला. तो आपल्याकडे खाऊबिऊ मागत असेल असे वाटून जयरामाने आपल्या खिशाकडे बोट दाखविले. मुका हसला व घरातले एक जुने लुगडे आणून त्याने 'कुठं आहे?' म्हणून पुन्हा हाताने विचारले. जयरामाकडून काहीच उत्तर मिळत नाही असे पाहून त्याने उजवा हात उंच करून हालविला. त्या लुगड्याची मालकीण मागून येत आहे की काय असे तो खुणेने विचारीत होता. डोळे पुशीत जयरामाने आकाशाकडे बोट दाखविले.

मुक्याने वर पाहिले आणि करुण मुद्रेने एकदम जयरामाच्या कमरेला विळखा घातला. विजेच्या प्रवाहाने निर्जीव अवयवांचे चलनवलन सुरू व्हावे तशी जयरामाच्या हृदयाची स्थिती झाली. त्याने अश्रू गाळीत मुक्याला पोटाशी धरले. त्याच्या दुःखाचा भार हळूहळू हलका होऊ लागला.

चार

# शेवग्याच्या शेंगा

**य. गो. जोशी**

वडिलांच्या अस्थी आळंदीला पोहोचवून श्रीनिवास आताच आला होता.

श्रीनिवासचे वडील दामोदरपंत हे एक धनाढ्य गृहस्थ होते. पाचपन्नास हजारांची इस्टेट. मुलगे तीन व मुली दोन. पैकी एकीचे लग्न झाले होते व एकीचे व्हायचे होते. श्रीनिवासच्या मातुःश्री पाचसहा वर्षांपूर्वीच स्वर्गवासी झाल्या होत्या. दामोदरपंतांची एकच इच्छा अपूर्ण राहिली होती, आणि ती म्हणजे त्यांच्या धाकट्या मुलीचे राहिलेले लग्न.

तिचे नाव तारका.

दामोदरपंतांच्या तिन्हीही मुलांची लग्ने झालेली होती. दामोदरपंतांनी आपले मृत्युपत्र करून ठेवले नव्हते. इस्टेट अवाढव्य. दामोदरपंतांच्या मृत्यूमुळे त्यांच्या सुनांची फार तारांबळ उडाली. सुनांना त्यांच्या त्यांच्या माहेरच्या माणसांकडून काहीतरी वानगी मिळे. त्यामुळे घरातले काही जिन्नस सुनांच्या माहेरी जाऊ लागले. काही दागिने लपून बसू लागले. लढाईनंतर विजयी पक्ष जशी लूटमार करतो त्याप्रमाणे घरात सावळागोंधळ माजला होता.

दामोदरपंतांच्या मुलांची नावे - श्रीनिवास, नारायण व अमृत.

ह्या तिघांचेही आपापसांत चांगले नव्हते. सर्वजण निराळे होण्याकरिता - दामोदरपंतांची इस्टेट स्वकष्टार्जित असल्यामुळे - त्यांच्या मृत्यूचीच वाट पाहत होते!

तारका साधी, सुंदर, एकमार्गी मुलगी होती. वय सुमारे चवदा. वयाच्या आठव्या वर्षीच मातृवियोग! तेव्हापासून तिचे निम्मे बोलणे कमी झाले. जे आईजवळच बोलायचे ते ती आता कोणाजवळ बोलणार? आईजवळ बोलायचे विचार मनात तसेच पडून राहत. तशा विचारांची तिच्या मनात बरीच अडगळ झाली आणि त्यामुळे तिच्या स्वभावात थोडा कुढेपणा आला!

तारकेची आई वारल्यानंतर पहिल्या वर्षी तिने दामोदरपंतांना फार त्रास दिला. नेहमी ती दामोदरपंतांजवळच असे. एक दिवस - वेडी पोर - दामोदरपंतांजवळ हट्ट घेऊन बसली, “आज माझी वेणी तुम्ही घाला!” दामोदरपंतांनी बरीच टाळाटाळ केली, पण करणार काय - तारकेचा तो बालिश हट्ट त्यांना पुरा करावा लागला!

आणि आता तर दामोदरपंतही नाहीसे झाले! त्यामुळे तारकेचे बोलण्याचे ठिकाणच नाहीसे झाले! अलीकडे तर ती मुकीच झाली होती म्हणानात!

तारकेच्या आईच्या देखत तिच्या एकाच भावाचे - श्रीनिवासचेच फक्त लग्न झाले होते. श्रीनिवासचे लग्न झाले आणि वर्षाच्या आतच तारकेच्या आईने इहलोकाची यात्रा संपविली होती. नंतर क्रमाक्रमाने राहिलेल्या दोन भावांची लग्ने झाली.

प्रत्येक भावाच्या लग्नात फक्त तारकेला आनंद होई आणि पुढे पश्चाताप होई! कारण ? -

लग्नसमारंभात परकेपणाने लाजणारी व भीतियुक्त आदराने तारकेकडे 'नणंदे'च्या नात्याने पाहणारी तिची वहिनी घरात आल्यावर घरधनिणीच्या नात्याने तोऱ्याने वागू लागे आणि तारका -

घरधनीण झालेली तिची वहिनी तिला म्हणे, "आज ना उद्या, तुम्ही या घरातून जाणार! तुम्हाला काय करायचं आहे आमच्या व्यवहारांत लक्ष घालून?"

याबद्दल क्वचित ती आपल्या भावाजवळ कागाळी नेत असे. पण सर्व भाऊ होते 'स्त्रियांचे कैवारी!'

भाग्यवान मुलींना संसाराची सुखस्वप्ने दिसू लागल्यामुळे आपले लग्न लौकर व्हावे असे वाटते; पण तारकेला या 'शब्दांच्या भडिमारा' मुळे आपण एकदा लग्न होऊन या घरातून केव्हा निघून जातो असे झाले होते!

हालते चालते वडील दिसेनासे झाले होते, आणि तिच्या वडिलांच्या- दामोदरपंतांच्या दिवाणखान्यात त्यांचा 'लाइफसाइज' फोटो लावलेला होता. तारकेला परिस्थिती असह्य झाली म्हणजे ती वेड्यासारखी आपल्या वडिलांची तसबीर कुशीत घेऊन उभी राहिल्यासारखी तसबिरीला बिलगे, अश्रू ढाळी आणि परत फिरे!

वडिलांच्या सातव्या दिवशी काही एक विशिष्ट कारणावरून दामोदरपंतांच्या मुलांनी ठरविले, 'आजच्या आज इस्टेटीच्या वाटण्या करायच्या!'

श्रीनिवास, नारायण व अमृत या दामोदरपंतांच्या मुलांनी आपल्या वृद्ध पण गरीब चुलत्यांना बोलावून आणले. सर्व वाटण्या बिनतक्रार झाल्या.

पण तारका? -

तारकेचे लग्न होईपर्यंत तिने कुणाजवळ राहायचे? घर थोरल्या भावाने - श्रीनिवासने - ठेविले होते; नारायण व अमृत हे रोख रक्कम घेऊन घराबाहेर पडणार होते!

रूढीप्रमाणे म्हटले तर तारकेने थोरल्या भावाजवळ - श्रीनिवासजवळ - राहायला पाहिजे होते. पण श्रीनिवास म्हणाला, "तारके, तुला माझ्याजवळ राहायचं असेल तर तू इतउप्पर नारायण व अमृत यांच्या घरचा उंबरठा चढायचा नाही. वाटेत कुठे भेटले तरी त्यांच्याशी एक चकार शब्दसुद्धा बोलायचा नाही - आणि जर तू त्यांच्याकडे कधी गेलीस, त्यांच्याशी कधी बोललीस असं मला कळलं तर मी तुला घराबाहेर हाकून देईन!"

हाच मंत्र नारायण आणि अमृत यांनीही जपला!

तीन मुलगे असलेल्या आईला निष्ठुर काळाने विचारावे -

"आई, तुझ्या मर्जीवर सोपवितो - मी तुझा एक मुलगा ठार मारणार आहे, कोणता मारू तेवढं मात्र तू सांग! तेवढी सवलत मी तुला देतो!"

या प्रश्नावर त्या आईने काय उत्तर द्यावे?

तशाच स्वरूपाचा प्रश्न तारकेपुढे होता!

तिने तरी काय उत्तर द्यावे?

अखेर तारकेने थोरल्या भावाजवळ - श्रीनिवासजवळ - राहावे असे ठरले!

दुसऱ्या दोन भावांकडे न जाण्याची व त्यांच्याशी न बोलण्याची अट मात्र कायम होती!

यानंतर दोनएक महिने गेले. घरात काहीतरी धुसफूस झाल्यामुळे तारका सहज जाऊन माडीवरच्या खिडकीत उभी राहिली. शून्य मनाने रस्त्याकडे पाहत होती. पाचएक मिनिटे गेली अशीच; तिचा मधला भाऊ नारायण त्याच रस्त्याने येत होता. त्याने सहज वर पाहिले. बहीण-भावांची दृष्टादृष्ट झाली. तारकेला गहिवर आला. सख्खा भाऊ असून त्याच्याशी बोलायचे नाही! नारायणही आपल्या घराकडे आणि बहिणीकडे उदासीन वृत्तीने बघून खाली मान घालून चालता झाला.

कुणी विचारीत नव्हते म्हणूनच की काय तारकेचा स्वभाव अत्यंत भावनाप्रधान झाला होता! वास्तविक तिच्या मनात खालील विचार येण्यासारखे का तिचे वय होते? पण आपण पाहतोच ना, खुरट्या झाडाला लवकर फुले येतात! तारकेच्या मनात विचार आले, "कुठून आणि कुणीकडे? मला कुणीच विचारीत नाही, मग मी जगायचं का? नुसता खाऊन पिऊन देह वाढवायचा - आणि परक्या घराण्यांतल्या मुली माझ्या इथं येऊन तोरा मिरवतात आणि मी मात्र मिंधं अन्न खाल्ल्यासारखी जगते आहे! आहाहा रे भाऊ!! बहिणीच्या मानापमानाची त्यांना काहीच पर्वा नाही! मी आपल्या दोन भावांकडे जायचं का नाही व त्यांच्याशी बोलायचं का नाही? का नाही?"

तारके! जगात असे कितीतरी प्रश्न आहेत की, त्यांचे उत्तर देताना चीड येईल! मनाच्या समाधानाकरिता आपण असे समजावयाचे की आपले नशीबच असे!

नंतर तारका त्या दु:खाच्या उमाळ्यातच खाली आंगणात आली. आंगणात बरीच फुलझाडे होती, त्याचप्रमाणे एक मोठे थोरले शेवग्याचे झाडही होते. त्या झाडाखाली ती बसली. तिला मागच्या एका दिवसाची आठवण झाली. तिची आई हयात असताना याच झाडाखाली - पण काय, आता नुसत्या आठवणी!

तिच्या मनात एक काहीतरीच विचार आला. ती उठली, घरात गेली. काठी घेऊन घराच्या बाहेर आली आणि शेवग्याच्या शेंगा ती पाडू लागली.

तोच श्रीनिवासची पत्नी - तिची वहिनी - ओरडतच बाहेर आली, "वन्स, शेवग्याच्या शेंगा कशाला पाडता? पाडू नका शेंगा! मी त्या मुद्दाम राखून ठेवल्या आहेत! येत्या रविवारी त्या मला माझ्या माहेरी नेऊन द्यायच्या आहेत!"

तारकेने तिकडे लक्षच दिले नाही. ती मनातल्या मनात पुटपुटली, "वा! खासा न्याय! माझ्या माहेरच्या शेंगा तुझ्या माहेरी! आणि माझ्या माहेरी मात्र मलाच तुझा सासुरवास!" वहिनीकडे लक्ष न देता ती शेंगा पाडीत राहिली.

वहिनींनी धुसफूस करीत म्हटले, "ऐकत नाही का तुम्ही - थांबा, घरी येऊ द्या म्हणजे सांगते तुम्हाला कसं काय आहे ते!"

तारकेने पडलेल्या पंधरावीस शेंगा घेतल्या आणि ती घराबाहेर पडली. घराबाहेर पडतापडताच तिने आपल्या वहिनीला सांगितले, "मी काकूंच्या इथं जातीय ग!"

दामोदरपंतांच्या सर्व मुलांना आपल्या चुलतीचा फार लळा होता. सर्व तिला आईच्या ठिकाणी मानीत! आणि ती माऊलीहि तशीच प्रेमळ होती! आता श्रीनिवास, नारायण व अमृत हे जरी वेगवेगळे राहू लागले होते तरी ते सर्व चार आठ दिवसांनी आपल्या चुलतीकडे येत असत!

तारका मात्र तिच्या वडिलांच्या मृत्यूनंतर आजच प्रथम घराबाहेर पडली होती आणि चुलतीकडेही ती प्रथम आजच आली होती!

तारका चुलतीकडे आली.

चुलतीने विचारले, "का ग, बाहेरशी उभी? ये ना आत!"

"हो, आले. काकू, शेंगा आणल्या आहेत तुला!" असे म्हणत तिने शेंगा खाली टाकल्या. तिला उमाळा आला आणि ती रडू लागली; अगदी ओक्साबोक्शी रडू लागली. गाईची आचळं ओल्या हाताने गोंजारली की गाईला जसा पान्हा फुटतो त्याप्रमाणे काकूच्या वात्सल्यपूर्ण सहानुभूतीने तारकेला रडण्याचा पान्हा फुटला!

इतक्यात बाहेर तारकेचा मधला भाऊ नारायण आला होता. तो बाहेरूनच म्हणाला, "काकू मी आलोय!"

तो ओळखीचा शब्द ऐकून आकाशवाणी ऐकायला यावी त्याप्रमाणे तारकेला आनंद झाला. राजापूरची गंगा एकदम आटावी त्याप्रमाणे तिचे रडणे एकदम थांबले! पडसे येऊन आवाज गेंगारल्यासारखा होतो तशा आवाजात शेवग्याच्या शेंगा हाती घेऊन ती आपल्या काकूला म्हणाली," काकू, मी तुला पुन्हा केव्हा तरी शेंगा आणून देईन. या मी आता नारायणला - नानूला - देते!"

तो हृदयाचा निर्मळपणा पाहून कुणाला गहिवरून येणार नाही? काकू गहिवरून म्हणाल्या, "दे बरं त्याला. पुन्हा आणून दिल्या नाहीस तरी चालतील. अगं पण वेडे पोरी, त्याला काही कमी का आहे? तो आणीत नसेल का बाजारातून?"

तारका उद्गारली, "पण काकू, त्या बाजारच्या! त्याच्या वडिलांच्या घरातील त्याच्या हक्काच्या शेंगा त्याला आता कधी मिळणार आहेत का ग?"

प्रसंगाने दगडालाही पाझर फुटतो असे आपण म्हणतो! अन् नारायण काही अगदीच दगड नव्हता. त्याच्या डोळ्यांत - काय - पाणीच म्हणायचे ना?

त्याने मुकाट्याने हात पुढे केला व शेंगा घेतल्या; तोच दुसरा भागीदार हजर झाला! तारकेचा सर्वांत लहान भाऊ अमृत आला होता. आता शेंगांची वाटणी सुरू झाली. तारका म्हणाली, "नानू, तू ठेव निम्म्या - आणि निम्म्या अमृतला - अण्णाला दे!"

बायकोच्या सांगण्यावरून तारकेची आपल्या चुलतीच्या देखत 'हजेरी' घेण्याकरिता श्रीनिवास आला होता. पण आतली बोलाचाल ऐकून तो बाहेरच उभा राहिला. पण आतील बोलणी ऐकून त्याचा तारकेवरील राग संपला होता. गहिवरलेल्या स्थितीतच तो आत आला.

तारकेने त्याला पाहिले, आणि ती - अतिशयोक्ती होते आहे; पण ओरडलीच म्हणतो - म्हणाली, "श्रीनिवासदादा - दादा - रागावू नकोस माझ्यावर! मी काकूकडे सहज आले होते. नारायण व अमृत इथे येणार असल्याचं मला माहीत नव्हतं आणि इथं त्यांना पाहिल्यावर मला राहवेना म्हणून मी बोलले त्यांच्याशी! माझ्यावर रागावू नकोस आणि म्हटल्याप्रमाणे मला रागाने घराबाहेरही काढू नकोस. दादा, आता मी पोरकी आहे रे - मी पाया पडते तुझ्या!"

आणि ती खरोखरच -

पण - पण काय, मानवी अंतःकरण आहे की दगड आहे? श्रीनिवास हा माणूसच होता! तो म्हणाला, "तारे - तारके, हे रडं आवर! कोण तुला बाहेर काढतं आहे? उगाच काहीतरी - चल रडं आवर!"

"दादा!"

"काय?"

"माझं रडं मला आवरत नाही! मी काय करू त्याला?"

श्रीनिवास गप्पच राहिला! नदीच्या लोंढ्याला वाट करून दिलीच पाहिजे!

तारकेचे रडे थांबले. चैत्रगौरीपुढे चित्रे मांडावीत असे तारकेचे भाऊ तिच्या समोर बसले होते!

श्रीनिवास म्हणाला, "तारके, तुला काय पाहिजे? का रडत होतीस?"

तारका म्हणाली, "मला एकच भाऊ मिळतो आहे! पण मला माझे तिन्ही भाऊ पाहिजे आहेत! मी मला वाटेल त्याप्रमाणे सगळ्यांकडे - तिन्ही भावांकडे जाणार आणि राहणार!"

कपाळावर बुक्की मारून घेत श्रीनिवास म्हणाला, "तारे - तारके! त्यावेळेला मी काहीतरी बोलून गेलो असेन. तू कुणाकडेही जात जा! आणि कुणाकडेही राहा!"

यमाने सत्यवानाचे प्राण परत दिले तेव्हा सावित्रीला जसा आनंद झाला असेल तशा थाटात तारका म्हणाली, "खरंच?"

श्रीनिवास म्हणाला, "हो - हो, खरंच!"

"थट्टा करतो आहेस माझी. मला नाही खरं वाटत! आणि हे जर तू मनापासून बोलत असशील तर तुम्ही तिघेही आता घरी चला - मी आपल्या हातानं भात आणि या शेवग्याच्या

शेंगांचं पिठलं करते आणि तुम्हांला वाढते! तुम्ही ओळीने एका पंक्तीला जेवायला बसा - तर मी खरं म्हणेन! तरच माझ्या मनाचं समाधान होईल! नारायण - नानू, अमृत - अण्णा, येत जा हं मधून मधून मला भेटायला! दादा, माझं लग्न होसतवर तरी सलोख्यानं वागून एकमेकांच्या घरी जात-येत जा! लग्न होऊन मी आपल्या सासरी - हक्काच्या घरी गेले म्हणजे मग माझं काही म्हणणं नाही! मला मग तुम्हा सर्वांच्या इथं हक्कानं जाता येईल! आणि असं वागाल तरच माझा माहेरचा सासुरवास संपेल!" तारका म्हणाली.

काकू मध्येच म्हणाल्या, "अग, मग इथंच कर स्वैंपाक!"

तारका म्हणाली, "नाही, आमच्याच घरी झाला पाहिजे! काकू, तूही चल!"

वेड्या मुलीच्या म्हणण्याला सर्वांनी मान दिला.

पाच

# विहीर

**वामन चोरघडे**

त्या विहिरीला वरून तोंडी नव्हती. चार धोंडे नीट बसवून तिची बांधण गोल व नीटनेटकी केली होती. भोवताली सारा चिखल माजला होता व त्यातच ठेवलेल्या दगडावरून पलीकडे विहिरीवर जायची वाट!

बऱ्याच जणी पाणी भरीत होत्या. चाक नसलेली विहीर ती. पाणी ओढायचे झालेच तर वाकून ओढणे फक्त शक्य.

प्रत्येकीच्या लुगड्याचा रंग निरनिराळा होता. पिवळा, खडी काढून रंगविलेला काळा, लालवट - पुष्कळ पुष्कळ रंग होते. पाणी ओढताना त्या खाली वाकत आणि त्या विहिरीची तोंडी झाकली जाई. दुरून पाहणाऱ्याला वाटे जणू रंगीबेरंगी फुलाफळांनी लवलेल्या वेलींची चिरणच!!

मातीच्या घागरी दोराने आत टाकून त्या पाणी ओढीत होत्या. बांधणीच्या गोट्याला लागून घागर केव्हा फुटेल याचा नेम नव्हता. फार जपत होत्या त्या! घागर भरून आल्यावरच त्या इकडे तिकडे पाहत!!

"यशोदे, हा हात उघडा कसा ग? आज सकाळी तर होत्या साऱ्या बांगड्या," एकीनं भीत भीत प्रश्न केला. यशोदेचा चेहरा सुकला होता; डोळे लाल झाले होते व नेहमीपेक्षा ती कमी बोलत होती.

तिच्या जवळ असलेल्या गिरजेने कपाळावरचे केस बाजूला सारले व स्निग्ध दृष्टीनं तिच्याकडे पाहून तोच प्रश्न विचारला. तिला उत्तर देणे भाग होते. तिच्या कपाळी किंचितशी आठी पडली! तिने ओठे थोडेसे आत ओढले! -

"फोडल्या बाई तुझ्या भावानं."

"कोण, राजाराम का ग?-"

"पण, तुझ्या नवऱ्यानं काहीच म्हटलं नाही?" तिसरीने आश्चर्याने विचारले. त्या स्पष्टस्पष्ट बोलत होत्या!

"ते तरी काय म्हणतील ग नेहमी? उलटी मलाच बोलणी बसली. जेवायच्या वेळेस चटणीचं नाव काढलं म्हणून घाई घाई वाटायला बसले. तुझ्या भावानं मीठ मागितलं. घाईत

मला ऐकूच आलं नाही. त्याला आला राग आणि ताट आपटून तो उठून गेला - वाटी माझ्या हातावरच पडली.''

''एकेक उलटंच! अन् तुझ्या घरी सारं सहन केलं अं!''

यशोदेच्या डोळ्याला थेंब आले होते.

''तो तरी काय करील बिचारा!'' गंगू घागरीचा गळफास सोडीत म्हणाली.

''म्हातारी असेल जवळच. बोलून उगीच शोभा. चौघांच्या घरी बोलता येत नाही. होय, त्याला उदंड वाटलं तसं, पण तो यशोदेलाच बोलेल सारं गिळून. चौघांचं घर! बिचारीला -''

सर्व बायका तटस्थ होऊन सहानुभूतीने तिच्याकडे पाहत होत्या. तिनं डोळ्याला पदर लावला होता व न आठवण्याचा प्रयत्न करूनही, मागचे ते सारे आठवून तिला एकदम हुंदका आला!

''उगी, उगी बेटा!'' नुकत्याच आलेल्या वयस्क स्त्रीने तिच्या पाठीवरून हात फिरविला. दोन गोड शब्द बोलल्यामुळे यशोदेला गहिवर आला होता.

''उगी बेटा, हे कसलं मेलं चौघांचं घर!''

''नाही तर काय ग?'' यशोदा एकदम बोलू लागली. तिचे अवसान तिच्या डोळ्यांतून साऱ्यांकडे पाहत होते. -

''उगी, उगी तरी किती वेळ राहू? अशी लाही होते जिवाची. सासू बोलते ती वेगळी. दिराचा प्रकार हा असा. पुन्हा ते बोलतील वेगळेच - त्यांना समजून उगीच डोळ्यांवर कातडं - आणि मलाच बोलणी. जीव जातो सदा. एखाद्या दिवशी - ''

''हं, असं भलत्या जागी बोलू नये. भर, पाणी भर; ती पाहा घागर गोट्याशी हेलकावते आहे.''

''रोजचं असं झालं तर ..''

ती घागर तिने पेलून धरली आणि तशाच जड हाताने वर ओढली. बाकीच्या साऱ्या जणी भारावलेल्या अंतःकरणाने पाणी ओढीत होत्या! कुणीच बोलत नव्हते!

दुरून पाहणाऱ्याला वाटे - फुलाफळांनी लवलवलेल्या निरनिराळ्या वेलींची चिरण आहे ती एक ...

पण किंचित जवळ गेल्यावर कळले असते - कुणाचेही जीव घ्यायला सोकावलेली, तोंडी न बांधलेली अशी ती एक काळ्या कातळाची विहीर आहे तिथे, आड दडलेली!

पण तिच्यातूनही त्या बिचाऱ्या खोल खोल घागरी टाकून जपून जपून जीवन ओढताहेत आणि घागरी पुन्हा मातीच्या!

सहा

# माझे दत्तक वडील

**चिं. वि. जोशी**

सकाळची रम्य वेळ होती. दिवस हिवाळ्याचे होते; आणि मी रत्नागिरीच्या बंदरावर फेरफटका करण्यास गेलो होतो. कोकणात हिवाळ्याचे दिवस किती आल्हादकारक वाटतात! फार थंडी नाही आणि उष्मा तर मुळीच नाही. रत्नागिरीचे बंदर चढण्याउतरण्यास जरी अवघड असले, तरी तेथील देखावा फारच नामी आहे. समुद्राकडे तोंड करून उभे राहून पाहिलेला उजवीकडील तो अजगरासारखा पसलेला किल्ल्याचा डोंगर, समोर क्षितिजापर्यंत पाणीच पाणी आणि त्यावर अंतराअंतरावर तरंगणाऱ्या गलबतांची परीटघडीची शिडे, मागील बाजूस विशेष सांगण्यासारखे काही नाही, असा तो सुंदर देखावा जन्मात मी विसरणार नाही. रात्रभर निशापाणी करून लालभडक झालेल्या भगवान सूर्यनारायणाने आपली पत्नी सृष्टिदेवी हिची दोन्ही थोबाडे रंगविली होती. समुद्रकाठी वाळूत एका बिळातून दुसऱ्या बिळात सुर्कन् पळणारे कुर्ले आपल्याला पकडावयास येणाऱ्या कावळ्यांशी किंवा कुत्र्यांशी पकडापकडीचा खेळ खेळत होते. झाले इतके वर्णन पुरे झाले; नाही तर लघुकथेचे तंत्र बिघडावयाचे, म्हणून मुद्द्याच्या गोष्टीकडे वळतो.

जरी मला पुण्यास नोकरी होती, तरी मी दरसाल या महिन्यात रत्नागिरीस येत असे, व माझ्या वडिलोपार्जित इस्टेटीपैकी माझ्या वाट्यास जे नारळाचे झाड व फणसाच्या झाडाची जी खांदी आली तिचे वार्षिक उत्पन्न एक रुपया पाच आणे पाच पै घेऊन जात असे. हे उत्पन्न मिळविण्यास माझ्या वडिलांस आठ वर्षे कोर्टात झगडून नऊशे रुपये खर्चावे लागले. मग मी सालिना पंधरावीस रुपये खर्चून रत्नागिरीस येऊन भावाबंदांशी तंडून हे हक्काचे, हट्टाचे व मानाचे पैसे घेऊन जात होतो, यात वावगे काय झाले? तसे न करीन तर वडिलांच्या नावास बट्टा लागणार नाही काय? हे यंदाच्या वाटणीचे पैसे मी कालच वसूल केले होते व आज संध्याकाळच्या बोटीने निघून परत पुण्यास जाणार होतो. बंदरावरची गंमत घटकाभर पाहून परत फिरलो व वरल्या आळीत पोचलो, तोच एक पन्नाशीच्या सुमाराचा वृद्ध गृहस्थ धावतच माझ्याजवळ आला व त्याने माझ्या अंगाभोवती दोन्ही हात टाकून मला कवटाळले.

"अहो हे काय आजोबा? मला कोण म्हणून समजता? मी काही तुमचा नातूपणतू नाही बरं. सोडा मला, नाही तर आता भोवताली घोळका जमा होईल तमासगिरांचा."

"बाळ, नको रे म्हाताऱ्याला झिडकारू. तोच तू - हुबेहूब; काडीइतका फरक नाही."

"अहो भटजीबुवा, कबूल आहे सगळं. तोच मी आहे, हुबेहूब काल दिसत होतो तसाच आजही दिसतो आहे, कालचा हा चिमणाजी विठ्ठल -"

"काय चिमण तुझं नाव? मग तर ठेपी जमलंच. मलासुद्धा दृष्टांतात गुरुराजांनी हेच नाव सांगितलं होते. चिमण चिमण! ये रे माझ्या चिमण्या बाळा!" असे उद्‌गार काढीत म्हातारबुवांनी मला अधिकच आवळले.

"अहो शास्त्रीबुवा, तुम्ही सड्यावरच्या इस्पितळातून रखवालदाराच्या हातावर तुरी देऊन तर नाही ना आला? चला, तिकडेच तुमची परत रवानगी करतो."

"अरे बाळा, मी कोणाच्या हातावर तुरी देऊन आलो नाही, पण तू मात्र माझ्या हातावर तुरी देऊन वीस वर्षे पळाला होतास. पण सुदैव माझं, काल रात्री गुरुराजांनी दृष्टांत देऊन सांगितलं की, 'तुझा बाळ उद्या सकाळी तुला भेटलाच पाहिजे.' मी म्हटलं, 'पण त्याला ओळखणार कसा?' तेव्हा गुरुराजांनी स्वप्नात तुझं दर्शन घडवलं. आणखी ते अदृश्य झाले. स्वप्नात पाहिलेली मनोहर मूर्ती. पण चल माझ्या घरी. इथं रस्त्यात आता हे तमासगीर जमा होतील. हे कोकण आहे बाबा, इथले लोक आहेत कुचाळ! चिटोळ्यांचा मुलूख आहे हा."

या वेड्याच्या डोक्यात आहे तरी काय हे पाहावयाच्या उद्देशाने मी त्याच्या बरोबर त्याच्या घराकडे जाण्यास निघालो. दहा पाच घरे गेल्यावर त्याच्या घराच्या गडग्यात शिरलो. आत गेल्याबरोबर तेथील थाट पाहून मी थक्क झालो. दोन तुडुंब भरलेल्या विहिरींस माळांचे रहाट लावले होते, आणि एकास बैल व दुसऱ्यास रेडा जुंपला होता. विहिरीच्या पाटाच्या पाण्यावर माड, सुपारी, कलमी आंबे, फणस, काजू असे वृक्ष; चिकू, कॉफी, केळी, कागदी लिंबे अशी झाडे, फुलझाडे, वेली, भाज्या यांची जोपासना होत होती. घरापुढील मांडवावर वाळवणे घालण्याच्या कामी दोन मोलकरणी राबत होत्या. दळणाकांडणाचे काम दुसऱ्या दोघी मोलकरणी करीत होत्या आणि एका गोठ्यात पाच-सहा गुरे बांधलेली होती. बागेच्या मध्यभागी मुंबई पद्धतीचा दुमजली सुरेख कौलारू बंगला होता.

"ही पाहा माझी बाग नि समोरचं माझं गरिबाचं खोपटं." म्हातारबुवांनी सांगितले. कोकणच्या श्रीमंत लोकांचा पोषाख आणि अठराविसवे दरिद्र्यांचा पोषाख सारखेच असतात. म्हणून मला त्यांच्या बोलण्याचे मुळीच आश्चर्य वाटले नाही. त्यांनी मला बंगल्यात नेले. बंगल्याच्या ओसरीवरच आम्ही झोपाळ्यावर बसलो. ओसरीवरून माडीवर जाण्याचा जिना होता, त्याला कुलूप लावलेले होते, त्यामुळे दिवाणखान्याचा थाट मला पाहावयास मिळाला नाही; तरी ओसरीवरील गाद्या, लोड, तक्क्ये, देबादिकांच्या तसबिरी व इतर फोटो, पोतीची तबके चित्रे ठेवलेले काचेचे कपाट वगैरे थाटावरून या म्हाताऱ्याच्या श्रीमंतीची बरीच कल्पना आली.

म्हाताऱ्याने रामा गड्यास हाक मारून बोलाविले आणि माजघरात टांगलेल्या केळवंडीतील थोडी केळी आणि एक पपनस घेऊन येण्यास सांगितले.

रामा : "पन अन्ना –"

रामास पुरते बोलू न देता म्हातारा त्यास गप्प करून म्हणाला, "होय, मालकांचेच पाहुणे आहेत हे, जा. जास्त बोलू नको." रामा काहीतरी पुटपुटत गेला; तेव्हा म्हातारा मला म्हणाला, "पाहिलेत हे कोकणचे गडी कसे उद्धट असतात? यांना अहो जाहो कसं ते ठाऊकच नाही. बाकी मलाही हा साधेपणा आवडतो. मला आण्णासाहेब म्हणू नका, नुसतं 'आण्णा' म्हणा अशी मी त्यांना ताकीद देऊन ठेविली आहे. नाहीतर तुमच्या देशावर! जो उठला तो 'साहेब!' तात्यासाहेब, बापूसाहेब, भाऊसाहेब - मग हातात उलटी अंबारी का असेना? (ओरडून) अहो बाईसाहेब, जरा बाहेर या."

वेणी घातलेली, मोठे कुंकू, नाकात सोन्याचे मणी गुंफलेली नथ, गुडघे झाकतील इतके रुंद लुगडे अशी बाई माजघरातून दारात येऊन उभी राहिली. तिला उद्देशून म्हातारा म्हणाला, "हे पाहिलेत का हो आपले चिरंजीव? झालं की नाही माझं स्वप्न खरं? तू मला खुळा समजलीस. स्वप्न लटकं म्हणालीस, पण स्वप्नात पाहिलेलीच मूर्ती! नावसुद्धा गुरुराजांनीच सांगितलेलं 'चिमणाजी!' बाळा चिमण, आपल्या आयशीच्या पाया पड."

या वेडपट थेरड्याच्या कलानेच जरा घेऊ या असा विचार करून मी त्या बाईच्या पाया पडलो. "बरं आहे, मी थोडा चहा ठेवते," असे म्हणून ती आत निघून गेल्यावर म्हातारा झोपाळ्यावरून उठला व भिंतीवरचा एक फोटो काढून मला दाखवीत म्हणाला, "चिमणराया, पाहा पाहा ही गोजिरवाणी बाळं! एकाहून एक सरस रत्नंच होती. पण काळाला नाही ती पाहावली! इन्फ्ल्युएंझाच्या साथीत आठ दिवसांत एकामागून एक गेली; आणखी आम्हांला म्हाताऱ्यांना निसंतान करून सोडिलं! (स्फुंदत) पण जाऊ द्या ते. आम्ही मुलांकरिता शोक करीत एक वर्ष काढलं तेव्हा कालच आमचे गुरुराज —"

"म्हणजे कोण बुवा?"

"माझे गुरू म्हणजे राजापूरचे पासोडे महाराज. सत्पुरुष आहेत. तेच माझी करुणा ऐकून द्रवले. त्यांनी मला पहाटे दृष्टान्त दिला. त्यांची ती सहा महिन्यांत आंघोळ न केलेली, तोंडात गांजाची चिलीम धारण केलेली, अंगावर मळक्या पासोडीशिवाय चिंधूकही नसलेली, बाह्यात्कारी भ्रमिष्ट दिसणारी मूर्ती माझ्यापुढं प्रकट झाली आणि त्यांनी सांगितलं, 'बेटा आण्णा! कल फजर उठके गाड्याको हात लगावो और रास्ते में जाव, तुमारे नजरको जो आदमी पहला आवेगा वोही तुम अपना लडका समझो. आगले जनम में वो तेरा लडका था.' मी म्हटलं, 'गुरुवर्य, पण रस्त्यात दहा जण भेटतील. कोणता मी आपला मुलगा समजू?' तेव्हा त्यांनी माझ्यासमोर तुझी मूर्ती प्रकट केली. पुढं बोलणार तो जागा झालो."

इतक्यात आण्णांच्या कुटुंबाने चहा, केळी, पपनसाच्या फोडी वगैरे उपाहार आणि मुखशुद्धीकरिता ओली सुपारी आणिली. त्यांचा समाचार घेत असता आण्णांनी आपल्या जमीनजुमल्याची कल्पना मला करून दिली. आण्णांच्या जवळ बरीच माया होती. तो बंगला, ती बाग, रत्नागिरी व संगमेश्वर तालुक्यातील भातशेते, दरमहा तीनशे रुपये भाडे आणणारे मुंबईचे लहानसे घर, शिवाय वीस हजारांच्या 'परमेश्वरी' नोटा आणखी पाच हजारांचे

युद्धकर्ज. असले घबाड आयतेच पदरात पडत असल्यावर कोणता शहाणा माणूस आण्णांच्या दृष्टान्तावर अविश्वास ठेवील? पासोडे महाराजांचे उपकार आण्णांच्या ऐवजी माझ्यावर मात्र पुष्कळ झाले यात संदेह नाही.

"पण आण्णा माझे वडील हयात नाहीत, मला दुसरा भाऊही नाही, तेव्हा मला तुमचा दत्तक होता येणार नाही बरं का?" मी म्हटले.

"अरे, दत्तक नको अन् फित्तक नको. ती सगळी थोतांडे आहेत. दत्तकाचं कलम केल्यानं का खरं प्रेम होत असतं? फक्त तू आमच्यावर आईबापाप्रमाणं माया कर म्हणजे सगळी माया तुलाच मिळेल. बरं, आता तू उतरला आहेस कुठं? (ऐकून) वरच्या आळीतले जोग तुझे कोण लागतात?

मी आण्णांना माझी सगळी हकीकत सांगितली. मी पुण्यास नोकरीस असतो असे ऐकल्यावर ते म्हणाले, "अरे चिमणा! साठ टिकल्यांकरिता खर्डेघाशी करण्याचं आता तुला कारण नाही, परंतु मला जरा दम्याची व्यथा असल्यानं एवढा पावसाळा आम्ही दोघे पुण्यास काढू. स्वतंत्र बिऱ्हाडच करणार होतो, पण आता तू आहेसच. घरी तुझी आयशी आहे ना? तुला उद्या सोमवारी कामावर रुजू व्हायचं असेल तर तू आज रात्रीच्या बोटीनं जा. मी इथल्या कामाची व्यवस्था लावून बुधवारी निघून येतो."

यानंतर काही किरकोळ बोलणे होऊन मी निघालो. रविवारी संध्याकाळी रत्नागिरीहून निघून सोमवारी दुपारी पाऊण वाजता पुण्यात पोहोचलो. वाटेने बोटीत व आगगाडीत माझा सर्व वेळ त्या भोळ्या आण्णांच्या अवाढव्य इस्टेटीची तजवीज करण्यात गेला. ऑफिसात जाण्यास उशीर झाल्याने एका टॉमीची दुरुत्तरे सहन करावी लागली. "हरकत नाही लालतोंड्या," मी (मनात) म्हणालो, "तो थेरडा कोकण्या मला आपली इस्टेट देणारच आहे, मग कोण येतो तुझ्यासारख्या माकडाची चाकरी करायला?"

संध्याकाळी घरी गेल्यावर आईला सगळी हकीकत सांगितली, तेव्हा ती म्हणाली, "संभाळ हो बाबा! नाहीतर तो कोणी लफंगाबिफंगा असायचा – असल्या मसलतीत आपल्यासारख्या साध्या माणसांनी पडू नये."

"अग पण आई, मी का या मसलतीत पडलो आहे? त्या आण्णाच्या गुरुरायांनीच मला हिच्यात पाडलं आहे. ठीक आहे. या महागाईच्या दिवसांत हातभार लावला संसाराला आपल्या दैवानं!"

गुरुवारी सकाळी आण्णा व त्यांची पत्नी (त्यांना माई म्हणावयाचे) यांस स्टेशनवरून आणिले. आण्णांनी आमच्या आईसाहेबांस आडव्यातिडव्या गप्पा मारून खूप खूष केले; माईंनी आईला आपली बहीण मानली व आण्णा हे माझे चुलते आहेत असे सर्वांना मी सांगावे म्हणजे लोकांना दृष्टांताची कर्मकथा सांगावयास नको असे ठरले. आण्णांच्या बरोबर त्यांच्या कपड्यांच्या व दागिन्यांच्या ट्रंका होत्या, पण त्यांच्या किल्ल्या कोठे तरी हरवल्या, त्यामुळे त्यांना अंघोळीनंतर बदलावयास चिरगुटंही नव्हती. म्हणून मी लगेच बुधवारात जाऊन एक धोतरजोडी व इरकली लुगडे घेऊन आलो.

पहिल्या दिवशी आण्णा व माई नवीन असल्यामुळे त्यांची बरदास्त उत्तम ठेवण्यात आली होती. दुसऱ्या दिवशी सकाळी आमचा गवळी आला, तेव्हा आम्ही दूध किती घेतो ते आण्णांनी विचारले. सौ.(माझे नुकतेच लग्न झाले होते) म्हणाली, "एक शेर." आण्णा उद्गारले, "बस! एकच शेर! अरे, ते काही नको आता. तुम्ही अडीच शेर दूध सुरू करा. मलाच तर शेरभर दूध पोळीबरोबर खावयास लागतं. रे गवळी, सकाळी अडीच नि रात्री दोन शेर आणीत जा हो. (मला इंग्रजीत) पैशाची काळजी नको."

मी —"छे छे, आण्णा असं कसं होईल! पैशाचं काय मोठंसं! लागेल तितकं दूध घेऊ (मनात खा थेरड्या, माझ्या बापाचं काय जातं नुसतं दूध पिऊन पोट फुगून मेलास तरी!)"

आण्णा आल्यापासून आमच्या राहणीत पुष्कळ सुधारणा झाली. जेवताना दोन कोशिंबिरी, एक फळभाजी, एक पालेभाजी, भाकरीऐवजी पोळी, पोळीला तूप साखर, सकाळ-दुपार लिप्टनच्या पिवळ्या डब्यातील चहा व बरोबर बिस्किटे अगर शिरा असा थाट सुरू झाला. आण्णांच्या डोकीवरचा पांढरा मास्तरशाही रुमाल जाऊन पुणेरी झिरमिळ्यांची पगडी, अंगातील बंडी व चेकचा कोट जाऊन शर्ट व सर्जचा कोट, पंचा जाऊन लांबरुंद धोतर व वाहणांऐवजी लाल पुणेरी जोडा असा पेहराव आला. माईंचे सुती लुगडे जाऊन व त्यांच्या पूर्वीच्या अनवाणी पायांत गादीचे जोडे आले. या सगळ्या वेषांतरांचा खर्च तूर्त मला सोसावा लागला, पण याचा दसपट वचपा काढल्याशिवाय मी राहणार थोडाच होतो?

आण्णा व माई ही दररोज संध्याकाळी टांगा करून फिरावयास जात. सिनेमाचा प्रत्येक नवीन कार्यक्रम, प्रत्येक मंडळीचे नवीन नाटक, प्रत्येकास रोजचे डॉक्टरचे औषध व पथ्याकरिता फळे किंवा डब्यातील विलायती खाद्य यांचा सपाटा सुरू झाला. आण्णांनी आपल्या ट्रंकेच्या कुलुपाच्या किल्ल्या पाठवून देण्याबद्दल रत्नागिरीच्या कारकुनास दहा पत्रे लिहिली पण त्याने दाद दिली नाही; त्यामुळे खर्चासाठी सेव्हिंग्ज बँकेतील माझे एकशेवीस रुपये मला काढून आणावे लागले.

आण्णांच्या प्रकृतीला पुण्याची हवा चांगली मानवली. पहिल्याने त्यांना दोन पोळ्याही जात नसत, त्या आता पाच-सात पोळ्या पचून पुन्हा फिरावयास जाण्याच्या आधी उपाहार लागू लागला. माईही नवऱ्याशी अधिक पोळ्या खाण्याच्या बाबतीत पैज लावून जेवीत असत.

या जोडप्याचा बकासुरी आहार पाहून गुंड्याभाऊसदेखील आपली प्रकृती क्षीण होत चालली आहे असे वाटू लागले. तेव्हा त्याने मला सुचविले की, मी आण्णांस लंघनमीमांसेचे पुस्तक वाचावयास द्यावे. ज्यांच्या घरी पाहुण्यांचा सुळसुळाट असतो अशा घरवाल्यांनी या पुस्तकाची प्रत अवश्य संग्रही ठेवावी. मात्र आण्णांसारखे खमंग पाहुणे त्यास बिलकुल दाद देणार नाहीत. ते पुस्तक वाचून आण्णा म्हणाले, "अरे चिमण, अगदीच टाकाऊ पुस्तक आहे हे! लंघनाची चिकित्सा जर त्यात वर्णन केली आहे इतकी बिनचूक असती, तर हिंदुस्थानात रोगराई वाढली नसती; कारण या देशातले शेकडा ऐंशी लोक दररोज लंघन करीत असतात!"

"आण्णा, हे लोक नुसते उपाशी राहतात. पुस्तकाच्या नियमाप्रमाणे लंघन करीत नाहीत."

"अरे, मरो रे तुझं लंघन! आम्हाला 'उल्लंघनमीमांसा' असली तर देस एखादी! म्हणे पोट दुखलं तर उपास करावा नि बस्ती घ्यावा! ते काही नाही. पोट दुखलं तर बचक बचक सुंठ-साखर नि तूप घ्यावं नि बेश लाडू करून खावे. मधुमेह झाला तर रोज गुळाच्या पोळ्या अच्छेर तुपाशी खाव्या नि शंभर नमस्कार घालून पचवाव्या. डोक दुखत असेल तर चांगला अच्छेर मावा साखरेत परतून खावा की साफ! बद्धकोष्ठ झालं तर चार-पाच बेसनाचे लाडू खावे नि वर एक ग्लास कोल्ड्रिंक प्यावं. कालच त्या कँपातल्या ट्रेचर कंपनीत कोल्ड्रिंक घेऊन आलो. वा! काय त्याची खुमारी सांगू तुला?"

हळूहळू दोन महिने संपले. माझे सेव्हिंग बँकखाते खलास झाले. पगारही दोनदाचा संपला होता, पण अद्याप आण्णांच्या किल्ल्या येईनात; तेव्हा त्यांनी पाचशे रुपये रजिस्टरने ताबडतोब पाठवून देण्याविषयी रत्नागिरीच्या आपल्या कारकुनास लिहिले व ते येईपर्यंत खर्चास मी सासऱ्यांकडून दोनशे रुपये उसने आणिले. आण्णांचे रुपये येताच सौभाग्यवतीला सुरेख लुगडे मिळणार होते. बिचारीला लढाईच्या महागाईने चिटावरच समाधान मानून घ्यावे लागत होते.

पंधरा दिवस होऊन गेले तरी रजिस्टर येईना. पोस्टात चौकशी केली पण व्यर्थ. तेव्हा मी आण्णांना सुचविले की, तुम्ही आता ट्रंकांस दुसऱ्या चाव्या लावून पाहा; मी चावीवाल्यास बोलावतो. पण छे! चिक्कू म्हातारा पत्रे व तारांचे पैसे घालवीत होता, पण तेथल्या तेथे दुसऱ्या चाव्या विकत घ्यायला त्याला धीर होईना.

पावसाळा संपला, आगबोटी चालू झाल्या. तेव्हा माझ्या श्वशुरांनी मला सल्ला दिला की, मी प्रत्यक्ष रत्नागिरीस जाऊन त्या म्हाताऱ्याच्या कारकुनास भेटावे व त्याच्याकडून पैसे आणावे. ही हकीकत मी आण्णांना सांगितली, तेव्हा ते बरेच आढेवेढे घेऊ लागले, "तुला रजा मिळणार नाही. पंधरा दिवसांनी मीच जाईन, तुला कारकुंडा दादच देणार नाही." इत्यादी. तेव्हा आईनेही मला बाजूस नेऊन म्हाताऱ्यास न कळविता रत्नागिरीस जाण्यास सांगितले व त्याप्रमाणे खोटी आजारचिट्ठी ऑफिसात पाठवून मी रत्नागिरीस गेलो. संध्याकाळी तेथे भावबंदांकडे उतरलो व त्यांस आण्णांचा वृत्तांत सांगितला. आण्णा फाटक नावाचा श्रीमंत गृहस्थ रत्नागिरीत असून आपल्याला त्याची माहिती नसल्याबद्दल त्यांनी आश्चर्य प्रगट केले.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी आण्णांच्या बागेतील बंगल्यात गेलो. पूर्वी मी येथे आलो होतो तेव्हा बंगल्याच्या माडीस कुलूप होते, परंतु या वेळी आण्णा पुण्यास असून ती उघडी असल्याने मला नवल वाटले. चिक्कू मालकाची संपत्ती इतरांच्या चैनीसाठीच असते. मी ओसरीवर गेलो व पाहतो तो झोपाळ्यावर तीन सुरेख मुले बसलेली. ही भुताटकी तर नाही ना असे मला वाटले; कारण ज्या मुलांचा फोटो दाखवून "ही माझी गोजिरवाणी बाळे इन्फ्ल्युएंझाच्या साथीत गेली," असे आण्णा म्हणाले होते तीच ही मुले. पोषाखही तेच होते.

सगळ्यात मोठ्या मुलाने झोका थांबवून मला कोण पाहिजे असे विचारले. मी भीत भीत उलट त्या मुलासच त्याचे नाव विचारले.

"माझं नाव प्लभाकर बालक्लिष्न नाडकलनी."

मी घर चुकलो की काय असे वाटून इकडे तिकडे बघू लागलो तो एक तरुण बाई तेथे घरातून आली व काय, कोणाकडे आला आहा, असे मला विचारू लागली.

"फाटकांचं ना हे घर?"

"नाही बाई, हे आमचं - नाडकर्ण्यांचं घर आहे. फाटक तर इथं नाहीत जवळपास कोणी."

मजकरिता केळी व पपनस आणण्यासाठी आण्णांनी ज्याला पाठविले होते तो रामा गडी तेथे काही कामाकरिता आला व माझ्याकडे पाहताच, "काय पाव्हणे, कसा काय?" असे त्याने विचारले.

"ठीक आहे. पण ते आण्णा कुठं आहेत रे?"

"तो आण्णा बामन? कुठं पलाला त्याचा काहीच पत्ता नाय्."

"म्हणजे ते आण्णा या बंगल्याचे मालक नव्हते?"

"अवं कसले मालक? वैनीबाईस्नी पुसा म्हणजे त्या सांगतील सगला."

रामाच्या उपदेशाप्रमाणे नाडकर्णीण वहिनींना मी आण्णांबद्दल माहिती विचारली.

"तो आण्णा शिफारस घेऊन इकडे नोकरी मागायला आला. त्याला कारकून म्हणून ठेवलं. मध्ये आम्ही लग्नकार्याकरिता मालवणला गेलो ते त्याच्या अंगावर घर टाकून गेलो. कोणाला माहीत हा थेरडा असा लबाड असेल म्हणून! मेला आम्ही परत यायच्या आत इथून पसार झाला न् बरोबर घरातील दहावीस भांडी न् कपडेच पळवलीन्. तुम्हाला काय त्यांनी आपणच घराचे मालक आहो म्हणून सांगितलीन्? काय बाई तरी धारिष्ट्य!"

"आई, आणखी माझा गलवा पण पलवला ग त्यांनी," तो मोठा मुलगा म्हणाला.

आता स्वतःची फजिती त्या बाईपुढे काय सांगावयाची? त्या म्हाताऱ्याची झडती घेऊन तुमची भांडी परत करतो असे सांगून मी निघालो. संध्याकाळच्या बोटीने रत्नागिरी बंदर सोडले. काय पाजी माणसाने मला बनविले! आता कसली इस्टेट - पण चारपाचशे रुपयांच्या उधाऱ्या मात्र करून बसलो होतो! मी माझ्या मित्रांत उपहासविषय होणार! पुण्यात घरात पाऊल टाकताच त्या थेरड्याच्या बत्तिशीपैकी शिल्लक राहिलेले दात न पाडीन तर नावाचा चिमणराव विठ्ठलच नाही; असे सुडाचे विचार मनात घोळवीत रात्र व सकाळ घालवून दुसऱ्या दिवशी दुपारी पुण्यास पोहोचलो.

तांग्यातून उतरताच, "कुठे आहेत आण्णा?" असे म्हणत मी घरात शिरलो.

"अरे, असं झालं तरी काय रागवायला?" असे आईने विचारले.

"पण आधी ती थेरडा-थेरडी–"

"अरे, ती गेली रत्नागिरीला. तूच तिथून त्यांना तार केली होतीस ना झटपट निघून या म्हणून?"

"मी-मी तार केली? अगदी पक्का लफंगा दिसतो आहे, पण मी रत्नागिरीला गेल्याचं त्यांना सांगितलं कुणी?"

"अरे, तुझ्या बायकोनं, भोळी बिचारी! आपला बेत तिला माहीत नव्हता. तिनं त्या म्हातारीजवळ सहज सांगितलं. मग चार तासांनी तुझी तार आली आहे, आपण रत्नागिरीस जातो, असं सांगून ती दोघं तीनच्या गाडीनं गेली. दोन ट्रंका बरोबर नेल्या, आणखी दोन वर आहेत."

"पाहू बरं त्यात काय आहे - चोराच्या हातची लंगोटी." असे म्हणून मी वर गेलो व हत्यारांनी कुलुपे फोडीत फोडीत आईस सर्व हकीकत सांगितली. कुलुपे फोडून ट्रंका उघडून पाहतो तो आत दगड-विटकरींशिवाय काही नव्हते!

दुसऱ्या दिवशी टपालाने पत्र आले. त्यात पुढील मजकूर होता :

चि. चिमणराव यांस आण्णा फाटक याचे प्रेमपूर्वक आशीर्वाद. आपण आमचा चार महिने उत्कृष्ट पाहुणचार केलात याबद्दल आम्ही आपल्याला दुवा देतो. राहिलेल्या आयुष्यात आपली आठवण व्हावी म्हणून आपल्या कुटुंबाच्या पाटल्या बरोबर आणिल्या आहेत. तसेच आपल्या कापडवाल्याकडून साठ रुपयांचे कापड आणिले आहे, त्याचे पैसे फेडणे आपलेवरच आहे. आमच्या अफाट इस्टेटीपैकी दगडाविटांनी भरलेल्या दोन ट्रंका आपल्याला वारसा म्हणून ठेविल्या आहेत त्यांचा स्वीकार करावा. आपले स्वतःचे घर बांधाल तेव्हा त्यांचा अवश्य उपयोग करावा. आपल्या मातोश्रीस नमस्कार व चि. सौ. सूनबाईस आशीर्वाद. तुमच्यासारखे दुसरे भोळे सावज मिळेपर्यंतची तरतूद तूर्त झाली आहे. तरी आमच्या योगक्षेमाची काळजी करू नये. कळावे, हे आशीर्वाद.

आपला

आण्णा फाटक

गेल्या चार महिन्यांतील देणी फेडण्यासाठी वाचकांनी मला पर्स अर्पण करावी अशी विनंती आहे. नाही तर तरुणांचे मूर्खपणाचे प्रकार निस्तरणारा परमेश्वर जो सासरा तो माझा पाठीराखा आहेच.

सात

# आता आमोद सुनासि आले

**दि. बा. मोकाशी**

थडथडा पावसाचे थेंब पडत आहेत नि शिवा नेमाणेची गाय अगदी व्यायला झाली आहे. पावसाचं पाणी पिऊन नदी मस्तीला येऊन वाहत आहे नि रामजी लोहाराच्या एकुलत्या एक मुलाला तिनं आपल्या खळखळत्या धारांत वाहून नेलं आहे. हवा ओल्या फडक्यासारखी सर्द झाली आहे नि गण्या शिनारेचा दमा वाढला आहे. निसर्गाचं थैमान सुरू झालं की अशाच गोष्टी का घडतात? माणसं अशी निपचित का पडतात?

आज सहा दिवस झाले. केंबळखेडं पावसाचा मारा खात दबकून बसलं होतं. सहा दिवसांत आकाशाचा काळपट रंग बदलला नव्हता. खग्रास ग्रहणासारखी भयाण काळोखी डोंगरांपासून पायथ्याच्या खेड्यांपर्यंत पसरली होती. पाण्याचे तांबडे लोंढे खळखळा वाहत होते. पावसाच्या सरी सुरीच्या पात्यासारख्या पृथ्वीवरून फिरत होत्या. एंजिनामधून वाफ सुटावी तसा आवाज, वातावरणाला भरून टाकीत होता. माणसं विड्या ओढीत होती नि साखरेचा किंवा गुळाचा, दुधाचा किंवा बिनदुधाचा, मिळेल तो चहा पीत होती. ती आपापसांत असं काही बोलत होती, की पृथ्वीची ही वास्तू त्यांना कधीच आवडली नव्हती असं वाटावं.

गावात जी काही दहाबारा दुकानं होती ती केव्हाच बंद झाली होती. संतू वाण्याच्या दुकानाची एक फळी तेवढी उघडी होती. पावसाचे तुषार त्या फटीतून आत शिरत होते, नि कंदिलाच्या उजेडात संतापल्यासारखे दिसत होते. आज बुधवार होता. आज संतू वाण्याच्या दुकानाच्या माळ्यावर नेहमीसारखं ज्ञानेश्वरीपठण होतं. दर बुधवारी, गावात जे चार माळकरी होते ते तिथे जमत. माळा बुटका होता. जमिनीवर एक कायमची मोठी सतरंजी पसरलेली होती. एक चौरंग आणि एक लहान आसन कोपऱ्यात मांडून ठेवलेलं होतं. आळीपाळीनं ते तिथं बसून ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी, तुकारामाचे अभंग असं काहीतरी पुढे घेऊन प्रवचन करीत.

वाण्याच्या ओसरीत आता दोन माळकरी येऊन ठेपले होते. जोशी शिंपी धोतर पिळीत होता. गोविंदा भाजीवाला कंदील लहान करून ठेवीत होता. खुद्द संतूवाणी तक्क्याशी टेकून बसला होता. दुकानातील सर्व जिनसांचा मिळून एक तिखट ओलसर वास हवेत दरवळत होता. तेलानं तुकतुकीत झालेली बाकं, काळवटलेले डबे, रंगीत चहाचे पुडे, निरनिराळ्या

चिठ्ठ्या डकवलेली हिंग, जिरे, धने इत्यादी डब्यांची चळत, सारं दुकान या पावसात छातीशी ढोपरं टेकून निजलं होतं आणि एका पारड्यात वजन टाकलेला तराजू, दीडपायावर शांत उभा होता. गळ्यातील माळेशी खेळत संतूवाणी म्हणाला,

"रामजी आले नाहीत"

पिळलेल्या धोतराचा भाग झटकीत जोशी शिंपी म्हणाला,

"हो, आले नाहीत."

"येऊ द्या त्यांना!"

"हो, येऊ द्या. मग करू आरंभ."

कंदील लहान केल्यावर गोविंदा भाजीवाला बाकावर बसला. तिघे जरा वेळ काहीच बोलले नाहीत. मग जोशी शिंपी म्हणाला,

"दार लावू? झड येते आत!"

"पण रामजी येतील."

"हो. रामजी येतील."

रस्त्याकडे तिघांनी निरखून पाहिलं. पण रामजीचा कंदील हलताना दिसला नाही, बाहेर मिट्ट काळोख होता. पाऊस त्यावर वेगळा वाजत होता म्हणूनच रस्ता आहे हे कळत होतं.

गोविंदा भाजीवाला म्हणाला,

"ही हवा दम्याला वाईट."

"शिनाऱ्या भुईला डोकं टेकून पडला असेल. अशाच हवेत तो मरेल एकदा."

"मरतोय कसचा! हीच माणसं चिवट असतात."

"हो हो! कुडी सोडायला तयार नसतात."

"पाऊस थांबू द्या. पहाल, विडीचे झुरके घेत बाहेर पडेल तुरूतुरू."

"अशांना धाड नसते."

"नि टगे भराभर मरतात."

यावरून सर्वांनाच रामजी लोहाराच्या पोराची आठवण झाली. वाणी म्हणाला,

"आज चौथा दिवस, पोर पुरात गेल्याला."

"हातातोंडाशी आलेलं पोर गेलं."

"रामजीचं वय काय असेल?"

"साठीच्या आसपास."

"वंश खुंटला."

"मुलगा वांड नव्हता. कसा गेला पुरात?"

"पोरं धमकीत जातात."

"गाय व्याली का शिवाची?"

"छे हो! तीन दिवस घेईल."

"आज विईल बघा."

"त्याचा पोरगा आला का माथेरानहून?"

"या पावसात?"

"तो येईल."

"कशाला? मरायला? जाईल कड्यावरून खाली."

पुन्हा कुणाला रामजीची आठवण आली.

"रामजी नाय आले."

"बोलवायला जायचं?"

"जा, जोशीबुवा, तुम्ही जा. भात्याशी दुःख करीत बसला असेल तो."

कंदील उचलून मोठा करीत जोशीबुवा बाहेर पडला.

पाऊस पडतच होता.

शिवा नेमाणे वारंवार बेड्याशी येऊन गाईकडे पाहत होता. गाय उभी होती त्या आसपासच्या जागेतचं गळणं कमी होतं. गाईने विण्यासाठी हाच दिवस निवडावा याचा शिवाला वैताग आला होता. मधूनच त्याची बायको उठून गोठ्यात डोकावून जात होती. गाईची तगमग तिला जास्त कळत होती. वेणांमुळे गाईचं अंग उभ्याउभ्या वेडंवाकडं होत होतं. मग मधूनच ती बसत होती, धडपडत उठत होती, मधूनच माना वर करीत होती. सरळ नजरेने कुठंतरी टक लावून पाहत होती. तिचा मागला भाग फुगत चालला होता. पाणथळीचा निळाकाळा गोळा बाहेर येत होता. बेड्यातील कोपऱ्यात राकेलचं ढमणं धूर टाकीत जळत होतं. वाऱ्यानं त्याची ज्योत हलत होती आणि गाईची तगमग अधिकच तीव्र भासत होती. शिवा म्हणाला,

"सोनाराचा उकाडा अवंदा बंद करायचा. साला पैका देत नाय एक."

त्याची बायको म्हणाली, "कवापासून म्हणत होती, तुमी सरकारी मानसास्नी गाठा."

"हा! पगारवाला बरा, येक तारिखेस पैका येतो."

एकमेकांना धीर द्यायलाच दोघं अधून-मधून असली बोलणी अधून-मधून करीत होती. गाय धडपणे विते की नाही हे भय आतून होतं. तिची सुटका नीट झाली तर बरं!

बायको म्हणाली, "अर्ज्या माथेरानास्नं येतो की नाय?"

"तो कसला येतो. धुवांधार पाऊस चाललाय."

"येईल पगा."

"नाय आला तर बरा. डोंगर उतरूनशान यायचं या पान्यात. काय खरं नाय त्ये. बुळबुळीत झालयं समदीकडं."

"मग रामजी लोहारास्नी बोलावता?"

"अगऽ! त्याला कसं म्हणायचं ये म्हून? त्याचं पोर गेलं."

"त्ये बी खरंच."

इतक्यात बेड्यातून गाईचे खूर थडथड वाजलेले ऐकू आले. दोघे बेड्याकडे धावली.

मुलगा पुरात गेल्यापासून चार दिवस रामजी भात्याला टेकून बसला होता, तो उठला नव्हता. आतून अधून-मधून त्याच्या बायकोचं रडणं ऐकू येत होतं. एक ढमणी कोपऱ्यात धूर ढाळीत तांबडा उजेड देत होती. तिन्हीसांजसारखा उदासपणा घरभर पसरला होता. रामजीच्या मनात एकच एक कोरडा प्रश्न येत होता - आपला मुलगा का जावा? विठ्ठला, तू हे काय केलंस? मुलानं असा काय अपराध केला होता? त्याचं आयुष्य असं अर्ध्यावर का संपावं? नि मी म्हातारपणी निःसंतान होऊन का बसावं?

यापूर्वी, पिकं आली नाहीत, धंदा नसला, चोरी झाली - कशानंही रामजीचं मन ढळलं नव्हतं आणि कुणी अशी संकटं सांगत रडत आला तर रामजीनं त्याला शांत केलं होतं. चार अभंग ऐकवून, संतांचे पुरावे देऊन. लोक म्हणत, रामजीशी बोललं की दुःख हलकं होतं.

पण त्याच रामजीचं दुःख आज कशानं हलकं होत नव्हतं. जे काही आजपर्यंत लोकांना त्यानं सांगितलं होतं ते वरवरचं समाधान होतं. जीव नि मृत्यू यांतलं त्यालाही कळलं नव्हतं, नि संतांनाही कळलं नव्हतं. त्यामुळे आज कधी केलं नव्हतं ते तो करीत होता. परमेश्वराला प्रश्न टाकीत होता. आपली तीस वर्षांची वारी त्याने परमेश्वरापुढे टाकली. कुठं पुण्य गेलं त्या वारीचं? प्राक्तनानं मुलगा गेला! कसलं प्राक्तन? म्हातारपणी मी रडावं हे प्राक्तन?

जी भाषा इतरांच्या वेळी समाधान करण्यास त्यानं वापरली होती त्यातला अर्थ सुना झाला होता. विठ्ठलावर तो चिडला नव्हता. तेवढा आवेशही राहिला नव्हता. घड्याळ बंद पडावं, मग वेळ खोटी वाटावी तसं त्याला वाटू लागलं होतं. इतकी वर्षे विठ्ठलाच्या भक्तीमुळे आपण जगत आहोत असं त्याला वाटलं होतं. पण मुलगा जाताच मुलासाठी आपण जगत आहोत हे त्याच्या एकदम लक्षात आलं. मुलगा होता तोपर्यंत आपला जीव निराळा, आपला जगण्याचा आशय निराळा नि मुलाचा निराळा असं त्याला वाटतं होतं. पण मुलगा गेला नि स्वतःचं शरीरही त्याला निरर्थक वाटू लागलं. आपला देह जणू पिशवी होता. त्यातील पदार्थ सांडताच पिशवीचं काय करायचं?

कुणाही वारकऱ्यानं सांगितलं असतं की रामजीचं दुःख हा अहंकाराचा एक प्रकार होता. पण जसं केंबळखेडं पावसातून सुटू शकत नव्हतं तसाच रामजीही या अहंकारातून सुटू शकत नव्हता.

पडवीचं दार उघडून जोशी शिंपी आत आलेला रामजीला कळला नाही. जोश्यानं छत्री कोपऱ्यात ठेवली. कंदील कट्ट्यावर ठेवला आणि बोलण्यास कशी सुरुवात करावी हे न कळून गोंधळून जरा उभा राहिला. मग म्हणाला,

"रामजी, मंडळी तुमची वाट बघताहेत."

रामजीची नजर हलली नाही. मान हलली नाही. जोशी म्हणाला,

"रामजी, उठा. बुधवार आहे आज."

यावेळी हाक ऐकू येऊनही रामजीला बोलावंसं वाटलं नाही. जोशी आता पुढं झाला. रामजीजवळ जाऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला,

"रामजी! चला. ज्ञानेश्वरी झाली की बरं वाटेल."

रामजी मनात म्हणाला, मला कशानं बरं वाटणार नाही - कशानं नाही. सगळं खोटं आहे. हे जग खोटं आहे. मी खोटा आहे. ज्ञानेश्वरी नि विठ्ठल खोटे आहेत. आपण सारे उगीचच इथं आहोत.

पण कुणाशी बोलण्याची किंवा वाद घालण्याचीही त्याची इच्छा गेली होती. कुणी म्हटलं, 'जेवायला उठा' तो उठत होता. 'कपडे बदला' कपडे बदलत होता. मुलगा गेल्यापासून चार दिवस हे असंच चाललं होतं. यावेळीही जोश्यानं उठा म्हणताच तो उठला. यंत्रासारखा दाराकडे गेला. जोश्यानं कंदील उचलला, बाहेर येताच दार लोटून घेतलं. रामजी पडवीतून पुढे होऊन तसाच पावसात शिरला होता. जोश्यानं झटकन छत्री उघडून, त्याच्या डोक्यावर धरली. मग आजाऱ्याला जपावं तसं तो रस्त्यातून रामजीला जपू लागला - "रामजी! पुढे खड्डा आहे, जपून! रामजी, दगड आहे - " वाण्याच्या पडवीत शिरताना वाकलेल्या छपराशी येताच तो म्हणाला, "खाली वाका, रामजी."

संतू वाण्याच्या दुकानात शिरल्यानंतरही रामजीनं इकडे तिकडे पाहिलं नाही. नजर समोर ठेवून तो आत शिरला आणि शिडी चढून माळ्यावर आला. समोर दिसलेल्या जागेवर बसला नि मांडी घालून निर्विकार चेहऱ्याने पाहत राहिला. बाकीचे माळकरी आपापल्या जागेवर होते. कुणीही रामजीकडे सरळ पाहण्याचं धाडस करीत नव्हतं. जणू रामजीचा पोरगा गेला हा त्यांचाच अपराध होता.

पोथीसमोर संतू वाणी बसला होता. त्याच्या मनात आज तिथं बसायचं नव्हतं. त्यामुळे तो अस्वस्थ होता. त्यानं एकदा आपल्या तीनही श्रोत्यांकडे नजर टाकली. आज काय वाचावं हे त्याला कळेना. त्याने पोथीला नमन केलं. इतरांनी केलं. रामजी मात्र हात मांडीवर ठेवून बसलेला होता. त्यानं नमस्काराला हात वर उचलले नाहीत. संतूच्या मनात आलं, आज जोश्याने किंवा गोविंदालाही बसायला हरकत नव्हती. आज मी काय सांगणार?

त्यानं पुन्हा रामजीकडे पाहिलं. त्याच्या मनात आलं - दुःखानं माणूस असा बधिर होतो. रामजी इतका जवळचा पण त्याचं दुःख मला लागत नाही हे आश्चर्य आहे. आपण कळवळलो पण आतलं सुखी व निश्चिंत मन हललं नाही. आपलं सगळं ठीक आहे, ही भावना नि तिची ऊब कधी ढळली नाही.

परमेश्वराचं कर्तृत्व हे असं आहे. तो एकेकाला गाठून मारतो. एकेकालाच जन्म देतो. माणसानं एकजुटीने त्याच्या विरुद्ध जाऊ नये म्हणून त्याची ही युक्ती आहे. एक माणूस दुसऱ्यासाठी संपूर्ण दुःखी क्वचितच असतो.

पण आज काय वाचावं?

जोश्यानंही रामजीकडे पाहिलं. एकवेळ पाण्यानं ठिबकणारं, वाऱ्यानं फडफडणारं, उन्हानं चमकणारं पान खाली पडावं नि निर्जीव व्हावं तसा रामजी त्याला दिसला. गाडीचे

आस भट्टीत लालपांढरे तापवून दणादण घणानं ठोकणारा हाच का तो रामजी! घाम निथळत असता हसत हसत पोरांना कोट्या करून हसविणारा हाच का रामजी! वाक्यावाक्यांत अभंग पेरून तत्त्व सांगणारा हाच का रामजी! कुठे जनावर आजारी पडलं, म्हैस-गाय अडली की धावणारा हाच का रामजी! मृत्यूच्या धक्क्यानं इतका हबकलेला माणूस आपण पहिल्यांदाच पाहिला. आपल्या मामाच्या तीन बायका मेल्या, त्यानं चार लग्न केली; असं वैराग्य मामात कधीच दिसलं नव्हतं. माणूस मृत्यू विसरतो. रामजीही विसरेल. माणसाचं मन मृत्यूच्या बाबतीत परमेश्वरानं विसराळू केलं आहे ही केवढी दया आहे. नाहीतर लहानपणी फुटलेल्या भावलीचं दु:खही मरेपर्यंत माणसाला सुटलं नसतं.

शिवाच्या बेड्यात गळू लागलं होतं आणि घरातही गळत होतं. ठिबकलेलं पाणी काढण्याची त्याच्या बायकोची धडपड सुरूच होती. कोणत्याही ऋतूत हे गळकं-मोडकं घर त्यांची धावपळ करीत होतं. हिवाळ्यात थंड वारा आत घुसत असे नि पांघरुणं अपुरी पडत. उन्हाळ्यात सगळं तापून निघे आणि धूळच धूळ आत येई. शिनाऱ्याला आठवत होतं तेव्हापासून असंच होतं. शेतीशिवाय दुसरा काहीतरी जोडधंदा म्हणूनच त्यानं कर्ज काढून ही गाय घेतली होती. पुढे म्हैस घेणार होता. गाईची सुटका झाली तरच ठीक होतं.

माथेरानला नोकरीला गेलेला आपला मुलगा आज त्याला सारखा इथं हवासा वाटत होता. शिवा नेमाण्याची पन्नाशी उलटली होती. नि ताण पडणारे असे प्रसंग त्याला एकट्याला सहन करणं आता कठीण होत चाललं होतं. आपला तरुण अर्ज्या इथं असता तर काही वाटलं नसतं - या पावसाचं - गळण्याचं - गाईच्या सुटकेचं. एकीकडे त्याला हेही कळत होतं की, या पावसात त्यानं डोंगर उतरून येणं धोक्याचं होतं. पण मुलानं तो धोका घेऊन डोंगर उतरावा असं त्याला आतून वाटत होतं.

त्याची बायको गळणारं पाणी टिपता टिपता मधूनच कंबर धरून उभी राहत होती. गरिबीशी झगडता झगडता ती अकाली म्हातारी दिसू लागली होती. तिचे केस गळले होते. शरीर वाळलं होते; प्रत्येक काम या संसारात कष्टाचं होऊन बसलं होतं. नि जेव्हा काम नसे तेव्हा उत्पन्नही नसल्यानं अधिक कष्ट वाटत होते. कित्येक वेळा तिच्या मनात आलं तसं आजही आलं. लहाणपणी ऐकलेली एक कहाणी ती स्वत:शी रंगवू लागली. शंकर-पार्वती वरून विमानातून जात आहेत, पार्वतीचं लक्ष आपल्या घराकडे गेलं. इथल्या माणसांचं दारिद्र्य, कष्ट पाहून तिला कळवळा आला. शंकराला तिनं विमान उतरावयाला लावलं. झोपडीत येऊन तिने आपल्याला एक मणी दिला. तो घासताच हवं ते आपल्याला मिळू लागलं.

नेहमीसारखी या कल्पनेत ती रंगली. पार्वतीला आपण नमस्कार केलाय, तिच्याशी बोललो, मग नवरा आल्यावर पार्वतीने दिलेल्या मण्याचा प्रभाव आपण त्याला दाखविला. त्याचा चेहरा खुलला. त्याचा आनंद पाहून आपल्या डोळ्यांत पाणी तरारलं. जणू मणी

आपल्या हातांतच आहे असं वाटून तिनं आताही इच्छा केली, अर्ज्याला एक सुंदर, सशक्त बायको हवी. मग सून आल्याच्या आनंदात ती गुंग झाली.

संतूवाणी केव्हा पोथी सुरू करतो याची सर्वजण वाट पहात होते. खाली मान ठेवून, एकदा खोकून तो म्हणाला,

"सावधान मंडळी."

सर्वांनी मान हालविली. फक्त रामजीची मान हलली नाही. संतूने आरंभ केला -

"ज्ञानेश्वर माउलीनं ज्ञानेश्वरी सांगून सगळ्या जगाला उपकृत केलं. अर्जुनाला कृष्णाने मोहातून सोडवलं तर ज्ञानेश्वरांनी आपल्याला सोडवलं. आता त्यांचा अमृतानुभव आपण चाखून पाहू - 'ज्ञान अज्ञान भेद कथन' हा अध्याय वाचतो. काय जोशीबुवा!"

जोशीबुवांनी मान हलविली. त्याने एकदा रामजीकडे पाहिले, मग पोथीकडे टक लावली. प्रवचन सुरू झाले.

रामजीच्या कानांवर प्रवचनाचे शब्द पडत होते इतकेच. त्याचं मन भरकटत होतं. त्याच्या मुलाचा देह अजून हाती लागला नव्हता. तो देह त्याला दिसत होता. जिवंतपणीचा. तापवून लाल केलेली धाव आपण ऐरणीवर सांडसीनं पकडून धरल्यावर तो घणाने कसे धपाधप घाव घाली. त्याचे दंड चांगलेच पिळदार होऊ लागले होते. घण मारताना त्याच्या दंडाचे स्नायू फिरक्या घेत. मुलगा असा समोर काम करीत असता, मुलाऐवजी आपणच आपल्या वडिलांसमोर काम करीत आहोत असा त्याला भास होई. आपलं जे काही आहे ते आपण मुलामध्ये ओतलंय याचा आनंद एखाद्या समाधीच्या आनंदासारखा होता. जणू आपणच मुलाच्या रूपानं पुढे जगत आहोत ही भावना एक तऱ्हेच्या अक्षयतेची जाणीव करून देत असे.

मुलगा जाताच ही जाणीव गेली होती. पोपटात जीव असलेला राक्षस, तो पोपट जाताच जसा तडफडू लागतो व निर्जीव होतो तसा निर्जीवपणा आपल्यात आला आहे, असं त्याला वाटत होतं.

संतू वाणी वाचीत होता,

"आता अज्ञानेची मारे ।
ज्ञान अभेदे वावरे ॥
नीद साधोनी जागरे ।
नांदिजे जेवी ॥ "

ओळ वाचून होताच संतू वाण्यानं सर्वांकडे पाहिलं. मग आधी जे ओवीच्या सुरात त्यानं वाचलं तेच सरळ गद्यात म्हणू लागला :

"ज्ञानोबा सांगतात, आता अज्ञानाचेनि मारे, ज्ञान अभेदे वावरे, नीद साधोनि जागरे, नांदिजे जेवी."

सर्वांनी माना हलविल्या. काही सोपे अभंग किंवा ओव्या सोडल्यास, आपण काय वाचीत आहोत हे वाचणाऱ्यास कळत नव्हतंच पण ऐकणाऱ्यांनाही इथं कधी कळत नव्हतं. आजपर्यंत वीस वर्षे अशाच तऱ्हेनं ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी हे ग्रंथ त्यांनी शंभरदा वाचले होते. बहुतेकांची ज्ञानेश्वरी पाठ होती. पण अर्थाची कुणाला जरूर वाटली नव्हती. संस्कृत मंत्र ऐकताना अर्थ कळत नसतो, पण आपण शिकलेलेसुद्धा ज्या भावनेनं ते ऐकत असतो ती भावना तिथं होती. संतू वाण्याने पहिली ओवी गद्यात वाचल्यावर विचारलं,

'समजलं?'

सर्वांनी पुन्हा माना हलविल्या, तो पुढे वाचू लागला,

" का दर्पणाचा निघाला। ऐक्य बोधु पहिला॥
सुखभोगी अपुला। आपणची॥ "

आणि ही ओवीही आपण व्यवस्थित संपूर्ण अर्थबोध करून, फोड करून सांगत आहोत अशा आविर्भावात गद्यात वाचली.

रामजीच्या कानावर ओवी पडत होती. नि आता तो मुलाचा देह पुरात वाहत चाललाय असं पाहत होता. सारं जग किती खरं खरं वाटत राहतं नि अचानक सगळं खोटं ठरतं! पुराच्या तांबड्या लोंढ्याबरोबर वरखाली वाहात असलेल्या देहात काही उरलं नसेल. तो फक्त एक पंचमहाभूतांचा भाग असेल. तो रामजीचा मुलगा नव्हता. भांडणारा-खेळणारा, 'बाबा' म्हणून हाक मारणारा; आता कुठंतरी किनाऱ्याच्या नदीत उतरलेल्या फांदीला तो देह अडकला असेल. त्याला सृष्टीचं भान नसेल. तो कुणाला ओळखणार नाही. पाहणार नाही. फक्त जीव गेलाच की माणूस असहाय होतो. असा एखाद्या फांदीला, तांबड्या पाण्याचा मारा खात अडकून राहतो.

रामजी हे विचार करीत होता आणि इतरही अस्वस्थ होते. त्यामुळे आज वाचनातही रंग भरत नव्हता. कुठल्याही शब्दांनी, मग ते अमृतानुभवातील असोत, माणसाला समाधान मिळत नाही. अशा प्रसंगात तर नाहीच. सर्वांना ही जाणीव होत होती. तल्लीन झाल्यासारखे करून, गंभीरपणाने ऐकून, जो तो इथं समाधान आहे, हे इथं उत्तर आहे - असं दाखवीत होता, एवढंच. दोन तीनशे, पाचशे वर्षांपूर्वी कुणीतरी पोथी किंवा अभंग लिहितो नि ती पोथी किंवा अभंग आपण जीवनाचं सर्वस्व करतो. त्या आधी ती पोथी नव्हती, अभंग नव्हते; मग तेव्हा लोक काय करीत होते? अशीच आज अज्ञात असलेली, त्यापूर्वीची पोथी काढून वाचीत होते - समाधान घेण्याचा प्रयत्न करीत होते.

अशा तऱ्हेचं काहीतरी तीनही माळकरी श्रोत्यांच्या मनातून धावत होतं. जसजशी एकेक ओवी पुढे जात होती तसतशी त्यातून दुःख निवारण्याची धडपड व्यर्थ वाटत होती. कसलाच रस त्या वाचनातून उत्पन्न होत नव्हता. शांत रस उत्पन्न होण्यास मनाची जी अवस्था आणावी लागते ती कुणालाही आणणं जमत नव्हतं

आणि ओवी संपली की संतूवाणी श्रोत्यांकडे पाहात होता. श्रोते मान हलवीत होते नि तो पुढची ओवी वाचीत होता.

शिवा नेमाणेची गाय आता जोरजोरानं मधूनच हंबरू लागली होती. शिवा नि त्याची बायको बेड्याच्या आसपास सारखी खेपा घालू लागली. पाऊण तासापूर्वीच गाईची पाणथळ फुटली होती. नि आता तिच्या वेणांच्या वेदना वाढू लागल्या होत्या. गाईची उठबस वाढली होती. आपल्याला काही करता येत नाही, या जाणिवेने नवरा-बायको हतबल होऊन दुरून तिच्याकडे पाहत उभी होती. एक जीव जन्माला येण्यावेळच्या काय या यातना! एक कोंब फुटतो, एक फूल उमलतं, एक फळ लागतं. सृष्टीत सदासर्वदा हे जनन चालू असतं नि सतत यातना चालू असतात. या यातनांचं एक तंतोतंत लहानसं रूप त्या जोडप्याच्या तोंडावर दिसत होतं.

अचानक गाय धडपडत उभी राहू लागली. फताडलेले पाय जवळ ओढून प्रयासानं उभं राहता राहता तिनं एक करुण हंबरडा फोडला. ती उभी राहिली नि वासराच्या पायाचा खूर बाहेर आला.

शिवानं जोरानं बायकोचा दंड आवळून धरला. ताणलेल्या डोळ्यांनी ती गाईकडे पाहत होती. स्वतः स्त्री असल्यानं तिला वेदनांची पूर्ण जाणीव होत होती. नवरा-बायको तल्लख होऊन बेड्याच्या एका वाशाला गच्च धरून पाहत राहिली. दोघांचे श्वास थांबले.

वासराचा एक पाय बाहेर येताच दुसराही बाहेर येईल असं वाटलं होतं. पण पाय आत गेला नि डोकं दिसू लागलं. डोक्याकडून जगात उडी मारण्याची वासरानं जरा चुळबूळ केली नि ते पुन्हा फिरलं.

गाईची तगमग भयंकरच वाढली. वेदना असह्य होऊन ती इकडे तिकडे थयथय करू लागली. तिचं तोंड वारंवार वर होऊन धापा टाकू लागलं. ती अधिक करुण सुरात हंबरू लागली. शिवा नेमाणेच्या बायकोच्या एकदम लक्षात आलं - गाय अडली आहे.

मोठ्यानं विचित्र सुरात हेल काढून तिनं रडण्यास सुरुवात केली. शिवा खिळल्यासारखा गाईकडे टक लावून पाहत होता. त्याचे अवयव बधिर झाले होते. बायकोनं त्याला दंडाला धरून ओरडत हलवलं. तरी त्याची स्थिर नजर हलली नाही. तेव्हा ती नवऱ्याचा दंड सोडून रडत झोपडीबाहेर आली नि रस्त्याने धावत ओरडू लागली,

"रामजी दा! रामजी दा! धाव रे बाप्पा ! माझी गाय अडली रंऽ आता काय करू? धाव रं ऽ"

रामजीच्या डोळ्यांपुढला मुलाचा देह गेला होता. चाललेलं वाचन त्याला काही काही ऐकू येऊ लागलं होतं. एकाएकी त्याला विठ्ठलाचा संताप वाटू लागला. आपली करुण हाक त्याच्या कानावर गेली नाही तर हे पोथीतले निर्जीव शब्द काय जाणार? का हे लोक निष्कारण वाचीत बसले आहेत. पंचवीस वर्षे हे सारं हजारदा वाचून झालं आहे. यातून काय निघालं? विठ्ठलानं काय केलं ते कानावर पडून? माझा मुलगा नेला. आयुष्यभर हे असंच वाचीत राहतील. तेच शब्द - तेच ते ग्रंथ नि मरताना विठ्ठल विठ्ठल म्हणतील. माझ्या मुलाला त्याच विठ्ठलानं इतकं अवचित नेलं की 'विठ्ठल' म्हणायलासुद्धा त्याला अवधी मिळाला नाही. त्याला

गती मिळणार नाही का? विठ्ठला! या सर्वांची उत्तरं मला दे. मी तुला विचारतोय - रामजी. पंचवीस वर्षे माळकरी असलेला माळकरी रामजी!

संतू वाण्यानं सहावी ओवी वाचली होती. तो तिचा 'अर्थ' सांगत असता, हे निर्जीव चाललेलं प्रवचन कसं नि कुठं संपवावं याचा तो विचार करीत होता. इतक्यात रस्त्यावरून शिवा नेमाण्याच्या बायकोचा रडवा किंकाळा आवाज आला,

"रामजी दा ! रामजी दा!"

जोशी रामजीकडे पाहात हळूच गोविंदा भाजीवाल्याला म्हणाला,

"शिवाची गाय अडलेली दिसते."

त्याचं वाक्यही संपलं नाही तोच खालच्या दारावर मुठी नि डोकं आपटल्याचे आवाज आले. तिघे माळकरी रामजीकडे पाहू लागले. नेमाण्याच्या बायकोचा रडवा सूर मागोमाग आला,

"रामजी दा, धाव! माजी गाय अरली रऽ ! सोरीव तिला. धाव!"

रामजीच्या बधिर मनात काहीतरी हलू लागलं. 'धाव-धाव' ही आरोळी आपण कुठं ऐकली? रामजीला वाटलं, पुराच्या खळखळत्या पाण्यातून, सोसाट्याच्या वाऱ्यातून ती आली होती. आपण कानशीनं खिळे घाशीत होतो. आपण घरी होतो, नाही, ती हाक आपल्याला ऐकूच आली नाही. ही आरोळी ती नव्हे. ही नेमाण्याची बायको हाकारीत आहे. तिची गाय अडली आहे, की माझा मुलगा ओरडतो आहे? - धाव.

'उठ! उठ' तो स्वतःला म्हणाला. शरीर उठलं. दुःखाने अवघडलेल्या त्या शरीराचा जरा झोक गेला. रामजी तोल सावरीत ओरडला, "आलो, आलो."

त्यानं सदऱ्याच्या बाह्या वर केल्या. शिडीकडं जोरानं पावलं टाकली. शिडी धाडधाड उतरून दरवाज्याकडे धावला. दार उघडून बाहेर उभ्या असलेल्या नेमाण्याच्या बायकोला म्हणाला -

"पळ! माझी पेटी घेऊन ये औषधांची."

डोळे पुशीत ती धावत-पळत सुटली.

ती जाताच रामजी झपझप नेमाण्याच्या झोपडीशी येऊन, बेड्याच्या तोंडाशी थबकला. त्यानं एका नजरेत बेड्यातील स्थिती पाहिली. रागाने तो नेमाण्याला म्हणाला,

"काय रे गद्ध्या! उघड्यावरच ठेवलीस गाय! घोंगडीचा आडोसा लावायची तुला अक्कल नाही. म्हणूनच ती अडली. तुम्ही दोघं सारखं डोकावून पाहात होता ना? डोकं आहे का मडकं तुमचं?

बोलत असताच त्यानं अंगातला सदरा काढून नेमाण्याकडे फेकला. धोतर वर खोचलं. मग अगदी धिम्या पावलांनी तो गाईकडे गेला. तेथे वर-खाली पाहात नेमाण्याकडे परतून म्हणाला,

"मूर्खा! गाईखाली पेंढा पसरायलासुद्धा तुला सांगायला हवं का? तुमच्या घरी विण्यापेक्षा गाईला रानात विणं परवडेल."

नेमाणे पेंढा आणायला धावला. रामजीनं हळूच गाईकडे डोकावून पाहिलं. डोक्याकडून बाहेर येण्याचा वासरू पुन्हा प्रयत्न करीत होतं. गाईनं एक दोनदा हंबरडा फोडून आपल्या कळांना वाट करून दिली. रामजीनं आपले तळवे, किंचित दाब देऊन, हळूहळू तिच्या दोन्ही कुशींवरून फिरविण्यास सुरुवात केली. हे सुरू असता तो नेमाणेला म्हणाला,

"बादलीत पाणी आण."

नेमाणेनं धावत जाऊन बादली भरून आणली. बादलीत हात बुडविताच रामजी ओरडला,

'ए बैलोबा! गरम पाणी हवाय."

रामजीची प्रत्येक शिवी नेमाणे कौतुकानं ऐकून घेत होता. रामजी आलाय, मनातून तो निर्धास्त झाला होता. रामजीच्या सांगण्याप्रमाणे धावपळ करीत होता. रामजी शिव्या देत होता. खेकसत होता. आता गाईची सुटका करण्याची तो शिकस्त करील. रामजीनं शिव्यांबरोबर एखादा फटका मारला असता तरी त्यानं तो कौतुकानं झेलला असता. तो चूल पेटवायला धावला.

तेवढ्यात नेमाण्याची बायको पेटी घेऊन आली. नवरा चुलीशी खटपट करीत असलेला तिनं पाहिला. पेटी रामजीपुढं ठेवून ती चुलीकडे धावली.

आता पाऊस पडत होता त्याची आठवणसुद्धा राहिली नव्हती. बेड्यात जाता येताना अंगावर पागोळ्या पडत होत्या, त्यांचं काही वाटत नव्हतं. नेमाणे जोडप्याला आकाश स्वच्छ निळं झाल्यासारखं वाटत होतं.

रामजीनं पेटीतून पोटॅशियम परमँगनेटची बाटली काढली, गरम पाण्याची बादली नेमाणेनं आणताच एक चिमूटभर औषध आत टाकलं. दोन्ही हात बुडवून त्यानं पाणी खळबळवलं. ते हवं तेवढं लाल होताच त्यानं त्यात हात धुतले आणि नखांत नखं घालून ती साफ केली. नखं कुठे टोचण्यासारखी नाहीत ना पाहिलं.

उठून तो गाईशी आला. पुन्हा तिच्या पोटाच्या बाजूंनी हात दाबून फिरवू लागला. त्याचं हात फिरवणं सुरू होताच गाईनं त्याच्याकडे मान वळवून पाहिलं. माणसाला म्हणावं तसं तो तिला म्हणाला –

"धीर धर - माझी बाय!"

वयामुळे रामजीचे पिळदार दंड जरा ओथंबले होते. हात फिरवीत असता स्नायू लोंबून हलत होते. काही वेळ हात फिरविताच त्याला दोन्ही खांद्यांशी जरा भरून आल्यासारखे वाटू लागले. उठून त्याने पेटीतून लाल तेल काढलं नि तळहातांवर ओतलं. वासराचं डोकं दिसत होतं तिथं दोन्ही हातांनी फासलं. पुन्हा तो तिच्या पोटाच्या बाजूंनी हात फिरवू लागला.

महाकळीचा जोर वाढला होता हे गाईच्या आणखी वाढलेल्या हंबरण्यावरून आणि अस्वस्थपणावरून कळत होतं. रामजीनं पुन्हा पोटॅशियमच्या तांबड्या पाण्यात हात बुचकळले आणि तोंडाशी आलेल्या वासराच्या डोक्याभोवती दोन्ही हातानं धरून तो त्याची जागा बदलू लागला.

आता बाहेरच्या पावसाचा गारवा त्याला भासत नाहीसा झाला होता. त्याचं अंग आतून गरम होऊ लागलं होतं. त्याला कुठलं भान नव्हतं. सगळं लक्ष गाई-वासरांत होतं. एक जीव इथं अडकला होता. त्याला बाहेरच्या जगात यायचं होतं, बागडायचं होतं, आणि त्याला कुणीतरी अडवून ठेवलं होतं.

वासराचं डोकं आत सारून तो ते चिमुकलं शरीर वळवू लागला. आत गेलेली त्याची बोटं जणू अज्ञयाचा वेध घेत होती. माणसाच्या ज्ञानापलीकडील घटनेचं ज्ञान घेत होती. आणि ती घटना आपल्याप्रमाणं वळवू पाहात होती. त्याची सगळी शक्ती, कौशल्य बोटांत येऊन राहिलं होतं. ज्ञानेश्वरांनी म्हटलं असतं, आता बोटं डोळे झाले आहेत, बोटं मेंदू झाले आहेत. बोटं जिवाशी झगडत आहेत. ढोपरांत अर्धवट वाकून, मांड्या भरल्या की कमरेत ओणवं होऊन, कंबर थकली की गुढघ्यांवर बसून तो वासराचे पुढचे खूर बोटांशी येण्याची वाट पाहत होता.

महाकळ येताच थरथरणारं गाईचं अंग त्याच्या बोटांना कळत होतं. जणू त्या अंगातील अणूरेणूंत कल्लोळ उसळत होता. त्याची बोटं लवलवत होती. शरीर सणकत होतं. महाकळ येऊन गाईनं आतून जोर करताच तोही हात आणखी आत नेऊन म्हणत होता –

"धीरानं - धीरानं - शाब्बास!"

हा जीव वाचविण्याच्या झगड्यातून तू नि मी सारखीच गुंतलो आहोत हे जणू तो गाईला सांगत होता. खांद्याला खांदा भिडवून यातनांची लढाई दोघांना लढायची आहे. आता ही लढाई हरावयाची नाही. जनावराची सुटका करीत असता एकीकडे बोलण्याची त्याची सवय होती. आताही तो गाईला म्हणू लागला,

"धीर धर! छान वासरू आहे. आता ते बाहेर उडी मारेल. मग तू चाटता चाटता ते वाढेल, मोठ्ठं होईल - जरा कळ दे—"

महाकळ विरली नि गाय पुन्हा स्तब्ध झाली. तिच्या अंगावर आता घाम फुटू लागला होता. रामजीने तिच्या पोटाच्या दोन्ही बाजूस हातानं रेटा दिला. त्याचे गुळगुळीत हात निसटू लागले तेव्हा धोतराचा पुढचा सोगा सोडून त्याने हात पुसले. मग तिच्या पोटाच्या बाजू पुसल्या आणि हात फिरवीत महाकळ येण्याची वाट पाहू लागला.

एखाद्या दुष्ट प्राण्यानं थांबून थांबून हल्ला करावा तसं महाकळ करीत होती. आताही गाईचं सगळं शरीर थरथरवीत ती येताच रामजीनं झटकन बादलीत हात बुडविले, पुन्हा हातावर तेल घेतलं नि हात घालून वासराचं शरीर तो वळवू लागला.

या धडपडीत सगळं स्तब्ध झालं होतं. पावसाचा आवाजही स्तब्धावला होता. जणू देव गंधर्व आपली भिरभिरती विमानं थांबवून निश्चल पाहात होते. जणू पृथ्वीवर शुभ-अशुभाचा झगडाच चालू होता. माणसाला जीव हवा होता नि कुणाला नको होता.

रामजीला फक्त तो जीव दिसत होता. आतून त्याला उर्मी येत होत्या. हा जीव वाचवलाच पाहिजे. आपल्यासाठी - गाईसाठी - जगासाठी. आधी कुठे तरी एक दुवा तुटला आहे, तो सांधला गेला पाहिजे. कुणी आड येवो, कुणाची इच्छा नसो.

आतल्या जीवाची बाहेर येण्याची धडपड रामजीला कळत होती. त्या जीवाची ती अगतिकता! अशा जीवाबाबत ज्ञानेश्वरांनी काय म्हटलं असतं? ते म्हणाले असते - विश्वोत्पत्तीची अनुभूती आली. - रामजीला स्वत:ला जनावरांची सुटका करताना अनेकदा नवल वाटलं होतं, हा जीव इथं कसा येतो? कसा तयार होतो? हा सर्वांत मोठा चमत्कार आहे. सर्व तत्त्वांचं सार इथं आहे. त्याला कधी कधी वाटे - वासरात येणारा हा जीव किंवा त्यातून जाणारा जीव केव्हातरी हाती लागेल. केव्हातरी साक्षात्कार होईल.

आलेली महाकळ सहन न होऊन गाईने पुढचा एक पाय दुमडला. मग दुसराही दुमडून ती तोंड जमिनीवर टेकून धापा टाकीत अगतिक पडली. आता पोटातलं ओझं सहन न होऊन ती मागचे पाय दुमडून पडेल हे लक्षात येऊन रामजी ओरडला,

"ए मूर्खा! धाव! उचल तिकडून. उभी करू तिला."

गाईला उभं करण्याची दोघांनी धडपड सुरू केली. तिला उचलून उभी करता करता नेमाणे श्वास टाकू लागलाच, पण सवय असूनही रामजीसुद्धा घामाघूम झाला. गाईला उभं केल्यावर तो परत तिच्या मागे आला.

गाईलाही धाप लागली होती. येऊ घातलेल्या नव्या नव्या कळांची ती तयारी करीत होती. त्या जेव्हा येऊ लागल्या तेव्हा त्या जणू आपल्याच अंगात शिरत आहेत असा रामजी थरथरू लागला. त्याचं सगळं शरीर तल्लख झालं. गाईला त्यानं एकदोनदा थोपटलं, गोंजारलं, हात पाण्यात बुडविले, तेल घेतलं आणि पुन्हा वासराचं शरीर वळवू लागला.

आता त्याला आवेश आला होता. जणू अज्ञेयाशी तो प्रत्यक्ष झटापट करीत होता. कसला तरी सूड उगवणार होता - काहीतरी सिद्ध करणार होता. गमावलेलं काही मिळविणार होता. गाईच्या पोटातील हालचालीशी त्याचं पुरं तादात्म्य झालं होतं. कळा भराभर येऊ लागल्या होत्या. वासरू जगात टाकण्यासाठी गाय तडफडत होती. तिच्या प्रयत्नांची लकब त्याच्या बोटांतून त्याला कळू लागली होती. नि त्याची बोटं तिला आपोआप साथ देऊ लागली. वासरू आत फिरत चाललं. डोक आत सरकलं. आता रामजीच्या बोटांना त्याचं पोट लागलं. ते आणखी फिरलं नि त्याचे पुढचे खूर रामजीच्या बोटांना लागले.

खूर धरून तो हळूहळू ओढू लागला. वासरू बाहेर येऊ लागलं. रामजी डोक्यापासून छातीपर्यंत घामानं निथळला. गाईच्या सर्वांगावर घामाचे थेंब दिसू लागले. रामजीही गाईबरोबर धापा टाकू लागला.

आणि एकदम न कळल्यासारखं वासरू त्याच्या आवाक्यात पडलं. त्याच्या हातात पडताक्षणीच वासराची लगबग सुरू झाली. जगात येण्याची इतकी घाई त्याला दिसली. रामजीनं वरचं आवरण काढताच वासरानं टुणदिशी उडी घेतली. रामजीनं दिशा देऊन ती उडी गाईकडे वळविली.

गाईचीही लगबग सुरू होती. मागचे पाय इकडे तिकडे वेळावीत, शेपटीं वर-खाली करीत, माना फिरवीत, तिची जीभ वासराची वाट पाहात होती. त्या जिभेला वासरू लागताच झप्झप् चाटणं सुरू झालं.

रामजीनं धोतराचा खोचलेला सोगा खाली सोडून सोग्याला तोंड, मान, छाती, हात पुसले. एकीकडे नेमाण्याला भराभर सूचना देऊ लागला. गाईला खाणं काय घालायचं, वार कशी कापायची, वासराला केव्हा पाजायचं, गाईला गरम पाणी पाजायचं नि स्वच्छ ठेवायचं, तिच्या खाण्यात गव्हाचा भुस्सा किंवा सुंठमिरी किती टाकायची.

बोलता बोलता गव्हाणीच्या वाशावर टाकलेलं आपलं कुडतं त्यानं अंगावर चढवलं. बाहेर काढलेली औषधं पेटीत टाकून पेटी उचलून तो बाहेर आला.

बाहेर पाऊस लागताच त्याला सर्व भान पुन्हा आलं नि गमावलेल्या आपल्या पोराची आठवण झाली. तो उदास चालत राहिला. पावले पुन्हा बधिर होऊ लागली. चेहरा कठोर झाला. संतूवाण्याच्या दुकानाशी येऊन तो आत शिरला. माळ्यावरून खाली येऊन दुकानाच्या ओसरीवर तिघे माळकरी त्याचीच वाट पाहात बसले होते. तो वर येताच जोशी म्हणाला,

"पोथी पुरी करूया."

रामजीला पुढे घालून चौघे शिडी चढून माळ्यावर गेले. जो तो आपापल्या जागेवर बसला. ज्ञानेश्वरांची अमृतानुभवाची पोथी चौरंगावर उघडलेली होतीच. संतूवाणी वाचू लागला :

आता आमोद सुनासि आले।
श्रुतिशी श्रवण निघाले।
आरसे उठले। लोचनेशी॥
आपलेनि समीरपणे।
वेल्हावती विंजणे।
किं माथेची चाफेपणे । बहकताती॥

आताही कुणाला त्यातला अर्थ कळला नाही. पण वाचण्याचा सूर आणि शब्दांचा नाद यांत चौघेही रंगू लागले. आता त्या सुरांतून नि नादांतून आपोआप अर्थ प्रतीत होऊ लागला. सर्वांच्या माना डोलू लागल्या. रामजीचे शून्य डोळे भावनांनी भरू लागले. तिसऱ्या ओवीला सुरवात झाली न झाली तोच तो घळघळा रडू लागला.

संतूवाण्याचं वाचणं चालूच होतं :

जिव्हा लोधली रसे।
कमळ सूर्यपणे विकासे।
चकोरचि जैसे।
चंद्रमा झाले॥
फुलेचि झाली भ्रमर।
तरुणीच झाली नर।

आठ

# तलावातले चांदणे

गंगाधर गाडगीळ

समोरच्या शेवग्याची फांदीन् फांदी फुलून तो पांढरा शुभ्र झाला आहे. नाजूक फुलांनी डवरला आहे. रसरशीत केळ घडाच्या भाराने अंमळ लवली आहे. कलत्या दिवसाचे उन्ह पायऱ्या चढून वर येत आहे. हवा गारव्याने भारावली आहे. गर्भवतीच्या जपून टाकलेल्या पावलांसारखी वाऱ्याची हालचाल होत आहे. सगळे कसे निवांत आहे.

जाताना तू आपल्या हाताने जी दूर केलीस ती जास्वंदीची सडसडीत बाकदार फांदी मात्र अजून हलत आहे. टोकाला असलेल्या लालभडक फुलासकट हळुवारपणे डुलत आहे. त्या फांदीकडे पाहात मी रेलून पडलो आहे. पाऊल कुरवाळीत कोचाच्या हातावर टेकलेल्या पंजाकडे पाहात; आणि तुझी स्मृती त्या सडसडीत बाकदार फांदीसारखीच माझ्या मनात डुलत आहे.

नेहमीसारखीच घराबाहेर पडताना तुझी लगबग झाली. झाकपाक करायची, निवडणेटिपणे उरकायचे, संध्याकाळच्या स्वयंपाकाची तयारी करून ठेवायची–गृहिणींची न संपणारी कामे उरकताना घड्याळाचा काटा किती तरी पुढे धावतो. त्यानंतर नट्टापट्टा! घाईत असले म्हणजे केसांचे वळण मेले नीट जमतच नाही. पदर खांद्यावरून जितका ओघळायला हवा तेवढा ओघळत नाही. ह्यामुळे उशीर होत होता. तेवढ्यात मी कधी नव्हे तो लवकर घरी आलो. डोळे विस्फारून आणि काही तरी टोचरे बोलून तू माझे स्वागत केलेस. मग मी तोंडदेखले नको म्हटले तरी मनातले उमगून तू चहापाणी केलेस आणि लगबगीने बाहेर पडलीस. बाहेर पडताना तू मुरडून मागे पाहिलेस तेव्हा तोंडावर कसलासा नापसंतीदर्शक शेरा होता, पण डोळ्यांत अभिप्राय होता : 'कशी दिसते मी?'

आताच तू गेलीस. अजून तुझ्या स्पर्शाने हललेली ती जास्वंदीची फांदी डुलत आहे, आणि माझे मन अनेक मधुर स्मृतींनी आणि भावनांनी त्या फुललेल्या शेवग्यासारखे मोहरून गेले आहे. असे का झाले आहे ते सांगता येत नाही. पण एखादा प्रसंग, एखादा क्षण माणसाचे हृदय आर्त करून सोडतो, एवढे मात्र खरे.

मला आता तुझ्याशी खूपखूप बोलावेसे वाटते आहे. जे बोलायचे नसते असे मला वाटत होते, ते आता मूक राहायला तयार नाही. जे शब्दांतून व्यक्त व्हायला संकोचत होते ते आता मुग्धतेच्या कोशातून फुलपाखरांसारखे बाहेर पडत आहे. मनाची ही स्थिती फार वेळ टिकत

नाही, हे मला माहीत आहे. म्हणून जसे आठवेल, जसे सुचेल, तसे सगळे तुला ताबडतोब सांगून टाकले पाहिजे. भावनांच्या ह्या वृष्टीने तुला चिंब भिजवून टाकले पाहिजे. ह्याकरिता तू इथे पाहिजे होतीस; पण नको. तू असतीस तर आपल्या एकान्ताचा भंग झाला असता, शब्दांच्या फुलपाखरांचे पंख तुझ्या उपस्थितीच्या स्पर्शाने गळून पडले असते. जे सांगायचे आहे ते कदाचित सांगितले गेले नसते. म्हणून तू येथे नसतानाच मी हे सगळे काही तुला सांगून टाकतो. ह्या विश्वात काहीच नष्ट होत नाही म्हणतात. तसे असेल तर हे माझे सांगणे देखील शिल्लक राहील. कधी तरी, केव्हा तरी तुझ्या कानांवर पडेल, आणि कदाचित हे तुला आधी ठाऊकही असेल.

सांगता येईल असे वाटत होते खरे, पण आता सुरुवात करायची म्हटले तर गोंधळायला होते. फुलपांखरांचे पंख एव्हानाच गळून पडायला लागले, आर्ततेची ओढ इतक्यातच लटकी पडायला लागली. किती विचित्र गोष्ट आहे ही! मूर्तापेक्षा अमूर्त हे नेहमीच सुंदर आणि तरी अमूर्त मूर्त होण्याकरिता नेहमी उत्सुक असते.

मला असे सांगायचे आहे की, तू मला फार फार आवडतेस. अगदी पहिल्याने पाठीवर दोन वेण्या सोडून आपल्या विपुल केशसंभाराच्या आणि विपुल यौवनाच्या तोऱ्यात कॉलेजच्या कॉरिडॉरमध्ये चालताना मी तुला पाहिले तेव्हा तू मला आवडलीस. तुझ्या केशकलापावर निळी धुंदी होती, तुझ्या निळसर डोळ्यांत स्वातंत्र्याची मस्ती होती. तुझ्या बांध्यात मादक डौल होता, आणि तुझ्या चालीत स्वच्छंदीपणाची लचक होती.

तू पहिल्याने दृष्टीस पडलीस तेव्हा मी मंत्रमुग्धच झालो. अतिचिकित्सा करायची माझी जुनी खोड मी तेव्हा विसरलो. तुझ्या एका हातात कोपरापर्यंत भरलेल्या बांगड्या खळकन् वाजल्या आणि माझे चित्त विचलित झाले. नखाग्रांनी तू गालावरच्या बटा सावरल्यास आणि माझ्या वृत्ती सैरभैर धावल्या. आपल्या धीट चमकदार नजरेने तू माझ्याकडे थंडपणाने पाहिलेस आणि उष्णतेचा एक ओघ माझ्या मस्तकाकडे धावला. तू मला हवी होतीस ह्या एकाच उत्कट इच्छेने मी वेडावलो होतो.

तू दृष्टीआड झालीस आणि मी बेचेन झालो. तू पुन्हा दिसलीस आणि मी अधिकच बेचेन झालो. ती एकच तीक्ष्ण इच्छा माझ्या मनात सारखी सलत राहिली. किती दुखावले त्यामुळे माझे मन! आणि किती सुखावले!

मध्येच तोल जाऊन पडलेला माझा चिकित्सकपणा, पुन्हा सावरून बसला आणि आपल्या अर्ध्या भिंगाच्या चष्म्यातून तुझ्याकडे पाहू लागला. पण त्या खवचट म्हाताऱ्यालाही तुझ्यात व्यंग शोधण्याची हिंमत झाली नाही. उलट चिकित्सकपणाची सौंदर्यदृष्टी झाली आणि ती तुझ्या सौंदर्याचे अनेक विशेष टिपू लागली. तू मला इतकी का आवडलीस ते मला अधिक समजू लागले. निदान तसे वाटू लागले. तू मला आवडलीस, कारण तुझ्या केसांवर निळी धुंदी होती. काळ्या केसांवर निळी छटा कशी आली? पुन्हा पुन्हा निरखले तरी ते उमजत नव्हते आणि त्यामुळेच तुझे आकर्षण शिळे होत नव्हते. तुझ्या डोळ्यांत मस्ती होती आणि ती देखील स्वातंत्र्याची. कॉलेजातल्या छापील पोरींच्या डोळ्यांत असतो तसला तो दुबळा

छचोरपणा नव्हता. तुझ्या वागणुकीत मोकळेपणा होता, चॉकलेटसारखा चिकट लाघटपणा नव्हता. तुझ्या चालण्यात नैसर्गिक स्वच्छंदीपणा होता, घटवलेला नखरेलपणा नव्हता. तुझ्या चढेलपणाचा आणि तोऱ्याचा राग यायचा, पण तो आकर्षितही करायचा. तू कुठेही असलीस तरी तुझे अस्तित्व जाणवायचे. स्वतःचे असे तुला व्यक्तिमत्त्व होते. ह्या गोष्टीमुळे तू मला आवडत होतीस. पण तुझ्यात आणखी काहीतरी होते—मला खेचणारे, भुलविणारे; आणि म्हणूनच तू मला हवी होतीस. माणसे माणसांना का जोडली जातात ते एका विशिष्ट मर्यादेपर्यंत सांगता येते. त्यापुढे ते समजावे लागते.

तू मला आकर्षित केलेस, भुलवलेस आणि म्हणूनच तू माझा अहंकार दुखावलास. तू मला हवी आहेस हे कबूल करायला मी मुळीच तयार नव्हतो. मी तुझ्याशी फटकून राहू लागलो, आणि त्याचवेळी तू माझ्याकडे आकर्षित होऊ लागलीस. का बरे? मला ते खरेच अजून समजलेले नाही. आणि मला वाटते की, तुलाही ते नीटसे समजले नाही. पण कारणांची चिकित्सा करायची मी. तुझे त्यावाचून मुळीच अडत नाही. मी तुला आवडलो, आणि तू ते अगदी सहज माझ्याजवळ कबूल केलेस.

उगीचच तुझी माझी लायब्ररीत भेट व्हायला लागली. तुझ्या माझ्या कॉलेजातून बाहेर पडायच्या वेळा जमू लागल्या. मला एखादा रंग आवडतो असे मी सहज म्हटले तर त्या रंगाचे पातळ तू दुसऱ्या दिवशी नेसून येऊ लागलीस. मला आवडणारी पुस्तके तू उत्साहाने वाचू लागलीस आणि मला असे कळले की, माझी बाजू घेऊन तू इतरांशी भांडू लागलीस. आपल्या मताने तू हे सगळे अशा सफाईने करायचीस की, आपल्या प्रीतीचा सुगावा मला देखील लागू नये. बायकांच्या रीतीप्रमाणे तू वागलीस हे साहजिकच होते. पण वेडे! इतकी लबाडी करणे आपल्याला जमणार नाही हे कसे नाही तुझ्या ध्यानात आले? नंतर एकदा तू मला भोळेपणाने विचारलेस, "तुम्ही मला आवडता, हे तुम्हांला कसे कळले हो?"

ह्यावर मी तेव्हा हसलो. पण खरे सांगू? तुझ्या ह्या साधेपणामुळेच तू मला प्रिय झाली आहेस. आतादेखील तू माझ्या लहानसहान फसवणुका करतेस तेव्हा ते चटकन माझ्या ध्यानात येते. पण तुझा हिरमोड होऊ नये म्हणून मी फसल्याचा देखावा करतो आणि तसा देखावा करीत असताना माझे मन उगीचच भरून येते.

किती आर्जवाने वागायचीस तेव्हा तू माझ्याशी! लहानसहान बाबतीतदेखील माझे मन ओळखून वागायचा तू किती प्रयत्न करायचीस! प्रेमापुढे लीन व्हायचे, प्रेम करायचे म्हणजे द्यायचे, देता येईल तितके द्यायचे आणि त्या देण्यातला आनंद अनुभवायचा हे तुला आपसुखच माहीत होते. तुझे मन निर्मळ होते, भावना वठलेल्या नव्हत्या, म्हणून तुला तसे करता आले आणि त्याच वेळी स्वतःला अधिक विचारी समजणारा मी तुझ्या प्रेमावर स्वतःचा अहंकार पोसत होतो. तुझ्यावर प्राप्त झालेल्या अधिकाराचा दुरुपयोग करीत होतो. तुला वाकवण्यात, दुःख देण्यात आनंद मानीत होतो. अवेळी मला भेटायला यायला भाग पाडत होतो. तासन् तास तुला ताटकळत ठेवत होतो. तुझ्याविषयी संशय घेत होतो.

माझे तुझ्यावर प्रेम नव्हते म्हणून नव्हतो ग मी असे करीत! तू तेव्हा मला फार फार हवी होतीस. प्रेमाकरिता तेव्हा मी आसुसलेला होतो, आणि परिस्थितीने लाभलेल्या आणि स्वत: निर्माण केलेल्या दु:खांनी कटुवृत्ती झालेल्या मला, तू माझ्यावर प्रेम करतेस–खरे खरे प्रेम करतेस—हे खरे वाटत नव्हते. माझे प्रेम म्हणजे काही नुसते आकर्षण नव्हते. माझे सारे जीवन ढवळून काढणारा तो एक खोल अनुभव होता; आणि हृदयात साठलेली सारी कटुता, सारा राग ओकून, काढून टाकल्याशिवाय ते प्रेम व्यक्त होऊ शकत नव्हते. माझे प्रेम मिळविण्याकरिता माझी सारी दु:खे आणि सारी कटुता नीलकंठाने विष प्राशन केले तशी तुला प्राशन करावी लागली. माझ्या प्रेमाची ही विचित्र रीत पाहून तू भांबावलीस, गोंधळलीस आणि खूप रागावलीसही. पण माझ्यावरचे तुझे प्रेम कायमच राहिले.

आठवतात का ग तुला ते दिवस? आता मला दिसताहेत तसे स्पष्टपणाने नजरेसमोर उभे राहतात! तेव्हाची सगळी सुखदु:खे अजून तुझ्या अंगाला बिलगतात! ठरलेल्या ठिकाणी तू माझी ताटकळत वाट पाहात उभी राहायचीस. नेहमीच या ना त्या कारणाने मला उशीर व्हायचा. किती म्लान झालेला असायचा तेव्हा तुझा चेहरा; आणि मी दिसल्यावर कसा उजळायचा! माझ्यावर खूप खूप रागवायचे ठरवलेले असायचेस तू. पण मी दिसल्यावर सगळे विसरायला व्हायचे. राग कुठच्या कुठे पळायचा आणि हसू यायचे. अधीरपणाने बोलणे सुरू व्हायचे. मला आवडणारे पातळ आपण नेसलो आहो हे तू मला आडवळणाने सांगायचीस. माझी कशी दिवसभर आठवण होत होती ते सांगायचीस. आपली स्वप्ने सांगायचीस. निघताना झालेल्या आपल्या घाईचे आणि त्यामुळे इतरांनी केलेल्या थट्टेचे वर्णन करायचीस. तू काही बोललीस तरी तेव्हा ते मला गोड वाटायचे. कुठल्या तरी विषयावर तू बडबडत असायचीस, पण सांगत असायचीस काहीतरी निराळेच. सर्वसामान्याच्या आवरणाखाली, काही तरी असामान्य, अद्‌भुत व्यक्त होत असायचे; आणि ते अतृप्तपणे कान लावून मी ऐकत असायचो. अद्‌भुत आणि असामान्य असे काय होते ते? एका माणसाचा जीव दुसऱ्यावर लागावा, माणसाच्या एकाकी कोंडलेल्या आत्म्याला प्रीतीच्या झरोक्यातून दुसऱ्या एका आत्म्याचे दर्शन व्हावे, दोघांच्या सुखदु:खांची सुरावट जमावी, एकाच्या सावलीस दुसऱ्याने विसावावे, ह्याच्यासारखे आणखी अद्‌भुत ते काय आहे?

त्या अद्‌भुताच्या तंद्रीत आपण भटकत असायचो. पण किती चाललो ते मात्र आपल्याला समजायचे नाही. आपण थिएटरात जायचो, पण सिनेमा पाहायचो नाही; हॉटेलात जायचो, पण खायचो नाही; लोकांना आपण दिसायचो, पण लोक आपल्याला दिसायचे नाहीत. तेव्हा समुद्रकिनाऱ्यावर एकत्र बसून आपण जे सूर्यास्त पाहिले ते किती भव्य होते! तेव्हा आकाशातल्या लाल रंगाची छटा तुडुंब भरलेल्या सागराच्या हेलावणाऱ्या पृष्ठभागावर जशी उतरत असे तशी आपल्या उत्कट भावनांत देखील प्रतिबिंबित होत असे. सूर्य मावळल्यावर आकाश रिकाम्या शिंपल्यासारखे दिसू लागले की, कसे रिकामे रिकामे वाटायचे. सगळे काही हरवल्यासारखे वाटायचे. माड डुलले की आपली मनेही डुलायची. एखादा मेघ एकाकीपणे आकाशातून तरंगत गेला की, आपणही दूर कुठे तरी निघून जायचो. वाळूत उमटलेली पावले

आणि त्यांत उमळलेला ओलावा ह्यांना केवढा गूढ अर्थ प्राप्त झाला होता तेव्हा! तू वाळूत रेघोट्या ओढत असताना, मी टक लावून त्यांत कुठचा अर्थ शोधत होतो बरे? आणि तेव्हा तू मला इतकी विलोभनीय वाटायचीस की, तुला स्पर्श करायची मला भीती वाटायची!

हे सगळे तुला आठवते? वेदना करणारे तेव्हाचे हे सुख तू अजून आपल्या हृदयात साठवून ठेवले आहेस का?

अणि तेव्हाची ती भांडणे? किती स्वार्थी झालो होतो मी तेव्हा! माझ्या मनःस्थितीशी तुझी मनःस्थिती जरा जुळली नाही, मला हवे असलेले प्रत्युत्तर तू दिले नाहीस. माझ्याव्यतिरिक्त दुसरी कुठलीही गोष्ट तुला महत्त्वाची वाटते असा नुसता जरी मला संशय आला, तरी किती बिनसत असे मी, किती चिडत असे, किती निराश होत असे! माझ्या शब्दांना कशी विलक्षण धार येत असे तेव्हा. शब्दावर शब्द वाढायचा, सगळ्याच गोष्टींचा विपरीत अर्थ लागायचा, मांजराच्या पावलासारख्या मृदू भावनांतून कठोरतेची नखे बाहेर पडायची. किती क्रूरपणाने एकमेकांना जखमी करायचो आपण तेव्हा! इच्छा नसताना आपण भांडणाच्या ओघातून वाहत एकमेकांच्यापासून दूर दूर जायचो. बोलण्याला तू सारखे फाटे फोडायचीस आणि मी, तर्काच्या कुऱ्हाडीने ते छाटत, मला हव्या त्या दिशेने तुला घेऊन जायचो. शब्दांचा केवढा तरी गुंतावळा निर्माण व्हायचा आणि हट्टीपणाने व कंटाळवाणेपणाने आपण (विशेषतः मी) तो सोडवत बसायचो. शेवटी वाटायचे की संपले, झाले संपले. प्रेमाचे सारे धागे आपण तोडून टाकले. आपापल्या मार्गांनी निघून जाणेच काय ते आता शिल्लक राहिले आहे.

पण प्रेमाचे, आकर्षणाचे चिवट धागे शाबूत असायचे, आणि रागाचा ताण कमी झाला की, आपल्याला ओढून जवळ आणायचे. एखादी हालचाल, एखादा दृष्टिक्षेप, एखादा शब्द: आणि आपण दोघे पुन्हा एकत्र यायचो. आपल्यालाच दोषी ठरवायची अहमहमिका लागायची. प्रेमाच्या पुन्हा आणाभाका व्हायच्या. हातांत हात मिळायचे. तसे पाहिले तर ही प्रेमाची ठरावीक रीत आहे. पण आपला मार्ग आपल्यालाच नाही का शोधून काढावा लागला? आपले सगळे निराळेच नव्हते का?

आठवते का ग ते तुला सगळे? जुहूच्या वाळवंटात, वरळीच्या समुद्रकिनाऱ्यावर, हँगिंग गार्डनमधल्या झुपकेबाज झाडांच्या छायेत आपण जी भांडणे केली, ज्या गुजगोष्टी केल्या, भावनांची जी कमानीसारखी आपल्याला जोडणारी इंद्रधनुष्ये उभी केली, ती सगळी आठवतात का ग तुला?

आपल्या त्या भांडणांनी तुझ्या नाजूक, निर्मळ मनाला जखमा झाल्या. त्यांचे वण अजूनही दृष्टीस पडतात आणि खंत वाटते. खरेच, फार छळले का ग मी तुला! आणि त्या जखमा भरून काढायला पुरेसे प्रेम नाही का मी तुला दिले? हा प्रश्न माझ्या मनाला फार व्याकूळ करतो. पण त्याचे खरे उत्तर तुझ्याकडून कधीच मिळायचे नाही. तू नुसती हसशील. मला थोपटल्यासारखे करशील. म्हणशील, 'वेडे आहात!'

तुझ्या सहवासाने, तुझ्या प्रेमाने, तुझ्याशी केलेल्या भांडणांनी माझ्यात तेव्हा केवढा आश्चर्यकारक आणि सुखदायक फरक होत होता! माझ्या मनातील कटुता निचरून जात होती. माझ्या वृत्तीतला रुक्षपणा वितळत होता. माणसांशी मी जोडला जात होतो. माझ्या व्यक्तिमत्त्वाला नवे लाल-हिरवे धुमारे चोहोबाजूंनी फुटत होते. मी हसू लागलो. पोरकटपणा करू लागलो. गंभीरपणाचे माझ्या डोक्यावरचे अवजड पागोटे खाली उतरले. तरुण असून ज्या तारुण्यातल्या आनंदांना मी पारखा झालो होतो ते मला पुन्हा मिळाले. I was happy. You made me happy.

आणि मग आपले लग्न झाले. चार लोकांच्या समक्ष आपले हात मिळाले. एक सामाजिक संकेत पार पाडला. दोन तरुण माणसे लग्न करून सामाजिक परंपरेच्या चौकटीत बसली, ह्याचा सर्वांना स्वाभाविक आनंद झाला; आणि झाडावर फूल यावे, तलावात चांदणे पडावे, तशी तू माझ्या घरात आलीस.

नववधूने प्रवेश करावा तो नव्या स्वतःच्या घरातच असे मला फार वाटायचे. अजूनही वाटते. एकत्र कुटुंबातले काव्य मी समजू शकतो. नव्हे, मी ते अनुभवले आहे. पण स्वतःचे नवे स्वतंत्र घर उभारणाऱ्या तरुण माणसांच्या जीवनातले काव्य त्याहूनही सुंदर असते. लग्न हा असा क्षण असतो की, तेव्हा जुने आणि नवे ह्यांनी एकमेकांपासून दूर होणे इष्ट असते, दोघांच्याही हिताचे असते. म्हणून आपल्या दोघांचे एक निराळे, नवे घर असावे म्हणून मी खूप खूप प्रयत्न केला. पण जागेच्या ठरावीक अडचणीमुळे ते शक्य झाले नाही. नववधूचे जसे स्वागत केले पाहिजे तसे मला करता आले नाही म्हणून किती विषण्ण झालो मी!

पण निराशा झाली, अडचणी असल्या म्हणून जीवन काही खोळंबून राहात नाही. तशाच वेड्यावाकड्या परिस्थितीतून ते आदळत, आपटत, फाटत पुढे वाहत जाते. आपल्या जीवनाचेही तसेच झाले. त्या प्रतिकूल परिस्थितीत आपण आपली जीवने पूर्णपणे सांधण्याच्या मोठ्या प्रयोगाला सुरुवात केली. हातात हात घालून जुहूच्या किनाऱ्यावर फिरणे आणि प्रीतीच्या आणाभाका घेणे निराळे आणि दोन माणसांनी एकत्र उठणे, बसणे, जेवणे निराळे. चांदण्या रात्री परस्परांना बिलगून निःस्तब्धपणे बसणे निराळे. आणि उकाड्याने हैराण करणाऱ्या कंटाळवाण्या दुपारी एकमेकांचा येणारा राग आवरणे निराळे. बोलता बोलता लाडिकपणे प्रियकराच्या शर्टचे बटण फिरवणे निराळे, आणि त्याची हरवलेली बटणे शोधणे निराळे. निराळ्या सवयी, निराळ्या आवडीनिवडी ह्यांचा मेळ बसायचा असतो. प्रीतीचे स्वप्न व्यवहाराच्या दगडविटांनी साकार करायचे असते. ह्या कठीण गोष्टी आपल्याला करायच्या आहेत, ह्याची जाणीव मला होती, आणि त्यामुळे मी फार घाबरून गेलो होतो.

पण तू ते सगळे सोपे केलेस. मला तू बदलायला लावलेच नाहीस. माझ्या जीवनाची जी आकृती मी रचली होती तिच्याबरहुकूम तू आपल्या जीवनाला वळण दिलेस. मी महत्त्वाकांक्षी आहे असे पाहून तू आपल्या आकांक्षा पुसून टाकल्यास. मी माझ्या जीवनाचा

विस्तार बाहेर वाढवू पाहतो असे दिसताच तू आपले जीवन चार भिंतींत मर्यादित केलेस. माझा अहंकार दुखवू नये म्हणून तू आपल्याकडे कमीपणा घेतलास. स्वतःच्या कितीतरी सवयी तू टाकल्यास. हे करताना तू कधी रागावलीस आणि चिडलीसही. पण एकंदरीत किती सहज केलेस तू हे? फक्त हिंदु स्त्रीच एवढा मोठा त्याग इतक्या सहजपणे करू शकते. का केलेस तू हे? तुझ्या सगळ्या बंडखोर भाषेमागे हिंदु स्त्रियांची शेकडो वर्षांची परंपरा शाबूत होती, म्हणून तू असे केलेस की केवळ अगतिकतेने केलेस? असे केल्याशिवाय आपला संसार चालायचा नाही, हे स्त्रीच्या उपजत शहाणपणामुळे तू जाणलेस, की माझ्यावरच्या प्रेमाने तू हे केलेस? इतके प्रेम करतेस तू माझ्यावर? इतका आवडतो मी तुला?

खरे म्हणजे तू असे करायला नको होतेस. निदान इतक्या सहजपणे करायला नको होतेस. कारण, त्यामुळे तू माझ्याकरिता इतके मोठे असे काही केले आहेस हे मी विसरून जातो. त्याबद्दल जी कृतज्ञता वाटायला हवी ती मला वाटत नाही. पण मला कधी कधी वाटते की, अशी कृतज्ञता मला वाटते की नाही, याची तुला फारशी पर्वा वाटत नाही. प्रेम करण्यात, माझ्याकरिता कष्ट करण्यात आणि माझी काळजी करण्यातच तुला आनंद वाटतो. अशी तू पहिल्याने नव्हतीस. मग अशी कशी बदललीस? इतकी अल्लड आणि पोरकट वाटतेस तू. मग हा मनाचा मोठेपणा कुठून आला तुझ्याजवळ?

पुन्हा पुन्हा तुला सांगावेसे वाटते की, किती सुखी केले आहेस तू मला! दुःखी असण्याची मला इतकी सवय झाली होती, की अजूनही मधूनमधून मला दुःखाचे उमाळे येतात. कधी अकारण तर कधी सकारण. पण असे अनेक दिवस जातात की, तेव्हा दुःखाची जाणीवही मला होत नाही. मी फक्त सुखी असतो. आपले गेल्या तीन वर्षांचे सहजीवन किती सुखद स्मृतींनी भरून गेले आहे. त्या स्मृती चाळवल्या की, सुखाचा सडा अंगावर पडतो. सुखाने भिजून मी ओलाचिंब होतो. मला एकदा घरी यायला फार उशीर झाला. तेव्हा मला रस्त्यात पाहिल्यावर तू रडत रडत जिन्यात धावत आलीस आणि मला घट्ट धरलेस—तो प्रसंग मला आठवतो. किती कावरीबावरी झाली होतीस तू? तुला श्वास आवरत नव्हता, आणि माझा हात सोडायला तू तयार नव्हतीस. माझ्याशी खूप भांडायचे होते तुला. पण तू नुसती माझ्याकडे पाहत रडतच बसलीस, आणि मग आदल्या दिवशी आपल्याला भांडता आले नाही म्हणून दुसऱ्या दिवशी रागावून बसलीस. केवढे गाल फुगले होते तेव्हा तुझे. तेव्हा त्या प्रसंगात दुःखाचा अंशच जास्त होता. पण आता त्याची स्मृती मला सुखाने न्हाऊन टाकते.

आठवते तुला? एकदा मी झोपलो असताना तू माझ्या तोंडावरून हात फिरवून काही तरी बोलत होतीस माझ्याशी! डोळे मिटून मी थोडा वेळ तसेच ते सुख अनुभवले आणि मग मी एक चूक केली. नको तिथे मिस्किलपणा केला, आणि डोळे उघडून हसलो. बाप रे! किती रागावलीस तेव्हा तू? माझ्याशी न बोलण्याचा, माझ्यावर पुन्हा कधीही प्रेम न करण्याचा केवढा जबरदस्त निश्चय केलास तू! पण हे किती थोडा वेळ! थोड्या वेळाने मी

झोपलो असे वाटून तू माझ्या कुशीत शिरलीस आणि तेव्हा मात्र डोळे उघडण्याची चूक मी केली नाही.

आणि आपल्याला जागा मिळाली, आपले असे निराळे घरकुल आपण उभे केले, तेव्हा आनंदाने कशी वेडी झाली होतीस तू! लहान मुलासारखी तू नाचलीस, हसलीस, सारखी गाणी गुणगुणत होतीस. आणि आपले घर मांडायचे, सजवायचे, आपल्या घरी लोकांना बोलवायचे, आपल्या घराविषयी बोलायचे, बेत करायचे—ह्या सगळ्या गोष्टींत तू किती रमली होतीस. बाकी कसले तुला भानच राहिले नव्हते. किती शिकल्या सवरल्या तरी बायकांना घराची केवढी हौस असते. कुठच्या खोल प्रेरणेने त्या असे वागतात बरे! घर ही किती सुंदर गोष्ट आहे आणि बायकोला 'घरवाली' म्हणण्यात काय काव्य आहे, ते मला तेव्हा समजले; आणि घर मिळाल्याचा आनंदात तू मला ज्या मिठ्या मारल्यास त्यांनी माझे अंग अजून मोहोरलेले आहे.

तुझ्या एका हौसेची तर मला नेहमीच फार गंमत वाटते. आपल्याजवळच्या पैशातून तू माझ्याकरिता नेहमी काहीतरी घेत असतेस. कधी कापड, कधी फाउंटन पेन, कधी ॲश-ट्रे. माझ्या व्यवहारी मनाला तुझ्या ह्या सवयीचे हसू यायचे. वाटायचे, कशाला ही हे नसते उपद्व्याप करते? मला काय स्वतःकरिता वस्तू घेता येत नाहीत? आपल्या पैशातून आपल्या हौशी पुरवण्याऐवजी माझ्या हौशी कशाला पुरवते ही? बरे, कधी कधी तुझी कापडाची निवड अशी असायची की, त्याचा शर्ट अंगात घालून गेले की चार दिवस मित्रांना हसायला विषय व्हायचा. म्हणून मी तुला हसायचो. तुझ्यावर चिडायचो. नव्हे, अजूनही हसतो आणि चिडतो. मग तू खट्टू होतेस. खूप रागावतेस "तुम्हांला कसली हौस नाही–कसले कौतुक नाही..." म्हणून बडबडतेस. पुन्हा म्हणून माझ्याकरिता काही न घेण्याचा निश्चय करतेस. त्याची रोज मला जाणीव करून देतेस; आणि मग पुन्हा एखाद्या दिवशी घरी आल्यावर तुझा चेहरा फार उत्सुक दिसतो. मोठ्या प्रयासाने तू काहीतरी सांगायची इच्छा आवरताना दिसतेस. उत्साहाने काहीतरी निराळेच बोलू लागतेस. पण हा देखावा फार वेळ टिकत नाही. मी जेमतेम कोट काढतो न काढतो तोच तू म्हणतेस, "टेबलावर पाहा काय गंमत ठेवली आहे." आणि त्या 'गंमती' चे कौतुक करण्याकरिता मला माझा आधीच कमी असलेला उत्साह एकत्रित करावा लागतो.

तुझे माझ्यावरचे प्रेम तुझा असा गोड पराभव करते, आणि मी वेडा तुझ्या ह्या वागण्याला वेडेपणा समजून हसतो.

तुझी अशीही इच्छा असते की, मी मधून मधून तुझ्याकरिता काही तरी आणावे. फार नाही तर निदान वेणी आणावी. पण स्वतःकरितादेखील खरेदी करायला कंटाळणाऱ्या मला हे कधीच जमत नाही—जमेल असे वाटत नाही. ह्या गोष्टीचे तुला दुःख वाटते. राग येतो. पण तू इतकी मानी आहेस की, आपली ही इच्छा तू कधी बोलून दाखवीत नाहीस. गप्प राहतेस. वाट पाहतेस. हे एक मुक्याचे व्रतच तू घेतले आहेस. तुझ्या मनातले हे सगळे सगळे मला माहीत आहे.

पण नको! असे म्हटले तर तू फार रागावतेस हे मला माहीत आहे. तुझ्या मनातले मला सगळे समजते, ही गोष्ट तुला फार अपमानास्पद वाटते. आपले मन इतके पारदर्शक असावे हे तुला कमीपणाचे वाटते. पण खरे सांगू? तू अशी सरळ साधी आहेस म्हणूनच मला फार आवडतेस.

तू इतके प्रेम करतेस. माझ्याकरिता त्याग करतेस; तरी पैशाच्या बाबतीत तू काटेकोर आहेस. तू मला दिलेले पैसे भांडखोरपणाने वसूल करण्यात तुला मोठी मौज वाटते. मी भटकायला जायला लागलो म्हणजे सिगारेट ओढण्याकरिता मला एक आणा देताना तुला आपले सारे औदार्य एकवटावे लागते. आपण सबंध महिन्यात किती आणे मला दिले ह्याचा पाढा वाचायची संधी तू तेव्हा मुळीच दवडत नाहीस, आणि इतर पुरुषांप्रमाणे माझ्या खिशात चिल्लर नसते आणि वॉशिंग कंपनीत कपडे टाकताना ती आपल्याला मिळत नाही ह्याचे तुला फारच वाईट वाटते. असे चार आणे तुला मिळाले तर तुला बोहारणीशी उत्तम सौदा केल्यावर जसा आनंद होतो तसा आनंद होईल. तुझ्या दृष्टीने हा संसारातला आवश्यक संकेत आहे, आणि इतरांच्या जीवनांत जे घडते ते आपल्या जीवनात घडलेच पाहिजे ही बायकी हौस तुझ्या अंगात भरपूर प्रमाणात आहे. म्हणूनच तू ह्या लहान कारणावरून माझ्यावर रुसत असतेस आणि तुझे ते रुसणे मला इतके आवडते की, मी खिशात पैसे न विसरायची मुद्दाम खबरदारी घेत असतो. अशी तू रुसलीस की, तुझा गालगुच्चा घ्यायला किती मजा वाटते!

तुझे गणित मोठे गमतीदार आहे. डबा फुकट मिळतो म्हणून तू महाग चहा आणतेस. सुंदर बाटल्या आपल्याजवळ जमाव्या म्हणून नको ती औषधे विकत घेतेस आणि मला घेण्याची शिफारस करतेस. माझे कपडे फाटत नाहीत आणि बोहाऱ्याला देता येत नाहीत म्हणून रागावतेस. घड्याळ नेहमी हाताला लावून फिरतेस, पण त्याला किल्ली द्यायला नेहमी विसरतेस. माझे वेडे कोकरू हा असा उलटा हिशेब करीत असते.

अशा किती आठवणी सांगू? मोहोळातून मध ठिबकावा, तसे ह्या सगळ्या आठवणींतून तुझे प्रेम आणि सुख ठिबकत आहे. तुझ्या प्रेमाने तू मला मिंधा करून ठेवले आहेस. इतका कणखर वृत्तीचा मी, पण तुझे न ऐकण्यात काही गुन्हा आहे असे मलाही अलीकडे वाटायला लागले आहे.

आणि आता एक नवीनच पाश तू माझ्याभोवती टाकणार आहेस. एका नव्या बंधनाने मला स्वतःशी जखडून टाकणार आहेस. तुझी अंगयष्टी आता भरली आहे. स्वच्छंदी चालीत एक जबाबदारीची जाणीव उतरली आहे. तुझी नजर आता स्थिर झाली आहे. तुझी वृत्ती आता हळवी आणि गंभीर झाली आहे. कसली तरी तुला भीती वाटते आणि तू मला बिलगतेस. कसला तरी तुला आनंद होतो आणि तेव्हाही तू मला बिलगतेस. एका नव्या अधिकाराने तू माझ्याशी बोलतेस. एका नव्या आशेने पाहतेस. एका नव्या जाणिवेने माझी काळजी घेतेस. माझे केस कुस्करतेस. माझे तोंड आपल्या कुशीत लपवतेस. उगीचच मनाला हुरहूर लावून घेतेस आणि लावतेस.

आता तू माझ्या मुलाची आई होणार आहेस...

समोरच्या शेवग्याची फांदीन् फांदी फुलून तो पांढरा शुभ्र झाला आहे. नाजूक फुलांनी डवरला आहे. रसरशीत केळ घडाच्या भाराने अंमळ लवली आहे. कलत्या दिवसाचे उन्ह पायऱ्या चढून वर आले आहे. हवेत गारवा ओथंबला आहे. गर्भवतीच्या जपून टाकलेल्या पावलासारखी वाऱ्याची हालचाल होत आहे. सगळे कसे निवांत आहे.

फक्त तुझी स्मृती तेवढी जास्वंदीच्या त्या सडसडीत बाकदार फांदीसारखी माझ्या मनात डुलत आहे.

नऊ

# मंजुळा

## अरविंद गोखले

गाडी थबकत होती, हेलकावत होती आणि धापा टाकीत धावत होती. प्रत्येक डबा माणसांनी ठासून भरला होता. बसायची बाकं व मधल्या वाटा गर्दीने गुदमरून गेल्या होत्या. दारंखिडक्या बुशकोटांनी, पदरासाड्यांनी, केसाळ डोक्यांनी व आक्रसलेल्या अवयवांनी लिंपल्या गेल्या होत्या. डब्याबाहेरही माणसे लोंबकळत होती. मुंग्यांनी भरलेला साप तडफडत सरपटतो तशी गाडी जात होती. हे दोन तोंडांचे गांडूळ जरा थांबले की आतली घाण बाहेर ओतली जाई व त्याहून अधिक आत भरली जाई.

माणसं—माणसं! चाळीचाळींतून फूटपाथा–फलाटांवर अन् तेथून ट्रामलोकलांत! लोकलमध्ये तर गर्दी शिगेला जाई. दिवसातून दोनदा लोकलचाच प्रवास करावा लागे. सकाळी ऑफिसला जाण्याकरिता व संध्याकाळी घरी परतण्यासाठी. दोनदा नरकयातना अनुभवाव्या लागत! डब्यात जेमतेम जागा मिळे. अंग कितीही चोरले तरी कुणाचा तरी धक्का लागे. डोक्याला एखाद्या हॅटची कड घासे. कधी खांदा चोळवटून निघे. मांडीला अनोळखी बोटे चिकटत. पावलांवर बुटाचे ठसे उमटत. साऱ्या शरीरावर मालीश होई. इकडे तिकडे दृष्टी फिरवायची सोय नसे. कुणाच्या टकलावरचा घाम, कुणाच्या दाढीचे खुंट, एखादीच्या मानेवरील पावडरचे चिकट थर नजरेत भरत. अन् स्वस्थ उभं राहिलं तरी एकमेकांचे श्वास नि वास नाकातोंडात शिरून शिसारी येई. बुबळांसमोर, नाकपुड्यांपुढे, रंध्रारंध्रापाशी मुर्दाड मनांची आणि किळसवाण्या शरीरांची अगणित माणसं!

परंतु संध्याकाळचा प्रवास जरा सुखाचा वाटे. सकाळी जेमतेम जेवून गाडी गाठायची. डब्यात धक्के खात ताटकळत उभे राहायचे, पुन्हा स्टेशनपासून ऑफिसपर्यंत पायपीट करायची. ह्या गडबडीत सकाळी केलेले स्नान नि सौंदर्यप्रसाधन पार धुतले जायचे. अर्धवट चावलेल्या चपात्या पोटात टोचू लागायच्या. मग ऑफिसची कटकट!... संध्याकाळी गाडीत गर्दी–गोंधळ असला तरी घरी जाऊन स्वच्छसे तोंड धुऊन स्वस्थपणे जेवता झोपता येईल ही आशा असे.

सव्वासहाच्या लोकलमधून मरगळलेली माणसे आपापल्या खुराड्यांकडे रवाना होत होती. टाय सैल केलेले, हातात संध्याकाळचे वर्तमानपत्र धरलेले पुरुष. घाणेरड्या रुमालाने कुणी स्त्रिया शेवटचा घाम पुसत होत्या. सुस्कारे सुटत होते, जांभया वाढत होत्या. आपापले

स्टेशन लवकर यावे म्हणून दमलेले डोळे अधीरपणे वाट पाहात होते. गाडी थांबली की अखेरचे अवसान आणून बाहेर पडायची धडपड सुरू होती.

अंधेरीचे स्टेशन आल्यावर मंजुळा डब्याबाहेर उतरायचा यत्न करू लागली. चर्चगेटपासून ती एका सीटशेजारी उभी होती ती अंधेरीपर्यंत तशीच अवघडून. सीटवरचा लठ्ठ गुजराथी गृहस्थ तिच्याकडे पहात होता व तिच्याजवळ सरकत होता. त्याने जागाही देऊ केली होती. पण सीटच्या पाठीचा आधार घेऊन ती तशीच उभी होती. तिचा आधार घेऊन दुसरी एक नोकरी करणारी तरुण मुलगी उभी होती. समोर दुधाच्या कासंड्या घेऊन भय्या बसला होता. अन् बाकीच्या दोन्ही बाजूंनी अनेक माणसे गर्दी करून होती. गर्दी उतरत होती, सरकत होती, पण तशीच कायम होती. अंधेरीच्या आवारात गाडी आली तरी वाट मिळणे मुष्कील होते. भय्या, गुजराथी, बिलगलेली मुलगी व दोन दिशांना माणसांच्या भिंती. अखेर मंजुळेने पदर घट्ट घेतला, पर्स घट्ट धरली व डोळे मिटून ती दाराच्या दिशेने निघाली. बरेचसे धक्के, खांदा दाबणे, दंडाला चिमटे, आंबाड्याला हिसका—अन् मंजुळा बाहेर आली.

मंजुळा फलाटाबाहेर पडली व रस्त्याने झपझप चालू लागली. केस कोरडेकोरडे झाले होते व चौफेर उडत होते. ओठ कोरडे पडले होते व डोळे दमले होते. खाका नि पोट घामाने चिकट झाले होते. दुपारभर टाईपरायटर बडवून बोटे दुखत होती. अन् आता चालायच्या आधी पायच दुखू लागले.

"मंजुळा....मिसेस खारकर—"

मंजुळेने मागे वळून पाहिले व ती थबकली. काशी कुलकर्णी पर्स नाचवीत येत होती. मंजुळेच्या शेजारच्या ऑफिसात ती नोकरीला होती. दोघी सकाळी एकाच गाडीने जात, पण परतताना ती कधी मंजुळेला भेटत नसे.

दोघीही कडेकडेने चालू लागल्या. मंजुळेने विचारले,

"रोज ह्या गाडीने येता?––"

"छे, आजच आले. रोज साडेसातची ट्रेन मिळते—"

"इतका उशीर होता ऑफिसात?—"

"नाही. सुटते सहालाच. पण मग जागेच्या शोधात हिंडते. कुणी तरी कुठली जागा सांगतं. जाते, पण जिरते. एखाद्या—"

जागेच्या अडचणीचे चऱ्हाट सुरू होताच मंजुळा उबून गेली. वर्षापर्वी ती ह्या साऱ्या संकटातून गेली होती. अन् रोज सकाळ-संध्याकाळ ह्या जागेच्या टंचाईच्या कटकटी कुठून कुठून ऐकून कंटाळून गेली होती.

जराशाने ती एकदम म्हणाली,

"तुम्ही लग्न करा कुलकर्णी, म्हणजे—"

"माझं लग्न ठरवलंय! म्हणून तर जागा शोधत आहे. दीड वर्ष झालं लग्नाचं ठरून. आम्ही दोघेही मुंबईभर सहा दिवस जागा धुंडाळतो. अन् सातव्या दिवशी मुंबईबाहेर जाऊन जागा नाही म्हणून चेहरे कडू करून प्रेम साजरं करतो—"

मंजुळेचा चेहरा खाडकन उतरला. काशीची कहाणी ऐकून नाही, तर तिचेही प्रेम जमून जागा मिळून लग्न झाले होते; पण...

"मी भाजी घेते हं. जरा थांबता का?" मंजुळा म्हणाली व रस्त्याच्या बाजूला खड्या असलेल्या भाजीच्या गाड्यांशी थांबली. रुमालात कांदे घेतले, पर्समध्ये मिरच्या-कोथिंबीर टाकली व हातात नारळ घेऊन ती पुढे चालू लागली. कुलकर्णी हेवा वाटून तिच्याकडे पाहात होती. न राहवून ती म्हणाली,

"लकी आहात मिसेस खारकर तुम्ही!"

"तुम्हालाही मिळेल हो जागा. मी चवकशी करते हं तुमच्यासाठी. आमच्या ऑफिसातल्या सुब्रह्मण्यमला माहीत असतात."

दोघीही कोरड्या हसल्या व कुलकर्णी दुसऱ्या रस्त्याला लागली. मंजुळा झपाट्याने निघाली. अजून बरेच जायचे होते. घरी जाऊन स्वैपाक करायचा होता, पाणी भरायचे होते. स्नान करावेसे वाटत होते नि भूकही लागली होती. शरद आला असला तर चहाही करून द्यायला हवा होता त्याला! शरदची आठवण येताच मंजुळा दचकली. घराबाहेर पडल्यापासून तिकिटचेकर, आगगाडीतला आंधळा, ऑफिसचा बॉस, सुबह्मण्यम्, अकौंटंट कावळे, मेरी डिसूझा व सरल साठे, चहावाला, चर्चगेटशी डोळे मिचकवणारा म्हातारा, गाडीतला गुजराथी, काशी कुलकर्णी, भाजीवाला भय्या...शरद कुठेच नव्हता ह्या कार्यक्रमात! ज्याच्यावर परोपरीचे प्रेम करून संसार थाटला....तिला त्याची आवेगाने ओढ लागली. पण दुसऱ्याच क्षणी तिचे मन गोठून गेले व पावले हलकी पडायला लागली.

बाजूच्या मोटारीतून अलू बिलिमोरिया जात होती. वेग कमी करून मंजुळेला ती म्हणाली,

"लिफ्ट?"

"नको—आलंच आहे घर—" मंजुळा पुढे चालू लागली. अलूचा विचार आता तिच्या मनात वावरू लागला. अलूही नोकरी करीत होती कुठल्या तरी विमान-वाहतुकीच्या ऑफिसात. पण खुशीत होती. नवऱ्याला केव्हाच टाकले होते तिने अन् ती रोज नव्या मित्रांबरोबर हिंडत असे. त्यांचीच मोटार, त्यांचेच पैसे. तिच्या अंगावरचे फ्रॉक्स व ओठांवरची लिपस्टिकही त्यांनीच दिलेली. सगळं जग नावं ठेवत होतं, पण अलूला पर्वा नव्हती. कॉलेजातल्या जुन्या मैत्रिणींची ट्रिप घोडबंदरला गेली होती, तेव्हा अलूने मंजुळेजवळ आपलं मन मोकळं केलं होतं. 'लग्न मानवलं नाही मला. नवरा कमावत नाही नि माझी चैनीची आवड आवरत नाही. नवऱ्याच्या नातलगांची गर्दी तर संपतच नाही. अन् माझा लहानपणाचा मित्र आला तरी संशय घेतात सारी...' अलू बिलिमोरियाने बंड केलं. सुटली. सुटल्यासारखी वाटली, पण वाताहत झाल्यासारखी वागू लागली. अलूच्या आठवणी वाढू लागल्या तशी मंजुळा भेदरून गेली. तिचा शरद कमावीत होता व घरून नातलगांना आणीत नव्हता. तिला स्वतःला तर मित्र नको होते व चैनही नको होती. अलूही तिला 'हॅपी हाऊसवाईफ' म्हणून म्हणत असे. अन् तरीही...

मंजुळा चाळीशी पोचली तेव्हा अंधार पडला होता व दिवे पेटले होते. दिवस संपलेला पाहून तिच्या कपाळावर आठ्या पसरल्या. आपापल्या बिऱ्हाडाबाहेर पुरुष उघड्या अंगाने बसले होते. गप्पा मारीत होते, मुलांना खेळवत होते. त्यांची उघडी अंगे नि असंख्य पोरे पाहून मंजुळेला ओकारी आली. डोके फिरवणारे फोनो नि रेडिओ धडाक्याने चालू होते. सिनेमा संगीताची फर्माईश! आपली संगीताची आवड संपुष्टात आणणारा तो गोंगाट ऐकून ती अधिकच उन्मळून गेली.

जिना चढून ती बिऱ्हाडाशी आली. शरद आला होता व आरामखुर्चीवर आडवा झाला होता. चपला काढीत ती म्हणाली,

"केव्हा आलास?"

"आत्ताच."

"माझी सहा–पाचची ट्रेन थोडक्यात चुकली–"

टेबलावर पर्स व भाजी फेकून ती आतल्या खोलीत गेली. बादलीत पाणी नव्हते. ती जाताना बादली भरून गेली होती. शरदने सगळी बादली संपवली असणार. मंजुळा चिडली. निदान भरून तरी ठेवायची होती परत! सकाळी ऑफिसला जाताना बदललेला पायजमा तसाच पसरला होता. तिचेही पातळ लोळत होतेच की! मंजुळेने पायानेच पातळ व पायजमा कोपऱ्यात लोटला.

शरद बाहेरून ओरडला,

"काय करते आहेस? जरा बाहेर जाऊ या की!"

"हो रे बुवा! मी आताच आलेय ना–" तिने बादली उचलली व ती बाहेर आली. "जरा तोंड धुते, नि मग जाऊ–" शरदकडे बघून ती म्हणाली व व्हरांड्यातून टाकीकडे गेली. पाणी आणून द्यायला शरद पुढे झालाही नाही ह्याचे तिला दुःख झाले. नळाशी नाइलाजाने ती उभी होती. कुणाच्या बादल्या, कुणाची तोंडधुणी. तिने आपली बादली अर्धीच भरली. पुरी उचलून न्यायची ताकद कुठे उरली होती!

मात्र तोंड धुतल्यावर, कपडे बदलल्यावर खूप बरे वाटले. हलके हलके, ताजे ताजे! आरशात तिने आपला चेहरा मनमुराद पाहिला व खूष होऊन शरदला म्हणाली, "चल—"

शरद खुर्चीत तसाच बसून होता. रुक्षपणे तो म्हणाला,

"आता कुठं चलतेस? आठ वाजले. तासभर तुझं नटणं चाललं होतं नुसतं—"

मंजुळा भडकली. काही तरी चिडून ती बोलणार होती. तेवढ्यात शरद म्हणाला,

"स्वतःशिवाय तुझं लक्ष कुठं असतं? चहासुद्धा विचारला नाहीस मला."

त्याबरोबर मंजुळेचा चेहरा खरकन उतरला. काय बोलावे, तिला बराच वेळ सुचेना. अखेर ती कशीबशी म्हणाली,

"ए–सॉरी हं!—मी इतकी दमले होते रे. अन् तुला तरी सांगायला काय झालं होतं? थांब, आधण ठेवते हं—ए, रागावू नको ना!"

शरद उदास राहिला. तिला दूर करीत म्हणाला,

"राहू दे! मी घेतो हॉटेलात. खरंच करू नकोस–"

तो उभा राहिलेला पाहून ती म्हणाली,

"मग जायचे ना आपण बाहेर?"

"नको! आता कंटाळा आला. अन् जरा गेले की लगेच तुझी परत यायची घाई. सैपाक करायचा आहे, पाणी भरायचं आहे...

"मग आपण बाहेर जेवू! अन् पाणी भरू पहाटे..."

"बाहेर जेवायला सोकावली आहेस तू! पैसे कुठं आहेत? चहापुरते दोन आणे उरले आहेत मजजवळ—"

मंजुळा भडकून गेली. टेबलावरचा नारळ जोराने आपटून तिने फोडला. आतलं पाणी प्यायची तिला इच्छा झाली; पण रागाने तिनं ते तसेच सांडू दिलं. रुमालातले कांदे व पर्समधल्या मिरच्याकोथिंबीर घेऊन ती रागानेच आत गेली.

शरद पुन्हा खुर्चीवर बसला. सिग्रेट पेटवून धूर सोडू लागला.

मंजुळेने शेगडी शिलगावली. कांदे–कोथिंबीर चिरली. भाजीचं भांडे शेगडीवर ठेवलं, उतरवलं, चहाचं आधण चढवलं. पुन्हा त्यात कांदे सोडले. पुन्हा चहाचं नवं आधण ठेवलं...

शरद तिच्या मागे येऊन उभा राहिला व मृदूपणे म्हणाला,

"मंजू–"

मंजुळेचे डोळे पाणावले. खांद्यावर ठेवलेला त्याचा हात हातात घेत ती म्हणाली,

"झालाच चहा—"

"खरंच नकोय—कशाला केलास? अन् आपण बाहेरच जेवू—"

"हा झालाच बघ चहा–" चहा गाळीत मंजू म्हणाली. तिने मग भाजीत फोडणी सोडली व म्हटले, "बाहेर कशाला! तुझ्या आवडता रस्सा केलाय ना! बघ तर—"

शरदने प्रेमाने तिचे खांदे दाबले. मग चहा पिऊन तो म्हणाला,

"आणिक काही करू नको."

"पोळ्या करते ना–"

"नको—हात दुखत असतील तुझे. मी ब्रेड आणतो."

"तुला थोडा ब्रेड नि दीड पोळी आहे! आणतोच आहेस तर समोर नवं सिंधी हॉटेल उघडलं आहे. तिथून मिठाई—"

मंजुळेच्या फुललेल्या चेहऱ्याकडे पाहून शरद म्हणाला,

"का--डोहाळे लागले काय?"

त्यासरशी मंजुळेचा चेहरा काळवंडला. तिने भाजी ढवळण्यास सुरुवात केली. शून्यपणे शरद खोलीबाहेर गेला, बिऱ्हाडाबाहेर गेला...

डोळ्यांत भरलेली आसवे मंजुळेने मोकाट सोडली. डोळ्यांची काळजी घ्यायचा डॉक्टरचा सल्ला तिला आठवला. पण उलट अधिक अश्रू आले. डॉक्टरनी हवा पालटायलाही सांगितले

होते. मंजुळेच्या हातापायांची बोटे वळू लागली. चालून, उभे राहून, पाय दुखत होते. चारपाच तास अखंड टाईपरायटर पिटला होता. टाईपरायटरचा ठकठकाट कानात घुमू लागला, वाढू लागला, अन् इतका वेळ ठिकाणावर होते ते डोकेही दुखू लागले.

स्वैपाक संपवून ती बाहेरच्या खोलीत आली. दार सताड उघडे होते. टेबल, कोपऱ्यातील आरामखुर्ची, पलंग, पुस्तके—सगळ्या संसारावरून मंजुळेने शून्यपणे पाहिले. एक एक वस्तू जमवताना केवढे सौख्य लाभले होते. दीड वर्षापूर्वीच फक्त. पण आज असे का झाले? इतक्या लवकर का उतरून गेला सारा उत्साह? पूर्वीही कष्ट होतेच की. अन् इतरांच्या मानाने किती भाग्यवान आपण! काशी कुलकर्णीला जागा मिळत नाही. अलू बिलिमोरियाचा नवरा पैसा मिळवीत नाही. आपल्या संसाराला दोन खोल्या, दोन नोकऱ्या!—तरीही भांडण, बिघाड! कुठे बिघडलेय, काय बिनसलेय?

ती खोलीत उगाच उभी राहिली, मग व्हरांड्यात गेली, पुन्हा खोलीत आली. व्हरांड्यात शांतपणे उभे राहता येत नव्हते. इतकी वर्दळ व गलका. खेरीज उभे राहण्यासारखे काही नव्हते. स्वैपाकातले धूर व सिनेमाची गाणी. शेजाऱ्यापाजाऱ्यांशी बोलावेसेही वाटत नव्हते. जो तो धावपळीत व गोंधळात. खोलीत बरे वाटत होते; नि नव्हतेही! साडेनऊ झाले तरी शरद परतला नव्हता. तो यावा, नि येऊ नये असे वाटत होते! तो आला की जेवणे उरकता येतील. पण तो आला की जेवण उरकून...मंजुळा अति खिन्न झाली.

पण शरद येताच तिला बरे वाटले. त्याने मिठाई आणलेली पाहताच ती आनंदून गेली. झटकन तिने पाने वाढून घेतली. मिठाई नि रस्सा वाटून घेतला. शरदला जास्त घातला; पुन्हा त्याच्या पानातला स्वतः खाल्ला. ऑफिसातल्या सुब्रह्मण्यमच्या गंमती सांगितल्या व ती शरदच्या बरोबरीने हसली. मग जेवणे आटोपल्यावर शरदला खोलीबाहेर घालवून तिने खरकटे आवरले.

मंजुळा बाहेरच्या खोलीत आली तो शरदने गाद्या घालून ठेवल्या होत्या व तो सिगारेट ओढीत आरामखुर्चीवर बसला होता. पसरलेल्या गाद्या नि धूर पाहताच तिच्या टवटवलेल्या वृत्ती थिजून गेल्या. तिला भीती वाटली. किळस आली. चीडही आली. जराशाने ती म्हणाली,

"निजायच्या वेळी सिगरेट रे कसली ओढतोस?"

"अजून निजायची वेळ कुठे झाली आहे?"

"दहा वाजून गेले—"

"तू नीज मग—"

"पण दिव्यात झोप येत नाही मला–"

शरद चिडला. सिगारेटचा मोठा झुरका मारून त्याने ती विझवली. म्हणाला,

"तुला दिव्याचा त्रास होतो, सिगरेटचा त्रास होतो–"

मंजुळा गप्प राहिली. गादीवर पसरली व डोळ्यांवर आडवा हात टाकून पडून राहिली. शरद घुश्यातच उठला. दार लावून, दिवा विझवून शेजारच्या गादीवर पसरला. अन् मग सर्वत्र शांतता भरून राहिली.

अंमळशाने शरद म्हणाला, "ये--"

कसल्याशा वेदनेच्या सहस्र सुया मंजुळेच्या सर्वांगाला टोचल्या. ती भीत होती ते भांडण भुतासारखे अंधारात उभे राहू लागले. कशीबशी ती म्हणाली,

"नको--"

"रागावलीस?"

"अंहं—"

"असं काय करतेस? काय झालंय तुला?—ये ना—"

"नको--झोपू दे मला."

अंधार होता तरी मंजुळेने डोळ्यांवरचा हात काढला नाही. हात काढावा व शरदच्या गळ्यात टाकावा असे तिला वाटले. पण तिच्या अवयवांत त्राणच उरले नव्हते. गादीला तिची पाठ चिकटून बसली होती. अन् डोके वरच्या तुळईवर आपटणार की काय असे वाटत होते.

"झोप तर तुझ्या मानगुटीला बसली आहे. कायमची झोप एकदा."

शरदचे संतापाचे शब्द ऐकताच मात्र मंजुळा उठून बसली. कापऱ्या स्वरात म्हणाली, "किती चिडतोस! तू नि मीसुद्धा....चल आपण गप्पा मारू....बुद्धिबळं खेळायची का? नाही तर येतोस फिरायला?"

"नको. नीज तू! जागरणाने प्रकृती बिघडेल तुझी."

"काय धाड झाली आहे मला?—"

"तेच तर मला समजत नाही."

शरदच्या शब्दामागचा तीव्र उद्वेग मंजुळेला जाणवला. समजला! असहायतेचे, दुःखाचे कढ तिच्या उरात दाटले. तिचे डोळे भरून आले व सर्वांग शहारले. काकुळतीने ती म्हणाली,

"रागावला आहेस तू–मी ओळखलंय! पण शपथ सांगते, मला गंमतच वाटत नाही–इच्छाच वाटत नाही—"

"पूर्वी सगळं वाटत असे. हल्लीच तू बिथरली आहेस. मीच नकोसा झालो आहे तुला."

ह्यावर काय बोलायचे असा तिने चेहरा केला. तरीही ती म्हणाली,

"डोक्यात राग घालू नको! मला समजून घे—"

"सगळं सम—"

"मी दमते रे! स्वैपाक करून दमते, पाणी भरून दमते, जाण्या–येण्याच्या कटकटीने दमते. ऑफिसातल्या टाईपरायटरने—"

"मी नाही का दमत? मी नाही का काम उपसत? जगातल्या सगळ्या बायका काम करताहेत. कशाला पाढा वाचतेस! नोकरी नको करूस इतकं आहे तर. पण ते मी कसं म्हणायचं? माझंच दारिद्र्य, दुबळेपणा उघडा पडायचा—"

मंजुळेची तगमग झाली. शरदला कसे समजवावे, स्वतःच्या मनाला कसे समजवावे, कळेना तिला! अखेर खूप निर्धाराने ती उठली. डोळे उघडीत, ओठ चावीत...

"खिडकी लावू नको—" शरद चिडून ओरडला. "उकाड्याने आधीच जीव कासावीस होतो आहे."

मंजुळा दचकली. खिडकीपासून दूर होत म्हणाली,

"शेजारकडचा पाहुणा हल्ली खिडकीजवळ खाट टाकून झोपतो–जागा नाही म्हणून–"

"राहू दे!––नीज तू नेहमीसारखी."

मंजुळा चिडून गेली. आरामखुर्चीत अंग टाकून पडून राहिली. भयाण शांतता तिला सोसवेना. ती म्हणाली,

"पुढच्या महिन्याला आपण आधी फॅन घेऊ–"

शरद विकटपणे हसला. म्हणाला, "म्हणजे एक महिना सुटलीस–" मंजुळेचे माथे भडकून गेले. कडवटपणे ती म्हणाली,

"काय बोलतोस हे शरद—"

शरद दुप्पट कडवटपणे म्हणाला, "खोटं बोलतो काय? आपले नवराबायकोचं नातं राहिलं नाही ते खोटं आहे का?––

"शरद, शरद—" मंजुळा संतापाने थरथरली. पण मग अवसान सोडून अश्रू ढाळू लागली.

पुन्हा शांत झाले. खोलीतच. खोलीबाहेर भांड्यांचे व भांडणाचे आवाज अन् सिनमासंगीताचा ओरडा सुरूच होता. खोलीतल्या शांततेला साथ देत होता...

शरद गादीवरून उठला नि खुर्चीच्या पायथ्याशी बसला. मंजुळेने त्याच्या माथ्यावरून ममतेने हात फिरवला. शरद मृदूपणे म्हणाला,

"असं काय करतेस मंजू? पूर्वी किती मजेत असायचीस तू! विसरलीस सारं? लग्नानंतर तुझ्या खेड्यात काढलेला आठवडा आठवतो?—रात्ररात्र जागत होतो आपण. पहाट फुटली तरी खोलीबाहेर यायला राजी नसायचीस तू. अन् इथेसुद्धा संध्याकाळी घरी परतल्यावर तू किती मला बिलगून असायचीस..."

मंजुळेला हुंदके अनावर झाले. ती ओक्साबोक्शी रडत म्हणाली,

"आठवतं रे, सारं आठवतं! शरद, माझं तुझ्यावर फार प्रेम आहे रे. मला तू हवा आहेस. माझा...."

शरद आवेगाने जवळ सरकला. समजुतीच्या स्वरात म्हणाला,

"मी तुझाच आहे. तूच वेडेपणाने वागतेस. अग, इतरांना इतका एकान्तसुद्धा मिळत नाही. दहा माणसांच्या घरात बघ एकदा!—अन् मजुरांना तर...असं काय करतेस!—नव्या नवलाईनंतर पूर्वीसारखी ओढ नसते. तरी पण–"

त्याचे हात घट्ट धरून मंजुळा रडत म्हणाली,

"नव्या नवलाईनंतरसुद्धा तू हवा आहेस रे! पण ही घामट धावपळ, हे यंत्रासारखं वागणं सहन होत नाही मला. शरद, आपण इथून जाऊ रे कुठेतरी. मला घेऊन चल, आधी घेऊन चल—"

तिचे शब्द नि हुंदके हवेत घुटमळून राहिले. बऱ्याच वेळाने शरदचा घोगरा स्वर उमटला, "तू कंटाळली आहेस!...मला वाटतं, तुला मूल हवंय!--"

"असेल कदाचित! पण मूल व्हायचं असेल तर मी इथं मुळीच राहणार नाही. माझ्या मुलाला असल्या....जाऊ दे! कशाला चर्चा सारी—"

मंजुळेचे अश्रू वाळून गेले. शरदचाही आवेग आवरला. रुक्षपणे तो म्हणाला,

"आहे ह्या परिस्थितीत तडजोड नाही केली तर आपणच दुःखी होऊ!— मला तरी कुठे आवडते ही ओढाताण! पण काय करायचं? दिवसभराच्या दगदगीनं दमल्यावर शीण उतरायचा एकच उपाय आहे , तोही तू—"

शरदचे ते शब्द ऐकताच मंजुळेचे मन चिरून निघाले. तिला घृणा आली, चीड आली. तिच्या शरदने असे वागायला नको, मानायला नको. तिला वाटले उठून कुठे तरी दूर जावे, खूप दूर जावे--

तेवढ्यात शरदने तिला खुर्चीतून खाली ओढले. चिडून तो पुटपुटला,

"महिनाभर सहन करतो आहे...फारच चमत्कारिक झाली आहेस तू-"

ती खाली कोसळली. त्याच्या मिठीत तिला मजा वाटली नाही. उकाड्याने अधिक गुदमरल्यासारखे वाटले. लोकलमधल्या चोहोबाजूंनी मिळणाऱ्या माणसांच्या धक्क्यासारखे त्याचे आलिंगन होते! अन् गर्दीतल्या कुणा इसमाने घेतलेल्या चिमट्यासारखे चुंबन!

शरदने चिडून तिला दूर ढकलून म्हटले, "मर—"

मंजुळेला वाटले, खरेच मेले तर बरे होईल. आपल्या प्रियकराशी, आपल्या पतीशी समरस व्हायचे अवसानही उरले नाही आपल्याजवळ!–तिला स्वतःचाच तिटकारा येऊ लागला. इतर कुठल्या बाबतीत आपल्या आवडीनिवडी, आपल्या कल्पनाभावना कोसळायच्या राहिल्या आहेत? मग एवढ्यासाठी...! अगणित स्त्रिया नाही का मुकाट मन मारीत? तिचा शरद नाही का तसा वागत... व्याकुळतेने तळमळून ती उद्गारली, "ये ना...घे ना—"

"प्रेताशी शृंगार करता येत नाही मला!" शरद चिडून म्हणाला नि उठला, "आजपासून तुझा माझा संबंध सुटला. तू आपण होऊन मला दूर केलं आहेस. तू राहू शकशील; पण मला अशक्य आहे. मला माझं सुख शोधलं पाहिजे. तुझी मिजास नको! मी जातो—"

मंजुळेचे अश्रू आटले व कपाळ आठ्यांनी भरले. संतापून ती ओरडली,

"जा–वाटेल तिथे जा—"

"भीती आहे का तुझ्या बापाची–"

"घे–ते पर्समधले पैसे घे हवे तर! जा–"

मंजुळेचा संताप अनिवार होत होता. डोके फुटणार, अंग पेट घेणार असे तिला वाटू लागले. पण कसल्याशा भीतीने तिला एकाएकी घेरून टाकले. दगदगीने व दुःखाने घेरी येणारसे वाटू लागले. संतापाच्या नि दुःखाच्या ओढाताणीत तिचे हालहाल होऊ लागले. अनिवार यत्न करून तिने स्वतःला सावरले. सरपटत गेली व चाचपडत शरदचे पाय पकडून म्हणाली,

"क्षमा कर. मला पदरात घे!—मला समजून घे रे. मला तू हवा आहेस. पण..."

शरद चरफडत आरामखुर्चीकडे गेला. दगडासारखा दणदिशी बसला व सिगरेट पेटवू लागला. मंजुळा आर्ततेने त्याच्याकडे सरकली. आवर्जून सांगू लागली, "आणिक कसं सांगू?—माझ्या एकंदर कल्पना फार वेगळ्या आहेत, निराळ्या आहेत रे!..मन प्रसन्न असलं, शरीर टवटवीत असलं, स्वच्छ सुंदर वातावरण असलं, तरच माझ्या वृत्ती मोहरून येतात. इथे आजूबाजूला गडबड, वर्दळ चालू असते. रडणीओरडणी, शिव्यागाळी ऐकून कसंतरीच वाटतं. घाम येत असतो, पिसवा चावत असतात. अंग आंबून गेलेलं असतं नि डोके दुखत असतं. सारखे शिळ्या ब्रेडचे तुकडे, लोकलमधले लोभट डोळे, टाईपरायटरचे घण त्रास देतात. अन् मग मन मरगळून जातं नि शरीर उत्सुक होत नाही... ह्या व्यवहाराला जिकडे तिकडे किळसवाणी कळा आली आहे. जनावरासारखी! पण मला पशू व्हायचं नाही. माझ्या भावनांना, वासनांना मी जपते, पवित्र मानते! मला तेवढं तरी सांभाळू दे. माझी विटंबना करू नको–शरद, माझी विटंबना करू नको..."

मंजुळेचे तुटक शब्द केव्हा संपुष्टात आले, तिलाच कळले नाही. हुंदक्यांच्या ओघात ते विरघळून गेले. तिच्या पाठीचा कणा फुटू पाहात होता व डोळे पेटत होते. लोकलमधले लोक पाठीला धक्के देत होते व डोळ्यांत वासनापूर्ण नजरेने निरखीत होते. रस्त्यावरचे अनेक अश्लील शब्द व चाळीतली असंख्य अर्भकं फेर धरीत होती. पिसवा चावत होत्या, घाम साचत होता, अन् शरदच्या मांडीवर माथा ठेवून ती झोपी जात होती...

दहा

# मारुतराया

**व्यंकटेश माडगूळकर**

जून महिन्यातल्या ओल्या सकाळी गावात एक भला मोठा वानर आला. एकटाच. त्याचा गोतावळा त्याच्या मागे नव्हता. आमच्या भागात हा प्राणी अगदीच विरळा.त्यामुळंच सर्वांच्या कौतुकाचा, आदराचा. जवळजवळ दहाबारा वर्षांनी तो गावात दिसला. कुठून आला, कोण जाणे। पण आला तो शेपटीची चवरी मिरवीत गावमारुतीच्या देवळात शिरला. गाभाऱ्यात गेला आणि घटकाभरानं बाहेर येऊन शिखरावर बसला. लांब शेपटी हलवीत उनाला बसला.

हा विलक्षण प्रकार पांडू गुरवाच्या बायकोनं बघितला, आणि पोरगी काखेला मारून ती बाहेर पडली. घोडं चरायला रानात गेलेल्या नवऱ्याला ही हकिकत सांगणं अगदी जरूर होतं. कारण मारुती गावात आला होता. देवळात जाऊन आला होता!

देवळाजवळ असलेल्या शाळेत येण्यासाठी गावातली गुलाम पोरं पाटीदप्तरं हलवीत आली आणि शाळेच्या पायरीवर येऊन बसली, कारण शाळा अद्याप उघडलीच नव्हती. मास्तरांचा चहा अद्याप व्हायचा होता.

तारेवर चिमण्या बसाव्यात तशी ती पोरं पायरीवर दाटीवाटीनं बसली, आणि आपल्या मिचमिच्या डोळ्यांनी नव्या सूर्याचा चमकदार प्रकाश बघू लागली, तेव्हा मारुतीच्या शिखरावर बसलेला तो नवखा प्राणी त्यांनी पाहिला. आनंद, आश्चर्य, आणि भीती यांमुळं त्यांची मनं उडू लागली.

मग मुसलमानाचं धीट पोर पुढं झालं आणि आपलं नकटं नाक खाजवीत ओरडलं,

"अरं, वांडर वांडर हुप्। तुझ्या शेंडीला शेरभर तुप।"

त्याची री सर्वांनीच ओढली. तेव्हा वानर आपलं काळं तोंड विचकून पोरांना भिवडवू लागला. जागच्या जागी नाचू लागला.

मग मुसलमानाच्या पोरानं धोंडा उचलला. आणि नेमानं त्याच्या पाठीत बलकावला त्यासरशी वानर हातभर उडाला. वेदनेनं कळवळला. ची ची ओरडत पळाला आणि पिंपळाच्या शेंड्यावर जाऊन पानांत दडला. पोरं खाली जमा झाली, तेव्हा त्यांना दम देऊ लागला. त्यामुळं पोरं जास्तीच चेवली आणि भराभर धोंडे फेकू लागली. पण वानर फार

उंच होता. धोंड्याची फेक त्याच्यापर्यंत पोहचेना. हे त्या धूर्त प्राण्याच्या ध्यानात आलं. पिंपळाची कोवळी पानं खात तो आरामात बसला.

दरम्यान ही बातमी पांडू गुरवाला मिळाली होती. तो घाईघाईने घरी आला आणि टोपल्यातली कोरभर भाकरी घेऊन पिंपळाखाली गेला. धपाटे घालून त्यानं पोरं हुसकून लावली. आरडाओरडा केला.

"कुठं फेडाल रं हे पाप? बाराघरची बारा जूमून आलाय आन् मारुतरायाला धोंडं घालत बसला. त्यानं काय केलंय रं तुमचं?

गुरवानं धुडकावली तेव्हा ती चावट पोरं गुरवाला शिव्या घालीत आणि त्याची उंडग्या बायकांशी असलेली लफडी मोठमोठ्याने उच्चारीत पळाली.

हातातला भाकरीचा तुकडा वर करून पांडू वानराला बोलावू लागला,

"या या हनुमंता, हे घ्या।"

पण वानर पानेच खात बसला. त्यानं गुरवाकडे बघितलं नाही.

रानात जाता जाता ही मजा बघत उभे राहिलेल्या आबानानांनी गुरवाला वेड्यात काढलं. हनुवटीला झोके देत म्हटलं,

"लेका पांडबा, आज वार कोणता?"

"सनवार, नाना।"

"मग भाकरी कशी घेणारं रं तो मारुतराया?"

"मग?"

"अरं, फराळाबिराळाचं काय आण. गाढवा."

नाना वारकरी होते. मोठे भाविक होते. गावातली चार मंडळी जमवून ते भजन करीत. भजनाचा, टाळ, मृदंग, इत्यादी सारा सरंजाम त्यांच्या घरी होता. रामजन्म, मारुतीजन्म, असले समारंभ ते मोठ्या हौसेनं करीत. म्हाताऱ्याच्या शब्दाला गावात चांगला मान होता.

नानाचं हे बोलणं गुरवाला पटलं. धांदलीनं घरी जाऊन तो मूठभर शेंगदाणे घेऊन आला. ते दाखवून वानराला विनवू लागला,

"देवा या, हे घ्या, खाली उतरा!"

पण वानर नुसताच डोकावून खाली पाही. पांढऱ्या पापण्यांची चमत्कारिक उघडझाप करी. आपल्या काळ्या, लांबसडक बोटांनी काखेत खाजवी, आणि कोवळा पाला ओरबाडून खाई.

वानर बधेना तेव्हा गुरव नानांना बोलला,

"नाना,माझ्या पाप्याच्या हातचा फराळ घेणं त्याला पसंत नाही. तुम्ही बघा." तेव्हा नाना पुढे झाले आणि शेंगदाणे हाती घेऊन विनवू लागले,

"देवा, मी तुमचा दासानुदास आहे. माझा निवद्य घ्या, म्हाताऱ्याची सत्त्वपरीक्षा घेऊ नका!"

"देवा, मी तुमचा दासानुदास आहे. माझ्या निवद्य घ्या."

नानांनी नाना परीनं विनवलं, पोथीत ऐकलेल्या संबोधनांनी हाका घातल्या, तेव्हा वानर खाली उतरू लागला.

आतापर्यंत बरेच गावकरी गोळा झाले होते. मारुती खाली उतरू लागला तशी त्यांची मनं अधीर झाली.

वानर बुंध्याशी आला, पिंपळाच्या बेचक्यात बसला. नाना जवळ गेले. आणि त्यांनी हात वर केला.वानर पुढं वाकला. नानांशी भिडला. आपल्या काळ्या पंज्यांनी त्यानं म्हाताऱ्याचा हात धरला. गमतीदारपणं इकडे तिकडे बघितलं.

नाना म्हणाले,

"घ्या-घ्या. आता अनमान का?"

मग एकाएकी वानरानं तोंड पुढं केलं आणि मकेचं कणीस दातरावं तसा नानांचा हात दादरला, कांडरला. आणि शेपूट उडवीत तो पुन्हा झाडाच्या शेंड्याशी गेला.

त्या चाव्यानं नाना कळवळले. झीट येऊन खाली बसले. लोक घाबरले. म्हाताऱ्याला अल्लाद उचलून आणून त्यांनी घरात झोपवलं आणि हातावर गावठी उपचार केले. बापाचा हात फोडलेला बघताच थोरला पोरगा कळवळला, पेरणीच्या कामी म्हातारा निकामी झाला, आता रोजगारी गडी बघणं आलं, या विचारानं फार हळहळला.

मग गावातले लोक कुजबुजले की, नानांचा आपल्या सुनेशी संबंध आहे, हे खरं असलं पाहिजे. त्याशिवाय वानरानं त्यांना फोडलं नसतं. आणि त्यानंतर मारुतीला शेंगदाणे द्यायला कुणीच तयार होईना. कुणीच धजेना. विषाची परीक्षा बघा कुणी? पण गावात आलेला देव उपाशी ठेवावा कसा? गुरवाच्या मनाला ही गोष्ट पटली नाही. आपल्या आठ वर्षांच्या मुलीला शेंगदाणे देऊन तो वानराला म्हणाला,

"देवा, हे लेकरू अस्राप हाय. ह्याच्या हातचं तरी घ्या."

ती अजाण पोर हातात शेंगदाणे घेऊन उभी राहिली, तेव्हा वानर पुन्हा खाली आला आणि पोरीची पोटरी फोडून गेला. सोनाराच्या लिंबावर जाऊन बसला. गुरवाच्या बायकोनं ऊर बडवून घेतलं. आणि वानराच्या नावानं बोटं मोडली. तालुक्याच्या दवाखान्यात दाखवण्यासाठी पोर पाठीशी टाकून गुरव निघून गेला.

यावर लोक कुजबुजले,

"गुरवाची आणि त्याच्या बायकोचीही चालचालणूक बरी नाही, त्यामुळं असं झालं."

वानर कुणाच्याच हातचं खाईना, तेव्हा सर्वांना मोठी पंचाईत पडली. पानाच्या चंच्या सोडून, घोळक्याघोळक्यानं उभं राहिल्याराहिल्या त्यांच्या चर्चा चालू झाल्या.

दरम्यान सोनाराच्या लिंबावरून वानर लव्हाराच्या जांभळीवर गेला तेव्हा खाली बघून मुकाट मोठ ठोकणारा लव्हार तोंडातला तंबाकूचा गुळणा टाकून उठला आणि पोराला पाजत बसलेल्या बायकोला म्हणाला,

"थोड्या शेंगा दे ग, वानर आलाय आपल्या दारात."

"येडं का काय तुमी. मरू दे त्यो वानर. आपलं काम बघा."

"अग, दारात आलाया आपणहून. त्याला काय तरी दिलं पाहिजेल."

बायकोची वाट न बघता बयन्याच्या आलेल्या शेंगातल्या ओंजळाभर काढून तो बाहेर आला आणि वानराला दाखवून बोलावू लागला. आजूबाजूस कुणी नाही हे पाहून वानर खाली आला आणि लव्हाराचं तंगडं चावून धूम पळाला. गावातला एक लव्हार जायबंदी झाला. आता शेतकीची अवजारं बनवणार कोण?

त्या लङ्ख्या वानरानं सकाळपासून तिसरा प्रहरपर्यंत असा धुमाकूळ घातला. पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे ते दिसले त्या माणसावर दात चालवू लागलं, तेव्हा नानांचा थोरला पोरगा अधिकच खवळला. बचकेसारखे धोंडे हाती घेऊन जांभळीखाली आला. रागानं वानराला म्हणाला,

"राया, तू फार डाळ नासलीस."

आणि नेम धरून त्यानं धोंडा भिरकावला. हिकमतीनं एका अंगाला होऊन वानरानं तो चुकवला आणि दात विचकीत तो नानांच्या मोठ्या मुलावर धावून आला. दुसरा धोंडा उचलून पोरगाही हुषार राहिला. तेव्हा वानर चारी पायांवर अल्लाद उड्या घेत अण्णा जरगाच्या मळ्यात घुसला.

हातात धोंडा घेऊन नानांचा पोरगा त्याच्या मागे काळासारखा लागला. त्याचा आवेश बघून गावातली आणखी काही तर्णाबांड पोरं त्याच्याबरोबर धावली. काठ्या, धोंडे घेऊन धावली.

दोन चार मैल ताणपट्टा काढल्यावर वानर थकला. अंगावर आलेले धोंडे चुकवण्यात त्याच्याकडून कुचराई होऊ लागली आणि मग दहा बारा धोंड्यांत तो खाली पडला तसा पोरांनी गराडा घालून त्याला मध्ये घेतला. आता आपण वाचत नाही हे जाणून तो शहाणा प्राणी केविलवाणे हातवारे करून आपल्या भोवतीच फिरू लागला. तेव्हा वाण्याचा सदा हात आवरून नानांच्या पोराला म्हणाला,

"अरं अरं, तो हात जोडतोय. पाया पडतोय. मला मारू नका म्हणतोय."

पण नानांच्या पोराला क्रोध आवरला नाही. आवेशानं पुढं होऊन त्यानं वानराला काठ्या घातल्या. बाकीच्या पोरांनी निर्दयपणं त्याला धोंडाळला. नाकातोंडाला रक्ताचे बुडबुडे येऊन, हातपाय झाडून वानर मेला, निश्चेष्ट पडला, तेव्हा त्याचे दोन्ही पंजे एकमेकांत गुंतले होते, आणि केसाचं शिप्तर असलेलं त्याचं डोकं मातीनं भरलं होतं.

ती त्याची दशा बघून नानांच्या पोराला कणव आली. तो विचार करून बोलला,

"पोरानू, एक जण हतं राहा, आमी जाऊन टाळमृदंग घेऊन येतो. मारुतीला वाजत गाजत माती देऊ."

त्याचा आवाज विलक्षण मऊ झाला होता.

मेल्या वानराकडे दयाळूपणानं पाहत सदा बोलला,

"गरीब आपल्या हातनं मेला, वाईट गोष्ट झाली."

मग सर्वांच्या सांगण्यावरून तो गिधाडं वारायला तिथं राहिला आणि पोरं गावात आली. वानर मारल्याची हकीगत लोकांना कळली, तेव्हा त्यांनी हात जोडले, आणि गावात घडलेल्या या अपराधाबद्दल क्षमा कर, अशी मारुतीला विनवणी केली.

भजनी मंडळीसहित पोरं रानात गेली. रामनामाचा गजर करीत त्यांनी मोठ्या मानसन्मानानं वानराला ओळ्यात आणला आणि माणसासारखा जाळला.

नानांच्या जिवाला ही गोष्ट फार लागली. दुखण्यातून बरे झाल्यावर त्यांनी, ज्या जागी वानराला मारला त्या जागी एक दगडी चौथरा बांधला.

आता भाविक लोक जाता येता त्याच्या पाया पडतात.

अकरा

# मुक्ती

**पु. भा. भावे**

हा वसंत ऋतू आहे. ही सुंदर गिरिग्रामातील वसंत ऋतूची अत्यंत मधुर अशी पहाट आहे. आणि हा जो रसिक, मनस्वी आणि शूर तरुण आता फाशीच्या खांबाकडे चालविला जात आहे, तो देखील पुरुषी सौंदर्याचा एक विरळ नमुना आहे. ह्याचे नाव कधी फारसे वृत्तपत्रांतून आले नसले, तरी ते ह्या देशात विख्यात आहे. ते नाव फारसे काव्यमय नाही-पण ह्याचे पंचवीस वर्षांचे आयुष्य म्हणजे एक भव्य महाकाव्य आहे. भावनेची आणि अनुभवांची गाढता, विविधता व तीव्रता, कृतीचे आणि गतीचे विशाल वैपुल्य ह्यांचा हिशेब करीत असाल, आणि तो हिशेब तुम्हाला केलाच पाहिजे, तर ह्याच्या वयाच्या एकेका वर्षात चेतनामय आयुष्याची अनेक दशके सामावलेली आहेत, हे तुम्हीही मान्य कराल. प्रत्यक्ष सहोदराचा चेहरा या देशातील लोक एक वेळ विसरतील, पण ह्याचे हे तेजस्वी मुखमंडल ते विसरणार नाहीत. एका विशिष्ट सार्वजनिक स्थळी झालेल्या गोलकस्फोटकाच्या धुरात हा अदृश्य झाला, आणि नंतर देशातील घराघरांत त्याची अनंत छायाचित्रे जादूच्या क्रियेने अवतरली. तोच हा आता फाशीच्या खांबाकडे चालविला जात आहे. आत्माराम ह्याचे नाव. ज्याच्या शूर आयुष्याच्या खड्गाची मूठ कोरीव काव्याच्या कोमलतेने सजवलेली होती. जो वीरात्मा असूनही काव्यात्मा होता. क्रियाशील असूनही तत्त्वज्ञ होता. कठोर असूनही कोमल होता. विजनवासी असूनही विख्यात होता... मुमुक्षू, विचारवंत, कवी आणि वीर...! पंचविशी पार पडण्यापूर्वीच आता हा फाशी जात आहे. त्याची ती लांबसडक कलावंत बोटे पहा–आणि त्याची ती तर्जनी! मधुपात्रावरून, मधुकाव्यावरून, तत्त्वचिंतनाच्या प्रदेशात देदीप्यमान वक्तृत्वास गती देत राहणारी, अग्न्यस्त्रावरूनही त्याच लीलेने फिरणारी त्याची ती तर्जनी जनमना-समोरून फिरत राहील, जनमनास खुणावत राहील! तो गेला तरी त्याच्या गीताचे पडसाद उमटत राहतील, त्याच्या वाणीचे प्रतिध्वनी घुमत राहतील, त्याच्या आयुष्याचा प्रकाश तळपत राहील. कारण तो आता जाणार आहे, तो आता जात आहे - फाशी जात आहे!

हे गिरिग्राम आहे. हा वसंत ऋतू आहे. ही सुंदर वसंताची अत्यंत सुंदर पहाट आहे. आणि आत्माराम आता फाशी जात आहे. कोकिळा गीत गात आहेत, की विलाप करीत आहेत, कळत नाही. पुष्पसंभार सुगंधाचा वर्षाव करीत आहेत की निःश्वासांचा, ते कळत नाही. दिशा उजळून उठत आहेत की फटफटीत पडत आहेत,ते समजत नाही. ही शीतलता सुखाची आहे की दुःखाची, ते उमजत नाही. हे वृक्ष संताषाने माना डोलवत आहेत की शोकावेगाने हादरत आहेत, ते ध्यानात येत नाही. पण आत्माराम आपल्याच धुंदीत आहे. तो आपल्याच नशेत आहे. आपल्याच वेडात, आपल्याच निदिध्यासात तो तल्लीन आहे. जीवनात त्याला मृत्यूची साथ होती आणि मरणात त्याला जीवनाची साथ आहे. दोघांनाही तो समान मानतो. एकाच सत्याची ती दोन रूपे. जन्मक्षणी मृत्यूचाही जन्म होतो व मृत्युक्षणी जीवनाचा. जीवनाचा अंत मृत्यूत होता व मृत्यूचा जीवनात. प्रेक्षकाने एखादे नाट्य पाहावे, तसे आत्मारामाने आपले सारे वेगवान, गतिमान आयुष्य त्रयस्थपणे पाहिले. आता तो आपला मृत्यूही पाहात होता... तटस्थपणे! जीवन ज्या कौतुकाने, उत्साहाने, कुतूहलाने, आवेशाने, कर्तव्यबुद्धीने व मनःशांतीने त्याने पाहिले, त्याच समतोल रसिकतेने तो आपला मृत्यूही पाहात होता. कोकिळांची साद त्याला गायनाचाच आनंद देत होती. फुलांच्या निःश्वासांत त्याला सुगंधाचीच प्रचिती येत होती. दिशा तेजाने उजळत आहेत व वृक्ष-संतोषाने डोलत आहेत, असेच त्याला वाटत होते. कारण मृत्यूत तो अमंगल अशी भीषणता पाहत नव्हता, तर जीवनच पाहत होता. जीवनाचे चिरंतन सौंदर्यच पाहत होता. आणि पुनर्जन्माची आशा करीत होता.

...पुनर्जन्माची आशा! होय, तेवढी एक आशा मात्र त्याला होती. त्याचेही एक वेड, एक निदिध्यास होता... भारतवर्ष! ह्या सुंदर भारतवर्षाचे सुख–भारतवर्षाची उन्नती-भारतवर्षाचा उत्कर्ष!...भारत...भारत...आर्यावर्त...हिंदुस्थान! त्याचे स्वातंत्र्य! त्याची स्वाधीनता! तेथील चित्रविचित्र, बहुरंगी आणि तरीही एकरूप, लोभस, आकर्षक, जनसंघाचे प्रिय! रांगोळीच्या अनेकविध ठिपक्यांइतके भिन्न,पण तरीही एकाच रुचिर चित्राचे पूरक सौंदर्यबिंदू असणारे ते भारतीय! त्यांच्यासाठी जगावे, देशासाठी जगावे, देशासाठीच मरावे व मातृभूमीसाठीच पुनर्जीवित व्हावे, हे त्याचे वेड होते. काश्मिरचे फुलते सौंदर्य,पंचनदांची पवित्रता, हिमाचलाची उंची, गंगौघाची धवल दिव्यता, मलयगिरीचा नीलिमा, कन्याकुमारीची अस्पर्श चारुता, वंगभूमीची मृदुता... सौराष्ट्र, मागध, उत्कल, द्राविड, सिंधू, महाराष्ट्र यांच्या विविध गुणसौंदर्याची सरमिसळ...!... विविधतेने सांधलेले ते भव्य, दिव्य, एकाकार अखंड दर्शन! हाच त्याचा निदिध्यास होता. प्रिय भारतीचा तो उपासक होता. तिच्या सुगंधित मृत्तिकेने त्याला वेड लाविले होते. तिच्या दुःखाने तो दुःखित झाला होता. तिच्या सुखासाठी त्याने प्राण पणाला लावले होते. तिच्या मातीत मिसळून तो सुखी होणार होता. तिच्याच कुशीत तो जन्मला होता व तेथेच पुनर्जीवित होण्याची आस त्याने बाळगिली होती. मुक्ती...मुक्ती...? नव्हे... त्याला मुक्ती नको होती. भारत स्वाधीन नव्हता, आणि

त्याहीपेक्षा भारत सुखी नव्हता, तोवर त्याला मुक्ती नको होती. ह्या देशावर, ह्या देशाच्या नैसर्गिक सौंदर्यावर, ह्या देशाच्या मानवनिर्मित कुरूपतेवरही, त्याच्या सर्वंकष रसिकतेने प्रेम केले होते. आज तो मृत्यूचा मार्ग चालत होता. आज तो नव्या जीवनाचा मार्ग चालत होता. भारतासाठी...आर्यावर्तासाठी... हिंदुस्थानासाठी! तिच्यासाठीच तो सद्‌गदित झाला होता; अंतिम त्यागाच्या आनंदाने फुलून आला होता, तिच्यासाठीच तो आता फाशी जात होता. कर्तृत्वाचा, सौंदर्याचा, बुद्धीचा, अस्तित्वाचा प्रत्येक कण आजवर त्याने तिच्यासाठीच फुलविला होता. भारतीसाठीच आत्माराम आता फाशी जात होता. जे तिचे होते, जे तिच्यासाठीच होते, ते तिलाच तो अर्पण करीत होता!

फाशी? मृत्यू? जो श्वास आजवर स्वैरतेने, स्वेच्छेने, सहजतेने घेतला, त्याचा कुणा परक्याच्या आज्ञेने अवरोध? मित्रांच्या, देशबांधवांच्या, नातलगांच्या समूहातून मातेचा एक पुत्र बलात्काराने छिनावला जाणे? परमेश्वराने दिलेल्या प्राणावर परक्याची हुकमत? मातृप्रेमाच्या अपराधासाठी? होय...होय...तसेच! ही पुरातन पापे आहेत. निरागस व पवित्र प्राणांच्या मोलानेच ही फेडावी लागतात. ते मूल्य तरी किती स्वल्प आहे? केवळ देहाचे मूल्य! जे तिचे होते, ते केवळ तिला अर्पण करावयाचे; तिच्याच नावाने—येवढेच केवळ! मान मोडेल—गळा आवळला जाईल—मणका तुटेल—पण प्राण मुक्त होतील; व अंती मातृदेवताही! हे कुठले मरण? हे तर जीवन आहे! जे जीवन मानत होता, ते मरण होते; व जे मरण मानता, ते वस्तुतः जीवन आहे. भारतीच्या या पावित्र्यासाठी, भारतीच्या या अनमोल सौंदर्यासाठी, तिच्या बालकाच्या सुखासाठी, हे मूल्य काय फार झाले?...फाशी!...गुदमरलेला श्वास! बाहेर लोंबणारे डोळे! शासकांना, शासनकर्त्यांना व दासांच्या जगाला बाहेर येऊन वेडावणारी जीभ! एक झटका—तडफड...व मग सारे शांत! मरणाचा नव्हे, हा जीवनाचा मार्ग आहे! मानाल तरच ही भयदायक कुरूपता... एरवी केवळ परिहास! शासनकर्त्यांच्या विद्रूपतेचे हे प्रेतस्वरूप प्रतिबिंब! त्या विद्रूपतेला वेडावणारे हे मेलेले शरीर! आत्मसौंदर्य तर केव्हाच भारतीच्या रम्य रूपात विलीन झाले! कुरूपतेने फाशीचे दोर वळले, पण ते लटकले तर स्वर्गाला होते!

...कुहूऽऽ कुहूऽऽ कुहू...! लगातार कोकिळा साद घालीत होत्या. दिशांवर उजळा चढत होता. वृक्षांच्या माना जोरजोराने डोलत होत्या. पुष्पसंभार सुगंधाचा वर्षाव करीत होते. हा वसंत ऋतू होता. हे रम्य गिरिग्राम होते. ही तेथील रम्यतर पहाट होती व भारतीच्या सुंदर, पवित्र, दिव्य रूपाचे ध्यान करीत आत्माराम वधस्तंभाकडे जात होता. कोणा मित्राचे, कोणा नातलगाचे, कोणा स्त्रीचे त्याला स्मरण होत नव्हते. त्याला केवळ भारतीच्या पवित्र,रम्य, रुचिर रूपाचा ध्यास लागला होता. आर्यभूमीची विविध रूपेच ह्या अंतिम क्षणीही तो पाहात होता. हेच त्याचे वेड होते! तिच्याचसाठी हे अश्रू! तिच्याचसाठी हा अवरुद्ध कंठ ! तिच्याच पूजेसाठी हे देहपुष्प! भारतीसाठी! भारतीसाठी! कारण केवळ एवढाच त्याचा निदिध्यास होता. भारत...आर्यावर्त...हिंदुस्थान...!

अहा! किती सुलभ—किती सोपे—किती सहज होते मरण! फाशीच्या दोरीचा हा खेळ खरोखरच किती आकर्षक होता! इहलोकात ह्या दोरीला लोंबकळून नुसते चार दोन झोके घेतले की, थेट परलोकात प्रवेश! ह्या दोरीचे एक टोक ह्या लोकात, तर दुसरे दुसऱ्या! हिचा आधार घ्या, आणि स्वर्गातल्या देवतांशी हातमिळवणी करा! हिचा निवारा घेण्याचा निर्धार करा, आणि मग दास्याला, दैन्याला, दास्याच्या नरकयातनांना खुशाल वाकुल्या दाखवा! किती सहजलभ्य आहे हा पृथ्वीला स्वर्गाशी साधणारा पूल! असे असताही ह्या सुंदर भारताचा मरणोन्मुख आत्मा, स्वर्गीय अमृताच्या घटांनी संगोपित करण्यासाठी; स्वर्गाची कल्पना कणाकणांनी टिपून आणून ती या सुफल भूमीत पेरण्यासाठी,ह्या पुलावर भारतीचे जाते-येते पुत्र दाटी का करून सोडीत नाहीत? किती सुलभ आहे हा मुक्तिमार्गाचा प्रवास! किती जलद, किती पुण्यप्रद, किती अल्पमोलाचा! ह्या दोरीच्या हिंदोळ्यावर जा, हेलकावे घ्या, मलिन वस्त्र गाळून टाका, दृष्ट पाश तोडून टाका, झुलत झुलत बंधन तोडा, झुलत झुलत कोष गाळा—आणि मग एक अखेरचा झोका, लांबलचक, सफाईदार, क्षितिजापासून क्षितिजापर्यंत! जणू सूर्यकिरणांचे दोर करून तुम्ही दिशा कापत झुलत आहात! सूर्यावर तुमची एक थाप, तर चंद्रावर दुसरी! थोडे नर्तन—थोडी धडपड—वेग घेण्यासाठी–वेग वाढविण्यासाठी पृथ्वीवर किंचित पाय टेकणे–आणि मग इहलोकावर अखेरचा लत्ताप्रहार! इहलोकापासून पाय कायमचे मुक्त! हा अखेरचाच झोका, अतिप्रचंड, वायुवेगाचा, विरुद्ध दिशांच्या टोकापर्यंत झेपावत, हेलावत सुसाटणारा, स्वर्ग-पृथ्वीचे निमिषमात्रात दर्शन देणारा, ज्याच्या वादळासारख्या गतीने तारेही शुष्क फुलांसारखे अवतीभोवती गळून पडावेत. असा हा सफाईदार, प्रचंड, लांबलचक झोका; अगदी अखेरचा; आणि मग कुठे आहात तुम्ही? ही केविलवाणी दोरी केवळ मृत्तिकेला कवटाळत स्थिर झाली आहे. तिला गती देणारे, तिचे वाहन बनविणारे कुठे आहात तुम्ही?

...हा बघा आत्मारामाने झोका घेतला! अखेरचा झोका! दोन्ही दिशांस क्रमशः आलिंगन देणारा! ही बघा मलिन वस्त्रे गळून गेली! हे बघा बंध तुटून पडले! हे बघा पाश सुटून गेले! चैतन्यविरहाच्या जाणिवेने ही पाहा माती काळवंडू लागली! कोकिळा संगीताचा कल्लोळ करीत आहेत! पुष्पसौरभाने अवकाश दाटला आहे! दिशांवर रंगीत प्रकाश उजळत आहे! त्याला कोणतीही खंत नाही. त्याला कोणतीही वेदना नाही. शरीराचे भोग शरीर भोगील, मातीचे ऋण माती फेडील, पण त्याला कशाचेही दुःख नाही. सौंदर्याने, रूपाने, गुणाने, तेजाने पेटलेले हे शरीर अनेक युवतींना स्पृहणीय वाटले होते, पण त्याला कुणाची स्पृहा नव्हती! मित्रांचे, आप्तांचे, देशबांधवांचे जीव त्याच्यात गुंतले होते, पण त्याचा जीव कोठे गुंतला नव्हता. त्याच्या रोमारोमांत, त्याच्या जीवनात, त्याच्या मरणात, केवळ माता व तिचे रुचिर रूप सामावलेले होते. त्या आक्रंदणाऱ्या विधवा मातेचे नव्हे, की जिने त्याला लौकिक जन्म दिला. तर ह्या दुःखी गतधवा मातेचे, की जिने त्याला, त्याच्या मातेला व मातृत्वाच्या अखंड परंपरेला जन्म दिला! केवळ तिच्याच सुखाचा व सौंदर्याचा त्याला आता ध्यास लागला आहे. केवळ तिचेच पवित्र, भव्य, विशाल रूप तो

आता पाहत आहे. केवळ तिच्याच चरणी त्याची आशा अद्याप गुंतून राहिली आहे. तिची सेवा, तिचे सुख, तिचे सौंदर्य. तिचे, त्या मातेचे, त्या भारतीचे! हाच त्याचा ध्यास आहे. हेच त्याचे वेड आहे. हा एक झोका घेताना...हा दुसरा झोका घेताना...हे पहिले पाऊल टाकताना...हे दुसरे पाऊल टाकताना...! किती सहजतेने आत्माराम ह्या दोरीवर झुलत आहे; किती सहजतेने ह्या दोरीवर त्याची पावले पडत आहेत...! आणि किती कोलाहलाने कोकिळा स्वर आलापीत आहेत, किती आवेगाने वृक्ष माना डोलावीत आहेत, किती त्वरेने दिशा उजळून उठत आहेत!

... हा वसंत ऋतू आहे. हे गिरिग्राम आहे. गिरिग्रामातील वसंताची ही सुगंधित, शीतल, रससमृद्ध पहाट आहे. रससेवनासाठीच ह्या ऋतूत रसिकांची येथे गर्दी जमत असते. ते रसिक अद्यापही निद्रामग्न आहेत. हे गिरिग्राम आहे. ही गिरिग्रामाची बंदीशाला आहे. आणि भारतीच्या पुत्राचे जे संघ अद्याप नीटसे जागे झाले नाहीत,त्यांच्यासाठीच आत्माराम फाशीच्या दोरीवर झुलू लागला आहे. त्याचे श्वास अविच्छिन्न चालू आहेत, पण ते निद्रिस्तांचे श्वास आहेत. ह्याच्या श्वासाचा अवरोध होत आहे, पण तो जागृत श्वासाचा अवरोध आहे.इहलोकावर, दास्यावर, निद्रेवर, स्वार्थावर, मलिनतेवर लत्ताप्रहार करून आत्मारामाने हा अखेरचा झोका घेतला! लांबलचक, सफाईदार, दोन दिशांवर थाप मारणारा, सुसाट, प्रचंड, दिशांचे मंडप गदगदा हलवून तारकापुष्पांची बरसात पाडणारा! कुठे आहे त्याची दृष्टी? कशावर फिरवीत आहे तो आपले विझते डोळे? कुठे अडकले आहे त्याचे मरते मन?

...हिमालयाची गगनचुंबी शिखरे, उत्तुंगतेची स्पर्धा लावणारी. स्फटिकशुभ्र चकाकणारी. उत्तरेच्या द्वारातील धवलतेचे तोरण. गुलाबपाकळ्यांच्या पायघड्या. पक्व फलभार. फुलांचे खच. रसरसलेली, करवतलेली, हिरवीकंच पाने. नौकागृहांचे थवे. देवदार, शाल्मली, आक्रोड! सिंधूचा फुंसाडता प्रवाह! अवखळ, उच्छृंखल, प्रचंड-जीवनदायी! ... लवपुरी, पुरुषपुर, शिबी, श्रीनगर! ओखला! कालिंदीच्या प्रवाहाची विस्तारलेली चादर! डोहावर वाकून पाण्याशी खेळणाऱ्या कदंबाच्या फांद्या! दुग्धपानाने फेसाळलेले बालकांचे ओठ! बंदुकीच्या कृष्णमुखातून उडालेली आग! सीमेवर टाकलेले पर्णशून्य प्रस्तरांचे उग्र सैनिक! वाराणशी...काशी विश्वनाथ... घुमणाऱ्या घंटा-धूप-दीप–पुष्पसौरभ–अर्धप्रकाशित, अर्धोष्ण, गाभारे! शुभ्र-शांत-पावन गंगा! प्रयागतीर्थ–धवल श्यामल सरितासंयोग! मथुरा... गोकुळ... वेणुनाद...चांदणे...रास... रेशमी पीतांबर...गंधविलेपित देह.... मुष्टिप्रहार! मागध... पाटीलपुत्र... नीलकमले! वंग... मेघना... पद्मा... नारिकेल... पोकळी... असंख्य तडाग...हरितसृष्टि! नवनीत कोमल, प्रस्तरशून्य! ...चितोड...उग्र, दिव्य...रक्त! जयपूर...! अवंतिका-मालव महाकाल...घंटानाद...मोरांचे दीर्घ स्वर...कर्कश, आर्त! डहाळ्यांतून गाणारी एकाकी कोकिळा! भंगून पडलेले पुरातन सिंहद्वार! भारतगानाने तटतटलेले

कंठ! जुनाट विहिरीतून लुकलुकणारे पाणी? भूमिगत गाभारा! चित्रश्रेणी! विक्रम–कालिदास–औदासीन्य–!

...विंध्य–सप्तपर्वत...उत्फुल्ल पारिजात–सजल,—शांत, वायू! अजिंठा, वेरूळ, अलौकिक कलासौंदर्य–दिव्य,अमर, रंगसंपत्ती! द्वारावती, जगन्नाथ...भुवनेश्वर...सजीव शिल्प...मंदिरे–मंदिरे-शिखरे! महाराष्ट्र, सह्यगिरी, उसळते वारू, उज्ज्वल शस्त्रे, फडकता भगवा! सिंधुसागर...गंगासागर... हिंदुसागर...उसळता, लहरावता, शांत, रौद्र, अफाट...खेळता...सपाट...गगनचुंबी! वाऱ्याने सळसळणारे गवताचे सागर! कुरणातून गेलेली शुभ्र पाऊलवाट! हस्तिनापुरच्या थंडीचा कडाका–बद्रीनाथावर झिमझिमणारे हिमतंतू–मृगाच्या सुवासाचे श्वास सोडणारी जलसिक्त भूमी... हिवाळ्यात पेटणाऱ्या चुलीची उष्णता...लहान मुलांचे स्वर...पृथ्वीस्तंभाची लांबलचक सावली...कुठल्या तरी गल्लीतील परिचित गंध...टाळ्यांचा कडकडाट...गर्भवतीच्या मुखावरील तजेला...मदुरेच्या सीमेवरील शेवंतीचा पिवळा गालिचा–मीनाक्षी...दक्षिणापथ...उंच, शिल्पखचित, मनोहारी गोपुरे...चित्शक्तीस आवाहन देणारी... झोपड्यांच्या शिखांतून वळसे घेणारा धूर...मोटेचा आवाज...बैलांचे गोल डोळे...नांगरलेली तप्त भुई... प्रचंड जलप्रपातांचे निनाद... खपाटीस गेलेली पोटे...मंडपम्‌चा सागरसेतू... रामेश्वराचे प्रतिबिंब झेलणारा हिंदुसागर...देव्हाऱ्यातून वाचाळ झालेल्या घंटांच्या सहस्त्रावधी जिव्हा...घामाने गळणारी माणसे...त्रिचीच्या प्रस्तर मंदिरावरून दिसणारी तुंगभद्रा–कन्याकुमारी...तिचे चरण...भारतीचे चरण...तीन सागरांच्या तीर्थात प्रक्षालित होणारे...बहुरंगी जले...बहुरंगी सूर्योदय...भव्य,रम्य, रंगमय सूर्यास्त...शुभ्र वालुकेच्या गोलाकार टेकड्या...नील,...पीत,...धूसर...! घरी परतणारे गुरांचे कळप... ओल्या मातीवर उमटलेली पावले... दिवाळीच्या दिवसांतील निरभ्र वायुमान. काटेरी कुंपणावर तरारून चढणारी वेल... प्रतिष्ठान... पंढरी... करवीर... भागानगर... कन्याकुमारी...तिचे चरण... तिचे रूप...तिचे पावित्र्य...भारती. भारतीचे! टाळमृदुंगांचे गजर...वंगकन्यांचे उलूक ध्वनी...देहभान विसरलेले भक्तगण...ओवाळणारी निरांजने... सुकून फुललेले निर्माल्य...तिचा महिमा...तिची थोरवी...तिचा जयजयकार...तिचा, भारतीचा...!!

...हा अखेरचा झोका घेताना; लांबलचक, सफाईदार, दोन दिशांस भिडणारा, ताऱ्यांची दाणादाण करणारा. हा अखेरचा झोका घेतानाही तिचाच जयजयकार...! तिचाच जयजयकार आत्मारामाने केला. तिचेच रूप त्याने पाहिले. सोज्वळ, सुंदर, भव्य, म्लान! हा एक हेलकावा–हा दुसरा–आणि कुठे आहे आत्माराम? ही येथे मलिन वस्त्रे आहेत. ही येथे अर्थशून्य बंधने आहेत. हा येथे मोडका पंजर आहे, पण प्राणपाखरू कुठे आहे? आत्माराम कुठे आहे? परलोकाच्या सीमेपर्यंत त्यास सोडून ही दीनवाणी दोरीच केवळ येथे राहिली. पण ह्या मृत्तिकादीपकात जी ज्योती होती, ह्या खर्परघटात जे जीवन होते,ते कुठे आहे? हा नश्वर पुतळा येथेच भंगून पडला आहे. पण ज्यामुळे हा चैतन्यरूप पावला, तो आत्माराम?

विश्वाच्या उलगडत जाणाऱ्या पसाऱ्यातून तो जीवात्मा वेगाची पंखे लावून झरझरत होता. निळसर, जांभळ्या, धूसर,पिवळ्या, लाल,हिरव्या, स्वप्नमय, अमानुष प्रकाशांची सरमिसळ! ग्रहगोलांनी परिधान केलेल्या मेघमालांचे उडते पदर! वातावरणांची व आकाशांची अनंत चिटोरी! अवकाशात भयंकर ध्वनींचे पडसाद घुमवीत स्वत:भोवती घुसळत फिरणाऱ्या भिंगऱ्या! संख्याहीन भोवरे–संख्याहीन भिंगऱ्या! संख्याहीन ध्वनींचा कल्लोळ! शून्याच्या सागरावर फुललेले अगणित बुद्‌बुद! मोकळे सुटलेले अनंत आकाशदिवे! गोलाकार भ्रमणारे काजव्यांचे थवे! पोकळीच्या तबकात फिरविले जाणारे दीपक! गर्द गरगरणाऱ्या दिवट्या! विश्वकर्म्याने उडविलेले पतंग! पोकळीच्या छतास जडविलेले रत्नांचे खच! विश्वयंत्राची अनंत फिरती चक्रे!

सारा अवकाश त्या प्रचंड,महाकाय, गोलांनी घुसळला जात होता. काहींचे पुंज परस्परांभोवती पिंगा घालत होते. काही निराधार, एकटेच, अधांतरी,लोंबत होते. कोठे चक्रमय वायुरूपास गोल घनता येत होती. कोठे घन गोल वायुरूपात विरून जात होते. काही घडविले जात होते, काही मोडले जात होते. काही मरत होते, काही झिजत होते. काही उन्मार्गगामी गोल परस्परांवर पिसाटांसारखे आदळून ठिणग्यांच्या फवाऱ्यांत नष्टप्राय होत होते! कुठे त्या ठिणग्याच तोल सावरून स्वत:चे जग निर्मित होत्या! प्रत्येक ठिणगी म्हणजे एक जग! अशा अगणित ठिणग्या; अशी अगणित जगे! त्यांवरील असंख्य जीवसृष्टी! त्यांची अपरिमित सुखदु:खे! त्यांची उत्पत्ती व लय! ठिणग्यांचा लय! जगांचा लय! त्या जगांतील जीवसृष्टीचा लय! त्यांच्या हर्षामर्षाचा, सुखदु:खांचा लय! पुन्हा नवी उत्पत्ती- -पुन्हा नवा लय! ह्या संख्याहीन गोलकांची गणती! तेथील जीवसृष्टीची गणती! त्यांच्या सुखदु:खांची गणती! त्यांचे तोल सांभाळणे! त्यांचे तोल जाणे! केवळ परस्परांच्या आकर्षणावर त्यांनी अधांतरी तरंगत व भ्रमत राहणे! प्रचंड आघात! त्या आघाताचा कडाडणारा भयानक निनाद! त्या निनादामागून पसरणारी अथांग शांती! जळत्या ठिणग्यांचा पाऊस! थंड पडलेल्या राखेचे बलाढ्य उडते कण! अवकाश-अवकाश...पोकळी...शून्याकार! मधून मधून जाणारे हिरव्या, निळ्या, तांबड्या, जांभळ्या रंगाचे पट्टे! एकसमयावच्छेदेकरून फिरणाऱ्या भिंगऱ्यांचा अघोर, घुमता, कापविणारा,संतत विलाप!... जगड्व्याळ, आकर्षक, उग्र, अंतहीन, दृश्य! ज्याच्या सौंदर्यातही भयानकता होती, ज्याच्या भयानकतेतही आकर्षण होते. ज्याच्या चुटपुटत्या दर्शनानेही जड दृष्टीच्या ठिकऱ्या उडाव्यात. ज्याचा लवमात्रही कल्पनेच्या जालांत आकळण्याच्या क्षीणतम चेष्टेनेही ते अल्पशक्ती कल्पनाजालच फाटून पडावे! ज्याच्या निसटत्या जाणिवेने जीवास मूर्च्छना यावी...!

...विराट विश्वाच्या त्या उलगडत्या पसाऱ्यातून तो तेजात्मा आलोकाच्या कंदाकडे प्रवास करीत चालला होता. प्रकाश, तडित, ध्वनी, वायू संमीलित गतीपेक्षाही अधिक गतीने! कधी लाल, निळ्या, धूसर प्रकाशाचे पडदे सारून! कधी ठिणग्यांच्या प्रपातांत अवगाहन करून! कधी शीतल चंद्रिकेचे चंदनतुषार विलेपून! आसमंतात दीपमाला झगमगत असता! अवकाशाच्या तबकातील काही दीपक विझून जात असता व काही

उजळून उठत असता ! घुमणाऱ्या गोलाकार भिंगऱ्यांची घरघर साऱ्या अवकाशात रोरावत असता—! कोणा अदृश्य जादूगाराने भिरकावलेल्या कंदुकांचे समूह सर्वदूर उसळत असता...! ज्ञानरूप,प्रकाशमय, मोक्षदायी, शांतिरूप विश्वात्म्यात विलीन व्हावयास योग्य अशा त्या जीवात्म्याचा प्रवास अप्रतिहत गतीने चालूच होता. मुक्तीस योग्य अशी ही ज्योत होती, मोक्षास पात्र असा हा आत्मा होता. हीनतम बंधनांचा, हीनतम मोहाचा, तुच्छतम संकीर्णतेचा कधी ह्याला स्पर्श झाला नव्हता. अवकाशाच्या प्रथम मंडलात त्या जीवात्म्याचा प्रवेश झाला व देवदूतांनी मुक्तीचे द्वार मोकळे केले, सान्ताचे अडसर काढले व त्या तेजात्म्यास पालवीत ते म्हणाले, "तुझे स्वागत असो! ये. इकडे ये. येथेच शांती आहे!"

तेजाने आकर्षित होत असता, मुक्तिमार्ग मोकळा झाला असता, जडकोषाची बंधने तुटली असताही तो सूक्ष्मदेह अद्याप इच्छेच्या एका अदृश्य पण बलवान तंतूने पृथ्वीशी बांधला गेला होता. सुसाट वेगाच्या त्या ऊर्ध्वगामी प्रवासातही तो वारंवार मागे वळून पाहात होता. वेगाच्या पंखांवर उड्डाण करीत असताना तो देवदूतास म्हणाला,

"प्रभो! तेथे निःसंशय शांती आहे. पण माझ्या सुंदर भारतात?"

"भारत? तुझा भारत? तुझा सुंदर भारत?" देवदूत स्मित करून म्हणाला.

"होय प्रभो! माझा भारत. माझा सुंदर भारत..."

ती कल्पना स्फुरली व जीवात्म्याच्या ऊर्ध्वगामी प्रवासाची प्रचंड गति एकदम किती तरी मंद पडली. देवदूत जीवात्म्याला पालवीत पुन्हा म्हणाले,

"येथे ये, म्हणजे कळेल. हे ब्रह्मानंदाचे धाम आहे. हेच अंतिम श्रेय. निर्विकल्प, अननुभूत सौख्य येथेच आहे."

"पण प्रभो! माझ्या मनोरम भारतात आता सौख्य आहे काय? आनंद आहे काय?"

हा प्रश्न उमटला आणि जीवात्म्याचा वेग अधिकच कमी झाला. मुक्तीची कवाडे मिटू लागली. अनंताचा प्रदेश आक्रसू लागला. मोक्षाच्या मिटत्या द्वारातून देवदूत पुन्हा म्हणाले,

"अवकाशाच्या ज्या पहिल्याच मंडलात तू कुंठित होत आहेस, तेथे रहस्यांचे भेद नाहीत. तेथे जड संदेह नाही, पण संदेहशून्यताही नाही. अज्ञानाचे गाढ तमिस्त्र नाही, पण केवळ ज्ञानाचे तिमिरहारक शुद्ध तेजही नाही. प्रश्न स्फुरण्यापूर्वीच उत्तरे सापडण्याचे हे स्थळ नव्हे. म्हणून हे तेजोरूपा, इकडे ये, प्रकाशाकडे ये."

"पण हे भद्ररूपा–"

मुक्तीची द्वारे निमिषार्धात मिटली व देवदूतांचे अखेरचे शब्द उमटले–" तर मग भूर्माच्या एका नगण्य रेणूशी बद्ध असलेल्या जीवात्म्या! तिथेच राहा व परिपक्व हो! तू परत मात्र जाणार नाहीस, कारण परत न जाण्याइतका आता तू प्रगत झाला आहेस! मागचे मार्ग बंद झाले आहेत व पुढचे मार्ग अद्याप तुझ्या दृष्टिपथात यावयाचे आहेत! तुझे शुभ असो!"

देवदूतांची वाणी विरली व गतिमान जीवात्म्यास स्तब्ध गतिहीनता आली. त्याचा वेग सर्वस्वी ओसरला व अवकाशाच्या प्रथम मंडलातच तो तरंगू लागला. त्याची सूक्ष्मता स्थूल बनली. त्याचे ऊर्ध्वगमन थांबले व अवकाशाच्या एकाच पातळीवर तो हेलावू लागला. तो मुक्त नव्हता पण अवकाशाच्या प्रथम श्रेणीपर्यंत त्याचे उड्डाण झाले होते. चर्मदेहास अकल्पनीय अशी गतीची स्वैरता त्याला लाभली होती. चर्मदेहास अचिंत्य अशी दृष्टीची सूक्ष्मता त्याच्या ठायी विकसित झाली होती. आणि काळ तर त्याच्या लेखी अस्तित्वातच नव्हता. काळास तर तो येथेही अजिंक्यच होता. अस्वस्थ वेणुनादाने वायुलहरीवर घुमावे, प्रवासशील मेघखंडाने आकाशावर तरंगावे, तसा तो जीवात्मा अवकाशात घुमू लागला...तरंगू लागला... त्याची दृष्टी मात्र पृथ्वीवर, भारतावर अविचल एकाग्रतेने खिळलेली होती.

विश्वपुरुष पापण्यांची उघडझाप करीत होता आणि तेवढाच काळ पृथ्वीवरील मानव सहस्त्रावधी वर्षांनी मोजत होता. कालसागरावर निसटता तरंग येत होता व जात होता–तो तरंग वस्तुतः कोठूनही येत नव्हता व कोठेही जात नव्हता—पण मायामूढ मानव तेवढ्यात दशसहस्त्र वर्षांची गणना करून टाकीत होता. विश्वाच्या पसाऱ्यातील एका कणाएवढेही पृथ्वीचे मोल नव्हते. काळाच्या एका सुस्त हालचालीच्या तोलाचीही पार्थिव युगे नव्हती. विश्वपुरुष पापण्यांची उघडझाप करीत होता–मानवाची सहस्त्रावधी वर्षे विरून जात होती. कालसागरावर आभासात्मक तरंग उठत होते–माणूस कोटी वर्षे मोजत होता. काळ सुस्तावलेला निःश्वास टाकीत होता व भूगोलावर होत्याचे नव्हते करणारी युगे संपत होती, अवतरत होती, घडलेले मोडत होते, मोडलेले घडत होते व तो जीवात्मा पाहात होता, पृथ्वीकडे पाहात होता, भारताकडे पाहात होता...पार्थिव घडामोडीच्या, मानवी कर्तृत्वाच्या, आशा-निराशेच्या, जन्म-मरणाच्या पोरखेळाकडे पाहात होता...!

हे गिरिग्राम. येथून त्याने अखेरचा झोका घेतला. देशप्रेमासाठी परक्याकरवी फाशी खाणाऱ्या पिढीतला तो शेवटचा होता. ही एके काळी बंदीशाला होती. आज क्रूर भिंतींचा, त्या नारकीय पंजराचा तेथे मागमूसही नाही. लोकक्षोभाच्या अनावर भरतीने ते नरकचिन्ह केव्हाच धुऊन टाकले. हे आत्मारामाचे भव्य सुंदर स्मारक. देशबांधवांचा साकार आदर, साकार कृतज्ञता! हेच ते गिरिग्राम. येथे वसंताची शतके फुलली, दशकांनी दिशा उजळल्या. सहस्त्रावधी कोकिळांचे संभार गाऊन गेले. कालचे गिरिग्राम आज राहिले नाही. आजचे उद्या नाही. दहा शतकांपूर्वीचे दहा शतकांनंतर नाही!

अनेक जनसंघ उदयास आले व निमाले, अनेक राज्यपद्धती उत्पन्न झाल्या व विलयाला गेल्या. क्रोधाने वेडावलेले समूह, भयानक युद्धे, रक्तपात अनर्थ! प्रत्येक युद्ध युद्धाचा अंत करण्यासाठी, प्रत्येक रक्तपात, रक्तपाताचा शेवट साधण्यासाठीच! नवी समाजघटना, नवे असमाधान, नवे राज्ययंत्र, नवा उत्पात, नवे तत्त्वज्ञान, नवी क्रांती! खालचे वर जात होते, वरचे खाली! नवे परिचयाने जुने वाटत होते व दूरस्थ जुने

अपरिचयाचा वेष घेऊन पुन्हा नवे बनून येत होते! तेच पाणी सागरात. त्याची पुन्हा वाफ. त्या वाफेचाच पाऊस. त्याचाच जलसंचय. त्याचेच पुन्हा बाष्परूप! हे नवे पाणी...हे जुने...! कल्लोळ, आक्रोश, मतभेद, यादवी, संघर्ष! सारे भूमीच्या– जनसंघाच्या– सुखासाठी. सारे त्यांच्या उन्नतीसाठी, उत्कर्षासाठी व हितासाठी! एका क्षुद्र मृत्तिकाकणावरील क्षुद्रतम जंतूचा अहंभाव, ज्ञान, गर्व, ताठा, युद्धभाव, अभिनिवेश, संघर्ष! एकाचा उदय दुसऱ्याचा अस्त! एकाचा जन्म दुसऱ्याचा मृत्यू! कोकिळांच्या अनेक पिढ्या गात गेल्या. वसंताचे असंख्य कुंज फुलत गेले. दिशा अगणित संख्येने उजळल्या आणि मावळल्या. कितीक वृक्षांनी कितीकदा माना डोलावल्या व मोडल्या! शतकांच्या सेना अचपळ गतीने, अखंड रांगेने, होत्याचे नव्हते करीत, मांडलेले मोडून टाकीत, दडदडून धावत सुटल्या होत्या! त्यांना कुठे शेवटच नव्हता! पार्थिव वस्तुजाताला शेवट होता, कीर्तीच्या अमरतेला शेवट होता, ज्ञानाच्या गर्वाला शेवट होता, प्रत्यक्ष पृथ्वीगोलाला शेवट होता, पण शतकांच्या त्या अनंत श्रेणींना, घडामोडींच्या त्या असंख्य प्रेक्षकांना कुठे शेवट नव्हता!

...गिरिग्राम?–गिरिग्राम? कुठे आहे गिरिग्राम? आणि गिरिग्रामच नाही तर आत्मारामाचे स्मारक तरी कुठले? त्याचा तो प्रचंड, सुंदर, संगमरवरी पुतळा तरी कुठे आहे! ते स्मारक तर फार पूर्वी नष्ट झाले. गिरिग्राम नष्ट होण्यापूर्वी अनेक शतके आत्मारामाचे ते स्मारक इतिहासपूर्व ठरले, निरर्थक ठरले व विस्मृत झाले! तो कोणाचा पुतळा, ते कोणाचे स्मारक, ह्याविषयी जिज्ञासाही न ठेवणाऱ्या, जिज्ञासाही ठेवणे, निरर्थक वाटणाऱ्या, पिढ्या जन्मल्या, नष्ट झाल्या व हळूहळू पडत झडत, तुकड्या-तुकड्यांनी, कणाकणांनी ते स्मारक,तो अमर कीर्तिस्तंभ झडून गेला, नामशेष झाला,मातीत मिळाला! नवे वीर जन्मले! नवे हुतात्मे! त्यांची कृत्ये! त्यांची अमर स्मारके! त्यांची अमर कीर्ती! आणि त्या अमर कीर्तीचा मृत्यू! त्या स्मारकांचा विनाश! त्यांच्याही इतिहासाची अबोध अर्थशून्यता व विस्मृती! पार्थिव अमरांच्या अनेक श्रेणी व त्यांचा क्षुद्र मृत्यू! आणि काळपुरुषाने एकदाच डोळे मिचकावले आणि मग ते भव्य, सुंदर राजनगर, ते गिरिग्रामही कोठे उरले नाही! राजरस्ते, भवने, प्रासाद, क्रीडास्थाने, सारी ओस पडली, भंगली व भूमीने रवंथ करीत ती सावकाश गिळून टाकली! त्या जागी आता रान वाढले होते, आता पुनश्च ते वन्य पशूंचे निवासस्थान झाले होते! गिरिग्राम गेले, आत्मारामाचे ते स्मारक तर किती तरी आधीच नष्ट झाले! आत्मारामास ओळखणारी, त्याचा जयजयकार करणारी, त्याचे स्मारक उभारणारी, ती पिढी केव्हाच पुसून गेली–! त्यांचे ते नगरही नष्ट झाले!

...आणि हे एकच नव्हे, तर अशी कित्येक गर्वोद्धत नगरे मातीने पचवून टाकली होती! प्रचंड प्रासाद, दुर्ग, भवने! जलौघाने आपले तट घासावे, तसे काळाने व प्रचंड महाभूतांनी त्यांना घासत नेले! ओसाडी, मोडक्या भिंती, पडके दुर्ग, भंगलेले पथ व अंती माती, केवळ माती! जे मातीने मांडले, ते मातीनेच पचवले. निनेव्ह, पर्सीपोलिस; बॅबिलॉन... पॉम्पेई...माती...

...जीवात्मा पाहात होता...अविचलपणे, दृष्टी न चळविता, कुतूहलाने! काळपुरुष सुस्त, आळसलेली, नाममात्र हालचाल करीत होता! स्मारक गेले! गिरिग्राम नाश पावले! पक्षांचे,वादांचे, तत्त्वज्ञानांचे, समाजाचे उत्थान झाले व पतनही! अद्यापि भारताचे सुख दूरच होते! अद्यापि मानवसमूहांचा उत्कर्ष दूरच होता! अद्यापि शांती दूरच होती. भारताचे सुख? भारताचा उत्कर्ष? भारताविषयी प्रेम? सुंदर भारताविषयी? प्रसन्न भारताविषयी?...काळपुरुषाच्या पापण्या उघडल्या व मिटल्या...

...रक्ताचे पूर, विद्रूप स्वर, जनगणांचे संघर्ष, विनाश-प्रलय-रणगीत शांतिगीत... द्वंद्व... विनाश...प्रलय...!!...भारतासाठी, भारताच्या प्रेमासाठी, मानवसमूहांच्या उद्धारासाठी!...भारत? भारत? सुंदर, प्रसन्न, सुजल, सुफल, भारत! कुठे आहे?...अहो, कुठे आहे तो? माझा-माझा-प्रिय भारत? गोबीच्या वालुकासमुद्राने गिळलेली संस्कृती व गिळलेला जनसंघ कुठे आहे? मय सुधारणांचे अवशेष कुठे आहेत! कुठे आहे ती सारथी संस्कृती? ती असुर सुधारणा कुठे आहे? तो सुमेर समाज कुठे आहे? मनुष्या! कर, कर,गणना! काळाच्या अथांग, अफाट सागरातला एक जलकण तरी तोलून, उकलून, पिंजून दाखीव! अखेर तुझे सामर्थ्य किती? तुझी शक्ती किती? तुझे ज्ञान किती? मर्यादित कधी अमर्यादाला गिळेल? सान्त अनन्ताला आकळेल? जरा पाहा...

...पृथ्वीच्या गर्भातील क्रुद्ध गुरगुर! दिशांना जीभ लावत उसळणारी अग्निरसांची कारंजी! ढेकळासारखे गडगडणारे हिमपर्वत! सागराच्या प्याल्यांत पडणारे...विरून जाणारे! ...सरकणारे–खचणारे—जललिंपित होणारे-उमलत्या कमलाप्रमाणे सावकाश फुलणारे खंडप्राय प्रदेश! उजेडाचा गर्द अंधार व गर्द अंधारातून दीप्ती! उष्णतेस गारठून टाकणारा शीतवर्षाव व शीतखंडावर पसरली जाणारी उषेची शाल! गरजणाऱ्या नद्यांची वालुकावर्षावाने बंद केलेली मुखे! शुष्कतेने पालथी केलेली सरोवरांची पात्रे! गरजणारी अजस्त्र रंगभूमी! जाणारी पात्रे, न येणारी पात्रे! जाणारी वने, जाणारे भूखंड,जाणारी नगरे व येणारी! प्राणांतिक वेदना! प्रसूतीच्या व मृत्यूच्या! राक्षसकाय अजगर, केसाळ गजरूप प्रचंड मॅस्टोडॉन, विचित्र,भयानक, अज्ञात प्राणी...त्या साऱ्यांचा अंत! पंचवीस सहस्त्र वर्षांचे पहिले हिमयुग! पाऊण लक्ष वर्षांचे आंतर हिमयुग! पंचवीस सहस्त्रांचे दुसरे हिमयुग! दोन लक्ष वर्षांचे दुसरे आंतर शीतयुग...! अधिक पंचवीस सहस्त्र वर्षे, अधिक एक लक्ष,अधिक पंचवीस सहस्त्र, अधिक पंचवीस सहस्त्र... तिसरे हिमयुग, तिसरे आंतर हिमयुग...चौथे हिमयुग, हिमोत्तर काल...एक संपूर्ण हिमयुग! सहस्त्रावधी वर्षे-लक्षावधी... कोट्यवधी... केवळ एक हिमयुग...अनेकांतील एक! अशा अनंत हिमयुगांची वाढती व विरती रास! अशा युगांची! लोहयुगांची! बाष्पयुगांची व विद्युतयुगांची! अणुयुगांची! आणि पुनश्च तोच चक्राकार प्रवास! प्रस्फोट, शांती, छाया, प्रकाश, जळणारी आग, कापविणारी थंडी, उत्पत्ती...स्थिती...लय! युगांची निर्मिती! युगांचे निर्वाण! अनंत, अनाकलनीय. विश्वपुरुषाच्या पापण्यांची स्वप्नांतली उघडझाप! काळसागरावर उठलेला मृगजळाचा तरंग! प्रचंड स्वप्न! प्रचंड सत्य! भयानक क्रीडा! कवट्या-अस्थिपंजर...!

क्रोमॅग्नन मानवपूर्वजाच्या, नीआंडर्थल, मॅग्डेलेनियन पूर्वमानवाच्या!... भूमिगत झालेली, गाडली गेलेली...मातीत मिळालेली नगरे! प्रचंड आक्रोश - गर्जना - कल्लोळ – गवताच्या पात्याप्रमाणे वने उडविणारा झंझावात, जीवसृष्टी जाळत सुटणारा मृत्युमय हिमवायू, सागरास उकळ्या फोडणारी उष्णता! गडगडून पडणाऱ्या संस्कृती, नि:शेष व निष्प्रभ होणारे गर्वोद्धत विज्ञान...गुरगुर...गडगड... उफाळणारी जले...वेगाने सरकणारी भूखंडे... अस्तित्वात येणारी व नष्ट होणारी!... आशियास जुळलेला ऑस्ट्रेलिया, युरोपशी संबद्ध आंग्लद्वीप, अस्तित्वात नसलेली ब्रिटिश सामुद्रधुनी, अस्तित्वात नसलेली ब्रिटिश सुधारणा! गजबजलेला, सुखद ध्रुवप्रदेश, लाटांखाली बुडालेला हिमालय, गोबीचे सुंदर, सफल उद्यान...! नवा प्रलय...नवा हिमवर्षाव... जलोद्रेक... गरजणारे ध्वनी... गर्द अंधेर...नवा प्रकाश... पापण्यांची उघडझाप...तुटलेला ऑस्ट्रेलिया, तुटलेले काळे खंड, जलपूर्ण झालेली ब्रिटिश दरी, आंग्लद्वीपाचा जन्म, भारताचा जन्म, भारताच्या अखंड सौंदर्याचा जन्म, पुष्पसुगंधित काश्मिरचा, मधुर मलयाचा, मृदू वंगभूमीचा, गंगायमुनेचा, सिंधु-कावेरीचा, मानवी जनसंघाचा, संस्कृतीचा, मंदिरागोपुरांचा, शिल्पसौंदर्यांचा जन्म! चक्राचे फेरे, उदय, उत्थान, वादळ, शांती, संघर्ष...स्थिरावस्था...भारत–प्यारा भारत... माझा भारत...माझा भारत...

...जीवात्मा पाहत होता. आणखी एक आळसावलेली आभासात्मक हालचाल. मृगजलाचा चुटपुटता तरंग, पापण्यांची उघडझाप...अदृश्य वाटणारी. संथ वाटणारी, अतर्क्य वाटणारी. गतिमान, प्रचंड, अटळ, नूतन घडामोडी! कर्कश आवाज, घसरणे, वितळणे, घडणे, मोडणे... माझा भारत...माझा भारत...कुठे आहे भारत?

काश्मिरची उत्फुल्ल मुखश्री कुठे आहे? केरळाचे रूपवैभव कुठे आहे? वंगप्रदेशातील तडागांचे अगणित दर्पण कुठे आहेत? सप्तपर्वतांवरील पारिजातकांची मोहरलेली वने कुठे आहेत? लवपुरी कुठे आहे? इंद्रप्रस्थ कुठे आहे? दक्षिण मदुरेची ती अमोल शिल्पसंपत्ती कुठे आहे? उत्तर मथुरेतील मंदिरे कुठे आहेत? कुठे आहे स्वनामधन्य चितोड? वेरूळच्या लेण्यांतील ती कलात्मक संपत्ती कुठे आहे? सोसाटणारी सिंधू, पावन गंगा, पवित्र वाराणशी, सफल मालव, पुरातन अवंतिका, सागरवर्ती रामेश्वर, सारे, सारे कुठे आहे? अहो,कुठे आहे माझा भारत? हाच तो भारत? हाच तो सुंदर मातृदेश?

...दीर्घ मरुप्रदेश, उष्ण, असह्य, कुरूप! काश्मिरचे सारे पुष्पसौंदर्य येथे सुकले. सफलता, नागरता, संस्कृती, सारी ह्याच्या उदरात! वैराण, भयाण, निर्मनुष्य, विस्तार... हिमाचल झिजत गेला, लवत गेला, सपाट झाला! ती त्याची गगनचुंबी उंची! तो त्याचा प्रचंड विस्तार! काही नाही! आता तेथे काही उरले नाही! केवळ एक वासलेले भगदाड! दंतभग्नमुखासारखे! केवळ एक भयाण सपाटी! भारतीच्या सौंदर्याचा तो मुकूट भंगून चूर झाला! सुसाटणारे गार वारे! असह्य शीत, असह्य उष्णता! उडती वाळू, झंझावात! नगरामागून नगरे, जनसंघामागून जनसंघ, सौंदर्याचे सारे साज कोळपत गेले, विरत गेले,

गडगडत गेले, मत्त सागराने मर्यादा मोडल्या! हा पूर्वभाग त्याने गिळला! रसातळास गेलेला वंग! जलराशींनी ठायी ठायी कुरतडलेले भूभाग–गारठलेली, भाजलेली...वने—झिजून नष्टप्राय झालेले पर्वत, उघडा, निष्पर्ण, निर्जल, गारठलेला विस्तार, लांबच लांब, असह्य, अनोळखी, कुरूप, निर्मनुष्य! क्वचितच कोठे वनचर, क्वचितच कोठे श्वापद–दोघेही वन्यावस्थ!

—हा भारत? हा माझा भारत? कुठे आहेत तर ते येथले नागर जनसंघ? तो सुसंस्कृत समाज कोठे आहे? कोठे आहे त्यांचा राग, लोभ, त्यांचे कर्तृत्व व त्यांचा पराक्रम? तो पुरातन मानववंश कोठे आहे? नष्ट झाला, उठला, की परागंदा झाला? एखाद्या नूतन, समशीतोष्ण प्रदेशाकडे? पुनश्च उत्तर ध्रुवाकडे? तेथे आता त्याने वस्ती केली काय? की तो प्रलयाच्या एकाच प्रचंड प्रहाराने समूळ नष्ट झाला? ज्यावर मी प्रेम केले, ते जनसंघ! ते देशबांधव! कुठे आहेत ते? आणि हा देश! हा माझा देश! वैराण! निर्मनुष्य!

—अहो हा माझा देश नव्हे! ही विद्रूपता माझ्या देशाची नव्हे! ही ओसाडी, ही पडझड, ही वन्यावस्था, हे तीव्र वायुमान, हे माझ्या सुंदर मातृदेशाचे नव्हे! हा शापित भूखंड माझा? सुंदर नगरीचा, सुर संस्कृतीचा, सफलतेचा व वना-उपवनांचा भारत कुठे आहे? काळजिव्हेने ते सारेच चाटून टाकले? ती संस्कृतीची लकाकी, ते तेज, रूप, ती दिव्याकृती! तर मग ह्यावरच मी प्रेम केले होते? ह्यानेच मला बद्ध केले होते? ह्या नश्वरतेने? ह्या संकीर्णतेने? ह्याच्याच सुखाचा मला ध्यास लागला होता? ह्याच्याच रूपाचा? माझे लहान मातीचे घर मी सोडले आणि या मातीच्या मोठ्या घरात मी गुंतलो. माझ्या मातीच्या देहाचा लोभ मी सोडला आणि मातीवर नाचणाऱ्या या मातीच्याच अनेक पुतळ्यांच्या लोभात मी अडकलो. हीच विशालता? ह्याच मोहाने मला घेरले? ह्या मायेने? भौगोलिक मर्यादांनी बांधलेल्या ह्या मृण्मय मानचित्राने? की जे मानचित्रही अमर नाही, अभंग नाही, स्थिर नाही, तर जे फोडले, कुरतडले, भक्षिले गेले! पाण्याने जे बुडविले, थंडीने गारठले व उष्णतेने जे दग्ध केले! त्यानेच मला गुंतवून ठेवले होते काय?

...भूखंडासारखा एक भूखंड! केवळ एक क्षण! आणि त्याचाही एक अंश! त्याचे अशाश्वत रूप, अशाश्वत अस्तित्व! त्याने मला कुंठित करून ठेविले होते–अगदी इथेही! जे इतके नगण्य, इतके नश्वर, इतके मर्यादित व इतके नाशिवंत आहे, त्याने! होय, होय अखेर ती भावना, ती कल्पना, ती विशालताही मर्यादितच आहे! येथून पाहिल्यावर,येथे आल्यावर, विश्वाच्या मानदंडाने मोजल्यावर! तो प्रकाश प्रकाश नव्हता, ते प्रेम प्रेम नव्हते,ते ज्ञान ज्ञान नव्हते, ते सौंदर्य सुंदर नव्हते, ती शाश्वतता स्थिर नव्हती! आणि तेजस्वरूपाची,ज्ञानस्वरूपाची, सौंदर्यस्वरूपाची, शांतिस्वरूपाची दिशा धरून उड्डाणशील झालेल्या मला त्या मोहतंतूनी येथेही अवरुद्ध केले काय? ...पाशाची जाणीव जीवात्म्याला झाली व पाश तुटले! पुनश्च मोक्षाचे द्वार उघडले! जाणीव-जाणीव! अंतिमाची जाणीव! व अनंताशी एकतानता, विश्वात्म्याची सरूपता! सायुज्य!... मोक्ष...मुक्ती!

...निळ्या, तांबड्या, जांभळ्या, धूसर प्रकाशाचे झोत, गृहगोलांच्या उजळत्या चंद्रज्योती, त्यांच्या फेर धरणाऱ्या मर्मर संगीताचे सर्वव्यापी सूर, आकाशगंगेत फुलणारे तारकापुष्पांचे ताटवे. दिव्य सौरभ, दिव्य तेज! जीवात्म्यास झालेली जाणीव! ज्या क्षणी त्यास ती नवी जाणीव झाली, त्या क्षणीच त्याची स्थूलता गळाली, तंतुपाश तुटले, तो परिपक्व झाला, मुक्त झाला, विश्वात्म्यात मिळून गेला!

बारा

# कुत्रे

**बी. रघुनाथ**

जून महिना संपत आला होता अन् आभाळ मोठे तऱ्हेवाईक होत चालले होते. केव्हा ढग अतिशय गच्च भरून येत होते. जणू माणसांचा कोंडमारा करण्याची त्यांची पैज लागत होती. वाऱ्याचा उडता धिंगाणा सुरू झाला की, चांगल्या घरांचीदेखील छते उडून जाणार असे वाटत होते. रपरप पाऊस पडू लागला की, माणसे फसतील इतका रस्त्यावर चिखल होत होता अन् कधी उघाड पडलीच तर वाऱ्याची दातखीळ बसून सूर्य पृथ्वीची लाही करून टाकणार असे वाटत होते.

या लहरी वातावरणाची दुपारी तर अगदी पराकाष्ठा होई. दाराला वाळ्याचा जुनाट फाटका पडदा लावून ऑफिसरूममध्ये बसलेल्या शेखसाहेबांना दुपार तर खायला उठली आहे असे वाटे. दुपारच काय, सबंध दिवस ते मोठ्या कष्टाने काढीत होते अन् रात्र तर त्यांना अतिशय जड जात होती. कस्टमखात्यात मध्यम दर्जाचे ते अधिकारी होते. पगार जाडा नसला तरी हुकमत चांगली होती. व्यापारी लोकांवर वजन बसत चालल्यामुळे गल्ला आणि कपडा यांत किफायत होत होती. उधारीचा काहीच प्रश्न नव्हता. असला तरी ती मागण्याची कोणाची छाती नव्हती, अन् द्यायला तरी कोण तयार होता?

सह्यांसाठी टेबलावर पडलेला कागदांचा ढिगारा अन् बाहेरची ती अप्रसन्न हवा, दोन्ही गोष्टी त्यांना नकोशा होत्या. मुंबईहून अथवा इतर ठिकाणाहून आलेल्या मालाच्या निकालासाठी, जवळ एखादा व्यापारी असला तर बीजक-बुकावर नाखुषीने सही करता करता शेखसाहेब म्हणायचे,

"उफ। काय गलतान हवा पडली आहे आज। अन् तुम्ही, 'बेपारी लोग!' आम्हाला कधी सुखानं 'तनखा' खाऊ द्याल तर शपथ।"

वर्षातला कोणताच ऋतू शेखसाहेबांना मानवत नाही, अशी तेथल्या स्टाफची अन् व्यापाऱ्यांची समजूत झाली होती. ऐन हिवाळ्यात शेखसाहेब बदलून एकटेच ह्या गावी आले होते. अंगावर चांगला जाडजूड रग घेऊनही हिवाच्या एखाद्या बारीक फवाऱ्याने ते कुडकुडत अन् कुरकुरत. अशा भयंकर थंडीत गावातली माणसे कशी जगत असतील

याचे त्यांना आश्चर्य वाटत होते. गावात सिनेमा नव्हता, सडका अरुंद आणि गचाळ होत्या. एवढेच काय, सबंध गावाची रचनाच त्यांच्या मनाजोगती नव्हती! हिवाळ्यानंतर उन्हाळा आला. शेरवानीच्या खिशात ठेवलेल्या, डोके आणि बूट पुसायच्या मळकट फडक्याने वारा घेत अन "हुश उउउ" करीत शेखसाहेब गुरकत होते,

"माशाल्ला. काय कहरी ऊन हे." अन् गावात पाण्याची तरी ही बोंबाबोंब. मधून मधून वळवाच्या सरी येत. हवेत थोडासा गारठा येई. पण पहिल्या एकदोन सरींनी रेकॉर्ड रूमचे छत गळू लागले होते. शेखसाहेब एकदम चवताळून म्हणाले,

"हं उ. ही 'तामिरात' ची (पी.डब्लू.डी.ची) कामं अशीच गचाळ अन् गळकी. सरकारी खजिन्यावर बार आहे नुसता. यापेक्षा हवेत बांधलेले बंगले तरी अधिक 'पुख्ता' (टिकाऊ) होतील."

या वाक्यावर एखाद्याला हसायची लहर आली तरी शेखसाहेब असा काही गंभीर चेहरा करीत की, जणू संपूर्ण सृष्टीच्या घटनेत कुठे तरी बिघाड झाला आहे अन् तो शेखसाहेबांना निश्चित कळून चुकला आहे. अशातच जवळच्या खुजातले पाणी पिताना अन् खिशातला जस्ती डब्बीतली पट्टी खाताना वाटला तर शेखसाहेबांना थोडा आराम वाटायचा.

या विरुद्ध, 'ब्र' न काढणारी एक व्यक्ती होती अन् ती म्हणजे लैला. कस्टमखात्यातच तिला बारा रुपये सरकारी तनखा मिळत होता. दोन जाणाऱ्या अन् दोन येणाऱ्या गाड्यांतील स्त्रीउतारूंचे सामान तपासण्याची तिची नित्याची कामगिरी होती. स्त्रीउतारू घेऊन येणारे तांगेवाले आपला तांगा नेमका तिच्यापुढे आणून उभा करीत अन् तपासणीच्या कटकटीतून लवकर सुटका व्हावी म्हणून मोठ्या अजिजीने म्हणत,

"लैलाबी। पहिले इधर देखो ना।"

सामान तपासून झाले की, लैलादेखील मोठ्या झोकात उत्तर देत होती,

"हां चलो। बढाव।"

आसपासच्या सर्व बऱ्यावाईट गोष्टींशी चटकन जुळते घेता येईल अशी तिची वृत्ती होती. भर दुपारी दुःसह उकाड्यात तिला गाढ झोप येत होती. धोधो पाऊस पडू लागला की, आपल्या क्वार्टर्सच्या आखुड आणि अरुंद व्हरांड्यात खांबाला टेकून ती उभी राहत होती. पावसाचे टपोरे थेंब आत्मसमर्पणाच्या अनावर आवेगाने तिच्या अंगावर झेप घेत होते. जीवनधारांचा तो शीतल स्पर्श झाला की, पाण्यात डुंबून पंख फडाडणाऱ्या पाखरासारखे—आपले सपुलक अंग आनंदातिशयाने जागच्याजागी ती चळचळवीत होती. तो पाऊस होता, की एखाद्या प्रणयनिर्धर हृदयाच्या स्वयंप्रेरित संजीवक चुंबनांचे आकर्षण होते? ती कधी ड्यूटीवर असली की, वाऱ्यावर पळत जाणाऱ्या ढगांची गंमत पाहताना तिला भान राहत नव्हते. पदर उनाड वाऱ्यात पोहत सुटत होता. तिच्या उचंबळून येणाऱ्या अंतःकरणाची ती साक्ष होती. खाकी पोषाख घालून तिच्याजवळ उभे असलेले तिचे सहकारी किंचित निरस्तरीय झालेल्या तिच्या ठिपक्याच्या फुगीर चोळीकडे पाहत

होते ते तिच्या लक्षात आले की, ती आपला पदर सावरीत होती अन् त्यांच्या मिस्कील दृष्टीचा अन् फिदीफिदी हसण्याचा अर्थ उलगडताच स्वतःशी म्हणत होती,

"कुत्रे आहेत मेले."

कादर, हमाम इत्यादिकांची माणसात 'जिम्मा' करायची तिची तयारी नव्हती. सभोवतालच्या प्रत्येक वस्तूकडे पाहण्यात तिच्या आणि त्यांच्या दृष्टीत केवढे अंतर होतं. एक सामाजिक संकेत म्हणून तोंडावर बुरखा ओढून हातांत अन् पायांत दागिन्यांचे लंगर वाहणाऱ्या एखाद्या तकतकीत रंगाच्या मारवाडणीकडे अथवा डोळ्यांत भरणाऱ्या अशाच एखाद्या स्त्रीकडे ते अशा काही नजरेने पाहत होते की, जणू आसपास माणसे नसती तर त्यांनी त्या नवख्या स्त्रीला चटकन खाऊन टाकले असते. उलट, लैलाला वाटत होते, किती भाग्यवती या स्त्रिया. आपल्या सहकाऱ्यांच्या कठोर दृष्टीचा या नाजूक सौंदर्यावर एखादा चरा तर पडणार नाही, या भयानेच की काय, अशा स्त्रियांना "कुठून आला आहात?" असा एखादा जुजबी प्रश्न विचारून ती सोडून देत होती.

लैलाचा धर्म अथवा संस्कृती कोणती हे ठरविणे कठीण होते. मुस्लिम संस्कृतीच्या बाह्य आचारविचारांशी ज्यांचे लवकर जुळेल अशा सर्व धर्मांचे तिजवर संस्कार झाले असावे. तिचे नाव यावनी होते, ती उर्दू सफाईने बोलत होती, पण बाटगे आणि बहिष्कृत ज्या रीतीने वागविले जातात त्याच पद्धतीने बहुतेक ठळक धर्म तिला वागवीत आले होते. पण धर्माशी अथवा संस्कृतीशी तिला काय करायचे होते? हिंदूंचा सण आला की, सुग्रास भोजनाने सुस्मित होऊन नव्या वस्त्राभरणांत मिरवणाऱ्या हिंदू स्त्रीपुरुषांकडे ती औत्सुक्याने पाहत होती. रमजान आणि बकरीईदला जे करायला पाहिजे ते ती करीत होती. नाताळ आला की, गावातल्या एकदोन ख्रिस्ती कुटुंबांकडे जाऊन राहावयाची तिची तयारी होती. गावात एखादा उरूस भरला की, ठेवणीतले झगमगीत तलम पातळ नेसून लोकांच्या गर्दीतून हिंडून येत होती, अन् रात्री सुखाने काठोकाठ भरलेली स्वप्ने पाहत होती.

तिच्या घराला चिकटून तिच्या सहकाऱ्यांचे क्वार्टर्स होते. ती निरुंद आणि निष्प्रभ खुराडी सालंकृत संसारी जीवनाने ओतप्रोत भरलेली होती. घरांत मुले गलबलत होती, गृहिणींच्या बांगड्या किणकिणत होत्या. या सौंदर्याला कर्त्या पुरुषांच्या अस्तित्वाने पूर्णता आली होती. शेजारच्या संसारांचा लैलाला हेवा वाटत होता. अंगावर मुलेबाळे वागवणाऱ्या त्या बायकांचे भाग्य तिला हुरहुरवीत होते. गर्भारपणात तर एखाद्या विश्वजननीच्या उदात्त सौंदर्याने त्या झळकत आहेत असे तिला वाटे. एखादी माता, मुखावर काळे रुंद वर्तुळ पडलेला आपला भारावलेला स्तन मांडीवरल्या मुलाच्या मुखात देताना दिसली की क्षणभर मुग्ध होऊन ती पाहत राही. सांसारिक स्वप्ने अन् सांसारिक आकांक्षा यांत प्रत्येक स्त्री तिला गढलेली दिसत होती. सामसूम झाल्यावर शेजारच्या घरातली मियाबिबींची कुजबूज ऐकू आली की, एकाकी अंथरुणावर पडलेल्या लैलाचे जोरजोराने ऊर उडावे. रात्री एकमेकांच्या कुशीत बिलगून निजणाऱ्या स्त्री-पुरुषांच्या प्रचंड गराड्यात तिला मात्र

तिचा मजनू कुठेच दिसत नव्हता. तो जवळ येत नव्हता. तिची प्रेमयाचना करीत नव्हता. विरहाच्या रात्री अकस्मात येऊन तिला दिलासा द्यावयाची त्याची तयारी नव्हती. निदान एकदा तरी त्याने तिच्याकडे डोळे भरून पाहायला पाहिजे होते. काय तिच्या उरात मोडलेल्या काट्याची त्याला कल्पना नव्हती? आपले रिकामे अन् धडधडते ऊर घेऊन विशाल व निष्प्रकाश अंतराळात उबदार श्वसनाची ती चाहूल घेत होती।

तिचा काल्पनिक मजनूच काय पण तिच्या आसपासची माणसे तिच्याकडे चांगल्या दृष्टीने पाहायला तयार नव्हती. ती अतिशय कुरूप होती अन् तिचा एक डोळा जगावर कायमचा  मिटलेला होता. योग्य साथीवाचून दुसऱ्या डोळ्याची तशीच व्याकूळ अवस्था दिसत होती. अप्रतिम सुंदर स्त्रिया ज्याने निर्माण केल्या त्या विधात्याजवळ लैलाला घडविताना चांगल्या रंगाचे कटोरे काय उपडे पडले होते, की त्याच्या डोळ्यापुढे अंधारी आली होती. उजाड घरात खंत करीत बसलेल्या जवहिऱ्यासारखे तिचे कुरूप यौवन. पोशाखादी बाह्य प्रसाधने करूनही लोकांच्या नजरा खेचून घेण्याचे सामर्थ्य तिच्यात नव्हते.

ती वयात आली त्यावेळी इस्माईल नावाच्या एका शाळाखात्यातल्या चपराशावर तिचे प्रेम जडले. त्याची मिठी तिला सुखावह वाटू लागली. त्याच्याबरोबर ती गावात फिरू लागली. त्याची वाट पाहू लागली अन् तो नेईल त्या मार्गाने ती जाऊ लागली. शादीच्या आणाभाका होतात न होतात तोच इस्माईलची दुसऱ्या मुलीशी शादी ठरली. लैलाने जाब विचारताच तिला झिडकारून तो म्हणाला,

"मी खानदानी माणूस आहे. तुझ्यासारख्या बाटगी (?) शी लग्न करायला मला काही जातकूळ आहे की नाही? अन् अशी 'बदसूरत बला' घेऊन मी करू तरी काय?"

बदसूरत बला! लैलाला हा आघात मर्मांतक वाटला. ती खूप रडली अन् लौकरच डॅनियल नावाच्या एका ख्रिश्चन माणसाशी तिचे सूत जुळले. तो बेफाम पीत होता अन् तिजवर आपले मनस्वी प्रेम आहे असे दर्शवीत असल्यामुळे लैलाला धन्य वाटत होते. तो पिऊन आला की कधीकधी त्याचा मार खायला ती कचरत नव्हती. उलट, एखाद्या दक्ष गृहिणीसारखी रात्रभर त्याची काळजी घेत होती. येशू ख्रिस्त अथवा तिची विशिष्ट (?) धर्मबंधने त्यांच्या विवाहाआड येणे शक्य नव्हते. तो अतिशय कर्जबाजारी आहे याची तिला काळजी नव्हती, पण अखेर, तो आपल्या एका म्हाताऱ्या हपीसराकडे तिला पोचवणार असे कळताच तिच्यातले नीतिमान स्त्रीत्व एकदम जागे झाले. तिने घर आणि गाव सोडले अन् कस्टमखात्यात ती नोकरी करू लागली.

या गावी आल्यावर कादर तिला आवडू लागला. त्याची शादी झाली असली तरी जगात एका पुरुषाला दोन बायका नसतात असे थोडेच आहे? अन् असे संसार काय सुखी होत नाहीत? दर सहामाहीप्रमाणे गाडीच्या वेळा बदलल्या. सकाळच्या तीनच्या गाडीसाठी लैलाला अन् तिच्या सहकाऱ्यांना ऑफिसच्या व्हरांड्यात येऊन झोपणे भाग

पडू लागले. कादरला लौकर झोप येत नव्हती. तो एकामागून एक विड्या फुंकीत होता अन् पत्र्यावर पत्रा घासावा तसा विचित्र आवाजात गझल गात होता,

"खिजाने आकर चमनको बरबाद कर दिया उउउ।"

(शिशिराने माझी सारी बाग उद्ध्वस्त करून टाकली.)

गाडीच्या अशा भलत्याच वेळा ठेवल्याबद्दल रेल्वेकंपनीला तो शिव्यांचा आहेर करीत होता अन् पुढच्या जन्मात अशी त्रासदायक नोकरी आपण करणार नाही, असे निश्चयाच्या स्वरात स्वतःशीच म्हणत होता. डोळे मिटले तरी तो आपल्याकडे प्रेमातुर दृष्टीने पाहत आहे, अन् आपल्या स्पर्शातुर श्यामल देहावरून त्याचा हात लाडिकपणाने फिरतो आहे असे लैलाला उगीचच्या उगीच वाटत होते. तो खरोखरच तिच्याजवळ आला तेव्हा प्रथम स्वतःच्या डोळ्यांवर तिचा विश्वास बसेना. रात्रीच्या गडद अंधाराने तिच्या कुरूपतेची लज्जा राखली. गारठलेल्या फर्शीवर असतानाच त्याच्या खाकी ड्रेसच्या जाड पितळी गुंड्या तिला रुतत होत्या. काही तरी तृप्तीची विलक्षण बधिरता चढत चाललेल्या तिच्या देहाला त्याचे काहीच वाटत नव्हते. पण रात्री ज्याने प्रेमभराने तिला कवटाळले होते, तो कादर सकाळी तिजकडे पाहायला तयार नव्हता. ती आपलेपणाने जवळ जाऊन बोलू लागताच तो एकदम खेकसला,

"चल दूर हट साली। दलिंदर कहींकी। सैतान।"

तिच्या आत्मसमर्पणाची त्याने ही किंमत केली होती. अन् मोठा विजयाचा आव आणून आपल्या सहकाऱ्यांच्या कानात काहीसे बोलत होता. संयोगकालची कादरची ती आतुरता अन् आताचा त्याचा तिरस्कार–तिचा अंतःकरणाचा नुसता दाह होऊन गेला होता. तो जवळ येऊन इतर सहकाऱ्यांदेखत तिची काही चेष्टा करणार असे दिसताच क्रोधातिशयाने ती म्हणाली होती,

"चल, कुतरड्या–"

शेखसाहेब आले त्याच्या दुसऱ्या का तिसऱ्या दिवशी त्यांनी तिजकडे निरखून पाहिले. त्यांचे केस पिकत चालले होते अन् आयुष्याच्या महापुराच्या खुणा गालांवर उठत चालल्या होत्या. पण वयस्कांच्या दृष्टीत जो उदार सहानुभव दिसतो तो त्यांच्या दृष्टीत तिला दिसून येऊ लागला. जणू असुंदरांतही त्यांना अनेक सौंदर्ये साठलेली दिसत होती. त्यांचा चिडखोर स्वभाव लैलापुढे नरमाई धारण करू लागला. त्यांचे पाहत राहणे तिला आवडू लागले. ते केव्हा आणि कोणत्या वेळी पाहतील याचा नियम नाही म्हणून ती कपड्यांची निगा घेऊ लागली व नेहमी त्यांच्या डोळ्यांपुढून सरकण्याची खटपट करू लागली. हळूहळू चमत्कारही असे होऊ लागले की, लैलानेच भरलेल्या खुजातले पाणी शेखसाहेबांना गोड आणि गार वाटू लागले. तिनेच त्यांच्या पट्ट्यांची डबी भरून द्यावी असा नियम होऊन बसला. येता येता बाजारहाट तिच्याकडे आला. बाजारच्या दिवशी हातात सौद्याची बुट्टी घेऊन अन् पातळाचा खूप लांब पदर काढून ती बाजारात जाऊ लागली. शेखसाहेबांसाठी गोस्त, मिरची, आद्रक, पियाज अन् लसूण इत्यादीची खरेदी

अतिशय किफायतीने होऊ लागली. उरलेले पैसे शेखसाहेबांना ती परत करू लागली अन् शेखसाहेब खूष आहेत असे दिसताच मनाशी नवनव्या कल्पना रचू लागली.

एकदा ती नटूनथटून बाहेर पडली असता कादर तिला म्हणाला,

"क्यूं? बडी बंठनके जा रही हो. शादी आहे की काय? पण सांभाळ म्हातारा..."

"चूप. शादी नाही तर निका असेल. तू कोण विचारणार?"

अन् मग तिच्या चालण्यात कमालीची ऐट येऊ लागली. जणू खरोखरच शेखसाहेबांनी तिला मागणी घातली होती. शेखसाहेब तिच्या पगारवाढीसाठी वरच्या हपीसला पुनः पुन्हा लिहू लागले. पगाराचा दिवस आला की मुद्दाम लैलाला हाक मारून,

"तनखा चाहती हो ना?" असे विचारू लागले. तो आला की, तिच्या पुढ्यात तिचे 'पे बिल' ठेवून शाईने भरविलेला तिचा अंगठा त्यावर हवा त्या ठिकाणी घेऊन तो बराच वेळ धरून ठेवू लागले, अन् ते सारे लैलाला अतिशय सुखावह वाटू लागले.

एकदा असाच दणकेबाज पाऊस आला. कचेरी अन क्कार्टर्स गळू लागली. अकस्मात लैलाच्या घराची पाठभिंत कोसळली. आधीच तामिरातखात्यावर संतापणारे शेखसाहेब लैलाचे घर पडल्यावर तर अधिकच संतापले, पण 'मौत' च्या जबड्यातून लैला वाचली, याचे त्यांनी समाधान व्यक्त केले. लैलाला त्यांनी आपल्या घरात झोपण्यासाठी बोलावले अन् पावसात भिजलेल्या मातीचा मस्त वास वाहून आणणाऱ्या मंद गारव्यात एकमेकांच्या वक्षांचा त्यांनी आश्रय केला।

उंची नरम अंथरूण यापूर्वी तिच्या देहाला लागले नव्हते. एखाद्या ऐश्वर्यशाली राजघराण्यातच जिच्या अंतःशक्तीचा विकास झाला असता, ती केवळ कुरूपतेमुळे कामोत्सुकांच्या व क्षणैक तृप्तीचा अन् नंतर चिरंतन तिरस्काराचा विषय झाली होती. जीवनाधार म्हणून तिने ज्यांच्यावर निस्सीम प्रेम करण्याची तयारी दाखविली होती ते भुकेच्या वेळी वाटेल ते पदार्थ जवळ करणारे कुत्रेच नव्हते तर काय? पण शेखसाहेब–

तिला त्यांच्या प्रेमात सरलता वाटली. तिचे अंतःकरण त्यांनी ओळखले, प्रणयानुनयाच्या उत्कटावस्थेत देखील शेखसाहेब तिला म्हणत, "बडी खूबसूरत हो लैला तुम!"

खूबसूरत. आपण सुंदर नसतानाही त्यांनी आपल्या कुरूपतेची स्तुती करावी याचे तिला किंचित आश्चर्य वाटले, पण ज्या आवाजात हे लाघवी शब्द उच्चारले गेले होते, त्यावरून तिची कुरूपता त्यांना बोचत नव्हती हे तर अगदी सिद्धच झाले होते आणि हे कळून लैलाचा आनंद दुथडी होत होता.

लैला आज रुसून आपल्या खोलीत झोपली होती. दाराची कडी केव्हा वाजते आणि शेखसाहेब आपली याचना करण्यासाठी केव्हा येतात, याकडे तिचे लक्ष लागले होते. काही दिवसांपूर्वी ती अशीच रुसून बसली होती अन् शेखसाहेबांनी येऊन तिचा रुसवा काढला होता. उत्कट प्रेमाशिवाय या गोष्टी काय संभवनीय होत्या? ते येणार, तिची मनधरणी करणार, "हे काय बरं असं लैला" असे मोठ्या गोड आवाजात ते म्हणणार, अन् नंतर ती हसत हसत जाणार, हे अगदी ठरून गेले होते. आजवर त्यांनी तिचे शब्द

फुलासारखे झेलले होते. केवळ तिची इच्छा म्हणून घरातल्या बुढ्या भटाऱ्याला नोकरीवरून दूर करायला त्यांनी कमी केले नव्हते. बारा वाजले, दोन वाजले; सकाळची तीनची गाडीदेखील तिने पाहिली नाही. सकाळ झाली, तेव्हा जास्त वेळ ताणून धरून आपण फार मोठी चूक केली, असे तिला वाटले. अन् शेवटी आहे तरी काय हे अजमावण्यासाठी ती शेखसाहेबांच्या घरात आली.

घरात मुलाबाळांची ये-जा तिने पाहिली. काढून टाकलेला तो बुढ्ढा भटारी चमत्कारिक अन् मोठ्या कुत्सित नजरेने तिजकडे पाहत आत निघून गेला. जवळच्या खोलीत शेखसाहेब गंभीर चर्या करून बसले होते. तिची चाहूल लागूनही ते आज तिच्याकडे पाहावयास तयार नव्हते. जावे अन् त्यांच्या गळ्याला मिठी मारून "रागावलात?" असे त्यांना विचारावे, असे तिला वाटले, ती त्यांच्या खोलीत शिरणार इतक्यात तो बुढ्ढा भटारी अन् एक प्रौढ स्त्री तिथे आली. लैलाकडे पाहून ती एकदम चवताळून म्हणाली,

"ए बदचलन, माझ्या संसारावर आजवर निखारे ठेवलेस ते पुरे नाही का झाले? मेल्या पुरुषांनी तर लाजाच सोडल्या. पण निदान तू तरी स्वतःची 'इस्मत' (अब्रू) सांभाळायला हवी होतीस. चल हो बाहेर. पुन्हा या घरात कदम ठेवलास तर नाक छाटून घेईन?"

शेखसाहेबांचा शादीचा जनाना होता तो. लैलाने तसा अवस्थेत शेखसाहेबांकडे पाहिले. त्यांची दातखीळ बसली होती की कान बधिर झाले होते? लैलाबद्दल त्यांना काय काहीच वाटत नव्हते? एका रात्रीत साऱ्या गोष्टींचा त्यांना विसर पडला होता. नाजूक देहाच्या, लीलेने चिंधड्या करणाऱ्या माणसाची क्रूरता त्यांच्या आताच्या गांभीर्यात नव्हती.

तिच्या एकाच उघड्या, विस्फारलेल्या डोळ्यात क्रोधाचा वन्ही इतक्या जोराने उफाळला की शेखसाहेबांना जणू ती भस्म करून टाकणार होती. अखेर पातळाचा पदर खूप जोराने कुस्कारीत ती बाहेर पडली. तिच्या थरथरत्या ओठावरून त्वेषाने शब्द उमटले,

"कुतरडा मेला!"

तेरा

# घररिघी

महादेवशास्त्री जोशी

अश्विनाचा महिना होता. दिवसाचा चौथा प्रहर होता. एकाएकी आकाश मेघांनी भरून आलं होतं. सूर्य झाकोळला होता. दिशा अंधारून आक्रसल्या होत्या. शरदातला वळिवाचा पाऊस गडगडत, तडतडत पृथ्वीवर उतरला होता. पिकून पिवळी व्हायला आलेली समोरची भातशेतं अर्ध्या तासाच्या झोडपण्यात त्यानं आडवी घातली होती. रानातली गुरं शेपट्या उभारून घरांकडे येऊ लागली होती. मांडवावरचे दोडक्यापडवळांचे वेल खाली आले होते. अंगणाबाहेर सर्वत्र वाढलेल्या तेरड्याची अवस्था दयनीय झाली होती. जिकडून तिकडून पावसाचे फेसाळ ओहोळ उताराकडे धावत होते. बाहेर जाणं अशक्य असल्यामुळं मी पडवीवर रिकामा बसलो होतो आणि क्वचित सरळ, तर क्वचित तिरक्या अशा पर्जन्यधारांचं नृत्य पाहत राहिलो होतो. पाहता पाहता माझी तंद्री लागली होती.

"ऐकलंत का? जरा मागील दारी या. कोणाची तरी एक मुलगी भिंतोडीला येऊन उभी राहिली आहे." बायकोच्या या आकस्मिक शब्दांनी माझी तंद्री भंगली. मी मान वळवून विचारलं,

"मुलगी? कोणाची?"

"माझ्या ओळखीची नाही; पण कोणी तरी ब्राह्मणाचीच आहे. तुम्ही येऊन पाहा!"

बायको पुढं अन् मी मागं, अशी दोघंहि परसदारी गेलो. पाहतो तर एक मुलगी भिंतोडीला चिकटून उभी आहे खरी. तिच्यासमोर कौलारू पाख्याच्या पागोळ्या हारीनं धार धरून गळत आहेत आणि तिथल्या शेवाळलेल्या अंगणात जलधारा आणि बुडबुडे यांचा नटनाच चाललेला आहे.

आम्ही दोघांनी आमचे चार डोळे तिच्यावर रोखले. तिनं आपल्या बदामी डोळ्यांनी आमचा वेध घेतला. सकृद्दर्शनी तीही निःशब्द अन् आम्हीही निःशब्द! बाहेर पाण्याचा पूर अन् आमच्या अंतरांत आश्चर्याचा पूर. ती मुलगी चौदा-पंधरा वर्षांची असावी, असं तिच्या आंगठशावरून दिसत होतं. कसलंही आसरण न घेता पडत्या पावसातून ती आली होती आणि त्यामुळंच नखशिखान्त चिंब भिजली होती. तिची नेसलेली जीर्णशी साडी तिच्या सावळ्या अंगाला चिकटून बसली होती आणि केशबंधातून गळणारी पाण्याची धार पागोळीसारखी तिच्या नितंबांवर पडत होती. पुढच्या बाजूच्या बटा तिच्या गालांवर

नि गळ्यावर अभिषेक करीत होत्या. तिच्या चोळीची गाठ पक्की बसलेली होती. तिथल्या खोलगट भागात गळ्यावरून उतरलेलं पाणी क्षणभर घोटाळत होतं. आणि मग तिच्या कोवळ्या तकतकीत पोटावरून खालच्या निऱ्यांत मुरत होतं. कुळागराच्या बाजूनं केळी-पोफळींना कापवीत पश्चिमवारा नाचत-कुदत आला की, त्याच्या दाबानं पागोळ्या आतल्या अंगाला वळून तिच्यावर रोख धरीत होत्या आणि त्या सोसाट्यानं तिची काया पुनः पुन्हा शिर्‌शिर् शहारत होती. आम्ही तिच्याकडे एकटक पाहत होतो; पण ती आमच्या गावची कोणाची नसल्यामुळं बायकोलाही तिची ओळख पटली नाही आणि मला तर नाहीच नाही!

"अग, कुणाची तू? आलीस कुठून?" बायकोनं तिला प्रश्न केला. त्यासरशी तिनं आमच्यावरची दृष्टी आवरून घेतली आणि पायांच्या नखांवर जडवली. तिनं दुसरी कसलीही हालचाल केली नाही. 'मी कुडकुडते, मला घरात घ्या!' अशी उत्कंठाही दर्शविली नाही. बायको पुनः पुन्हा तिला तोच प्रश्न विचारायला लागली तेव्हा मी तिला म्हटलं,

' तू तिला आधी घरात घे. ती गारठली आहे अन् बावरलीहि असेल!"

"चल ग, घरात ये!" म्हणताच ती मुकाट्यानं आत आली. वासरीत उभी राहिली तर तिथली जमीन भिजून पाणी वाहू लागलं. बायकोनं एक जुनं लुगडं आणून तिला नेसायला दिलं. खुंटीवरची चोळी ओढून तिच्या हाती दिली; पण तिचे केस कोरडे झाल्यावाचून तिला कोरडं नेसायला देण्यात काहीच अर्थ नव्हता. बायकोनं दांडीवरचा एक चुरचुरीत पंचा तिच्या अंगावर टाकून तिला केस कोरडे करायला सांगितले. तिने सांगितल्याप्रमाणं सगळं मुकाट्यानं केलं. एवढ्या अवधीत तिची एकदाही वाचा उमटली नाही. 'तिला घोटभर चहा करून पाज अन् मग सगळी चौकशी कर!' म्हणून मी बायकोला म्हटलं अन् पुन्हा पडवीवर येऊन बसलो. ती मुलगी माझ्या डोळ्यांआड झाली; पण तिच्याविषयीचा विचार मात्र मनाआड झाला नाही.

एवढ्या अवधीत पाऊस ओसरला. आकाश निवळलं. मांडवावरच्या दोडकीच्या फुलांनी पावसाला नमविलेल्या माना वर उचलल्या. मी बाहेर पडून जरा शेतावर नजर टाकावी असा विचार करू लागलो. एखाद्या कुणग्यात जर खूपच पाणी साठलं असेल तर ते निचरून जाण्यासाठी मेरांना खांवटी करणं भाग होतं; पण एवढ्यात दोघे गृहस्थ आमच्या पडवीवर चढले. त्यांपैकी एक होता आमचाच गावकरी अन् दुसरा शेजारच्याच गावचा गजा जोशी. त्याने बसायच्या पूर्वीच मला प्रश्न केला,

"इथं एखादी मुलगी आहे का! सुमारे चौदापंधरा वर्षांची, सावळ्या रंगाची, आखूड नाकाची, बदामी डोळ्यांची अन् जुनेर नेसलेली..."

"अरे हो! पण आधी बैस तर खरा. मुलगी आली आहे. घरात बसली आहे.मघाच्या पावसात भिजत कुडकुडत आली अन् परसदारी भिंतोडीला उभी राहिली. विचारलं तर बोलत नाही, कोणाची म्हटलं तर सांगत नाही."

"तुला तो नाचणवाडीचा शिवराम भाटीकर ठाऊक आहे का?"

"आहे माहीत. गेल्या महिन्यातच आला होता आमच्याकडे. भात विकायचे आहे का विचारीत होता."

"त्याचीच मुलगी. नाव चिमा. तो रांडेचा एक अर्बुज तर बायको सात अर्बुज. खंडीभर पोरं मात्र झाली आहेत. पोसायची कुवत नाही नि राखायची अक्कल नाही!"

"पण तुला कुठं गवसली ही?"

"कुठं अन् काय! ती एक कथाच आहे. गेले पंधरा दिवस ती घर सोडून वाटेल तिथे भटकते. आज या गावात तर उद्या त्या गावात. दुपारचं जेवण एकाच्या घरी तर वस्ती दुसऱ्याच्या घरी. वयावरची मुलगी अन् बाप खुशाल घोरत पडला आहे!"

"कमाल आहे बुवा पोरीपुढं!" मी म्हटलं.

"ही कसली कमाल? कमाल ती याच्यापुढंच आहे. आज सकाळचीच गोष्ट. मी वाळपईहून परत येत होतो. वेळसईची तर उतरलो, वरचा चढाव चढलो आणि तेथून खालच्या उतारावर नजर टाकली, तर काय? तिथल्या नाल्यावर एक लहानसा पूल आहे. त्याच्या कठड्यावर दोन विशी-पंचविशीतले पोरगे अन् त्या दोघांच्यामध्ये एक मुलगी. ते हसताहेत, खिदळताहेत, त्या मुलीची मस्करी करताहेत. मुलगी हसते, मुरडते अन् त्या पोरांना उत्तेजन देते. असं सगळं दृश्य!"

"मी चाट पडलो ते पाहून. म्हटलं हे काही तरी चावट प्रकरण आहे. ते तिला कुठं तरी फूस लावून नेण्याच्या विचारात होते. तिला काही तरी आमिष दाखवीत होते आणि ती हुरळलेली पोरगी त्यांच्या बेताला मान तुकवण्याच्या बेतात होती असं मला दिसलं. मी झपाझप पावलं टाकीत तो उतार उतरून पुलावर आलो. मला त्यांनी दुरूनच पाहिलं. ते जरा तिच्यापासून बाजूला झाले. मी जवळ जाऊन त्यांना हटकलं,

"काय रे! ही मुलगी कोणाची?"

"माझ्या शब्दांतला तिखटपणा जाणून ते जरा कचरले. त्यांतला एकजण म्हणाला,"आम्हांला काय ठाऊक! रस्त्यानं चालली होती एकटीच. आम्ही तिला विचारीत होतो की, तुला कुठं जायचं आहे? ती म्हणाली की, वाळपईला. आम्ही म्हटलं, एकटी जातेस ती आमच्या सोबतीने चल!"

"अस्सं, अस्सं! इतक्या जवळून सोबत करावी लागते वाटतं?" ते ओशाळलेले दिसले तेव्हा मी त्यांना म्हटलं, "चालू लागा आपल्या रस्त्यानं!!" ते निघाले तर ही चालली की बया त्यांच्या मागून. मी पुढे होऊन तिला अडवली. मी मागे तिला एकदा पाहिली होती; त्यावरून मला ती शिवराम भाटीकराची मुलगी असा अंदाज झाला. तिला विचारून मी तो खरा करून घेतला. 'चाललीस कुठे?' म्हणून दरडावले तर गुळूमुळू. वाटलं की दोन तोंडात वाजवाव्या; पण म्हटलं, पोरगी दुसऱ्याची; आपल्याला काय अधिकार तिला हात लावायचा!

'चल, माझ्याबरोबर' म्हटलं तर प्रथम लागली का कू करायला. मग मात्र तिचं

मनगट पकडावं लागलं. माझे वटारलेले डोळे पाहून मग सरळ निघाली. तिला घरी आणली. जेवायला घातलं; पण एवढ्यानं जबाबदारी कुठं संपते! घरी नेऊन बापाच्या स्वाधीन करावी म्हणजे मोकळा झालो, अशा विचाराने तिला घेऊन निघालो. वाटेत या गोपाळच्या घरी गेलो. त्याला एक निरोप होता तो सांगितला. त्यानं पाळं पुढे केलं म्हणून तंबाकू खाल्ली. आता उठावं म्हणून बाहेर येतो तर अंगणात मुलगी आहे कुठं! माझ्या डोळ्यांतलं काजळ चोरून पसार! म्हटलं, 'चल बाबा माझ्याबरोबर जरासा. या लावसटीला शोधून काढू!' निघायचा विचार करतो एवढ्यात धो धो पाऊस सुरू झाला. दडक ओसरेपर्यंत थांबणंच भाग पडलं. मग निघालो. वाटेत भेटली एक कुळवाडीण. तिने सांगितलं की, एक अनोळखी मुलगी तुमच्या घराच्या दिशेने पळत गेली आहे. म्हणून हा इथे आलो..."

चिमाविषयी मला जिज्ञासा होती ती अपेक्षेच्या बाहेर पूर्ण झाली. वाटलं की मुलगी वाह्यात आहे. हिला कोणी आवरले नाही, वळण लावलं नाही, तर ही पुढे आईबापांच्या नावाला काळोखी लावील आणि स्वतःच्या आयुष्याचीहि नासाडी करून घेईल. मी गोपाळ जोश्याला म्हटलं,

"पुढे काय करणार आता?"

"तिला बाहेर बोलव. मी तिला बापाकडे पोचती करणार आहे. तिच्या बापालाही चार शब्द सुनावणार आहे!"

मी उठलो आणि घरात गेलो. बायकोने चुलीवर चहाचे आधण ठेवले होते अन् चिमा चुलीपुढे हातपाय शेकत बसली होती.

"काय ग! तुझं नाव चिमा ना?"

तिने होकारार्थी मान हालविली.

"तो गोपाळ जोशी बाहेर येऊन बसला आहे. तुला दिवसा उजवडी घरी पोचवायचं म्हणतो. चहा घे अन् बाहेर ये!"

तिने लगेच माझ्याकडून दृष्टी वळवली आणि बायको मोठ्या डब्यातली साखर बारक्या डब्यात काढीत होती तिच्याकडे लावली.

" काकी! माझ्याच्यानं आता उठवत नाही. गारठून हुडहुडी भरली आहे मला. मी आजची रात्र तुमच्याकडे राहाते. उद्या जाईन. हंऽ! राहू ना? राहू ना काकी? उद्या नक्की जाईन!"

हा तिचा पवित्रा अगदीच निराळा होता. तिने आपल्या जातीला कौल लावला होता. 'काकी' म्हटले होते, तोंड वेंगाडले होते. आणखी काय हवे! बायको मला म्हणाली,

"मुलगी कोणाची ते कळलं ना? मग एवढं गयावया करते तर राहू दे आजची रात्र. उद्या नेऊन पोचवा. नाही तर तिच्या बापालाच निरोप धाडा. येईल अन् घेऊन जाईल!"

बायकोनेच तिला आसरा दिल्यावर पुढे काय बोलायचे! मी बाहेर येऊन गोपाळ जोश्याला सांगितले. 'तू जा घरी', मी उद्या पोचवतो तिला. पावसानं गारठली आहे ती.

उठवत नाही म्हणते'. गोपाळ जोशी 'बरे' म्हणून निघून गेला. मी उठून माझ्या कामाला लागलो. गोठ्यात जाऊन गुरांचे ठाकठीक पाहिले. माळ्यावरचा पेंढा उपसून त्यांच्या पुढ्यात थोडासा टाकला. मग पन्हळीवर जाऊन हातपाय धुतले. येताना तिथल्याच गुलबक्षीची फुले तोडून धुपारतीसाठी आणली अन् कातरवेळी घरात येऊन धोतर पांघरून देवापुढे संध्येला बसलो. मुलांनी 'शुभं करोति' सुरू केली आणि एका दमात ती संपवून ती घरात पळाली. बायको चुलीशी बसून स्वैंपाक करीत होती आणि चिमा तिथेच ठाण मांडून बसली होती. दोघींची प्रश्नोत्तरे बसल्या जागेवरून मला ऐकायला येत होती.

"काय ग, तुला भावंडं किती?"

"भावंडं होय! मोजलीच पाहिजेत. थांब हं! मी सर्वांत मोठी. माझ्या मागचा प्रभ्या. त्याच्या मागचा दिनू. त्याच्या मागची गंगा. तिच्या मागचा दामू. दोन वर्षांची सुंद्री अन् सहा महिन्यांची तान्ही गोदी. म्हणजे किती झाली...?"

चिमा हसली आणि तिच्याबरोबर बायकोही. मीही इकडे आचमन घेत होतो तो हात थांबवून हसलो.

"एवढ्या मुलांचं उरकतं बरं ग तुझ्या आईला?"

"अगे काकी! उरकायचं काय? अन् तिला कशाला उरकायला हवं! मला काय खारात का घालायची आहे! चिमे, दामूचं ढुंगण धू. चिमे, सुंद्रीला फिरवून आण. चिमे, गोदीला पिठी घाल. अन् ही? हिला जेवल्यावर उठवत नाही. तिथच हातावर पाणी घालील, गोदीला पदराखाली घेऊन आडवी होईल की डाराडूर. उष्टी तिथंच लोळताहेत. मागील दारातून कावळे आत शिरून पान उस्कटताहेत. असा कारभार सगळा. गावातली लोकं तिला काय म्हणतात सांगू?...डुकरीण!"

"वडिलांना बरं मानवतं हे?"

"अगे,त्या आईचा तो नवरा!"

मी बसलो होतो तिथूनच त्या महामायेला हात जोडले. कार्टी विजापात्र खरी. आईबद्दल प्रेम नाही. बापाबद्दल आदराचा लेश नाही. भावंड मोजायला बोटे घालते. एवढ्यात बायकोच्या पळीतली फोडणी पातेल्यात चुर्र वाजली. क्षणभर थांबलेली तिची रसवंती लगेच सुरू झाली.

"आःऽऽ? किती छान वास आला फोडणीचा! केळ्याची भाजी केली आहेस ना!"

"होय. तुमच्या घरी नाही वाटतं करीत?"

"आमच्या घरी भाज्या 'बोटमुळा' च्या. कुळागारांत केळी होत्या त्या मेल्या. पोफळी मरायला आल्या आहेत. बाप कधी शिंपायला जायचाच नाही. त्याच सदाच आंग किसकिसतं अन् कणकणतं. आम्हांला म्हणतो, 'पोरांनो, चला शिंपून या!' आम्ही पोरं काय शिंपणार आमचं मढं? हा आपला बसला आहे पडवीवर विड्या फुंकीत. समोर ही कोलतांची रास. एक विझलं की दुसरं. गावातले लोक आमच्या तोंडावर म्हणतात की,'गाढवानं सोन्यासारखं ठिकाण आळसानं पाड घातलंन्!"

"अग लोकांनी म्हटलं म्हणून आपण म्हणू नये तसं," बायको तिला सदुपदेश करू लागली.

"नसतं म्हटलं; पण तो आम्हांला वेळी अवेळी बदडतो.त्याला एकच गोष्ट चांगली येते–उठ सोट्या घे पाठ!—"

"ठिकाणात उत्पन्न नाही तर जेवता कशी तुम्ही इतकी माणसं?"

"कुठली जेवतो म्हणतेस तू काकी! आठ आठ दिवस नुसती पेजेवर असतो आम्ही. अशी आग पडते म्हणतेस पोटात! वाटतं की आईलाच चावून खावी. बापालाच उभा गिळावा!"

"शी ग!"

"शी काय! तुला दुसरी अंदरकी बात सांगते. चार आठ दिवसांनी कधीतरी भात शिजतो आमच्या घरात; पण तो आमच्यासाठी नव्हे, आम्हांला नाचण्यांची भाकरी. कधी वऱ्यांचे तांदूळ अन् वर पसाभर तांदूळ घालून केलेलं पातेलंभर आटवल. दुपारी तसं रात्री. आम्हाला झोपवून मग आई भात शिजविते अन् दोघं बसून प्रहर रात्री तो जेवतात. मी सगळं पाहते हे. चांगल्या ढेकरी देत उठतात की मग आढारली एका हांतरुणावर शेजारी शेजारी!"

"चल चावट कुठली. असं बोलू नये!"

"काय झालं त्यात! मला सगळं माहिती आहे. जीव विटून गेला माझा. दिवसभर मी मरमर मरायचं अन् खायचं काय, तर आईच्या गाळी अन् बापाचा मार. पळाले एक दिवस घरातून. गेले पंधरा दिवस मी सारखी भटकते. प्रकृती सुधारली बघ माझी तेवढ्यानेच. जिथे गेले तिथे शिळपाकं का असेना; पण पोटभर जेवायला मिळालं; पण कोणी टिकू देईल तर ना! जो तो म्हणतो, 'घरी चल; आमच्याकडे राहू नको. चल मी तुला पोचवतो!' सगळे मेले मला त्या घराच्या उकिरड्यात नेऊन घालायला बघायचे. काय भीक लागली असती यांना मला चार दिवस जेवायला घातलं असतं तर!"

"लोकांना वाटतं, की तू अशी भटकत राहिलीस तर बिघडून जाशील. आजच सकाळी त्या कुठल्या तरण्याताठ्या पोरांबरोबर चालली होतीस ना?"

"मी कुठे चालले होते? तेच आले माझ्या मागून. मला म्हणाले, 'आम्ही तुला सोबत करतो.' मी म्हटलं, 'बरं झालं.' मला गंमत वाटली त्यांच्याबरोबर जायला! माझी त्यांना कित्ती कित्ती दया वाटली. सगळ्यांनी मला हिडीसफिडीस केलं; पण ते किती गोड बोलले माझ्याशी—"

"अगदी मूर्ख आहेस चिमा तू. शहाणपण मात्र सांगतेस! आज गजा जोशी तुला भेटला नसता तर–अशी कीर्ती करून ठेवलीस तर उद्या कोणी पत्करायचा नाही हो तुला!"

"मग काय करू तर? तू घालतेस मला जेवायला दोन्ही वेळा पोटभर? तुझ्या घरी खूप आहे. भाताचा तटा भरलेला आहे. नाचण्यांच्या मुड्या बांधलेल्या आहेत. शाकभाजीसुद्धा

आहे. या बघ दांडीवर कांद्यांच्या माळा लटकतायत. आमच्याकडे कोणाला झीट आली तर नाकाशी धरायलासुद्धा कांदा मिळायचा नाही. तू घाल मला जेवायला. मग बघ तुझ्या अर्ध्या वचनात वागते. कोणाकडे डोळा उचलून बघितलं तर थोबाडीत मार माझ्या!"

यावर बायको काय बोलणार! चिमाचा सवाल सरळ होता. तिला कोरडा उपदेश नको होता. ती पुढचा पोच धरून बोलत नव्हती. तिची दृष्टी दूरवर जाऊ शकत नव्हती. तिला तात्कालिक रोगांतून तात्कालिक सुटका हवी होती. आतून पेटलेली भूक. वरून आईबापांचा जाच. या दोन्ही आपत्ती तिला सोसता येत नव्हत्या. बापाची सदाची मरगळ ती पाहत होती. आईचा आचरटपणा तिला भोवत होता आणि दोघांचं आपस्वार्थी खोटेपण तिच्या अनुभवाला येत होतं. तिला कोणी मायेचा ओलावा दाखविलेला नव्हता. आपल्या तोंडचा घास काढून तिच्या तोंडी कोणी घातलेला नव्हता. तिला कोणी भक्तिप्रेमाच्या पाशांनी बांधलेलंच नव्हतं. त्यामुळे मुळातच चपळ अवखळ असलेली चिमा त्या पोखरलेल्या, ढासळलेल्या घरातून सटकली होती. मुक्तच होती ती अतिमुक्त झाली होती. तिला त्याबद्दल लाज नव्हती. तिला कोणाची भीड नव्हती. जे पाहिलं,अनुभवलं ते रोखठोक शब्दांत सांगत होती ती.

मी मनात म्हटले, ही मुलगी म्हणजे चूड आहे. आजची वस्ती राहील तेवढी बस्स! सकाळी उठताच मी माझ्या गड्याला तिच्या बापाकडे पाठवला. प्रहर दिवसाच्या सुमाराला बाप आला आणि पडवीवर बसला. त्याचं सगळं दैन्यदारिद्र्य त्याच्या चर्येवर दिसून पडत होतं. त्याचा आळशीपणा, त्याचा आचरटपणा त्याच्या धोतरावर, सदऱ्यावर, डोक्याला टापशीसारखं बांधलेल्या उपरण्यावर, पुटपुटांनी चढला होता. मूर्खपणा आणि अहंकार याचं एक चमत्कारिक मिश्रण त्याच्या डोळ्यांत प्रतीत होत होतं. कपाळपट्टी उंच अन् डोळे खोल, अंगकाठी सडसडीत अन् उंचाडी मान, गोऱ्या तोंडावर सूक्ष्मसे काळसर तांबूस ठिपके, हा त्याचा देहाकार मला अप्रियच वाटला. कदाचित गेल्या रात्री चिमानं त्याचं जे स्वभाववर्णन केलं त्यामुळंही ही अप्रीती निर्माण झाली असेल.

त्या दिवशी आमच्याकडे ललितापंचमीची पूजा होती. ब्राह्मण जेवायला यायचा होता. आमची बायको सकाळीच स्नान करून स्वैंपाकघरात गेली होती. मुगाचं पुरण तयार करून तिनं त्याचे उंडे बनवून ठेवले होते आणि ते ती तांदुळाच्या पातळ पिठात बुडवून तळून काढणार होती. चिमा हे सगळं पाहत होती. तिच्या जिभेला केव्हाच पाणी सुटलं होतं. ते शकुनउंडे तळून निघता निघता मानसिक क्रियेने तिच्या पोटात जात होते. ती स्वैंपाकघरातून हालायला तयार नव्हती. तिच्या नशिबानंच जणू आज आमच्या घरी गोड - धोड होत होतं.

एवढ्यात चिमाने पडवीवर बसलेल्या बापाचं खाकरणं ऐकलं. 'आला काळ!' ती म्हणाली. 'कोण ग?' बायकोने विचारलं. 'माझा बाप!' चिमाचं उत्तर. 'येऊ दे; बरं

झालं' बायकोचं प्रत्युत्तर. 'म्हणजे चिमाची एकदा पीडा जाऊ दे असंच ना?' चिमाचा सवाल. 'हो, तसंच!' बायकोचा त्रासिकपणाचा उद्‌गार.

"काकी, तुझे शकुनउंडे किती छान होणार आहेत!... मला जेवायला घातल्याशिवाय पाठवू नकोस हंऽ! माझी आस्ता राहील बघ!"

"बरं बरं. जेवूनच जा हो!"

मी हा सगळा संवाद माजघरातून ऐकला होता. त्यामुळ मला काही सांगावं लागलं नाही. बाहेर जाऊन मी शिवराम भाटीकराला म्हटलं, "हे बघ, आज आमच्याकडं आहे ललितापंचमी. आयता ब्राह्मण आला आहेस. तेव्हा दुपारी जेव अन् मग मुलीला घेऊन जा!"

शिवराम आढेवेढे घेईल अशी माझी कल्पना होती. पण त्यानं तसं काही केलं नाही. चिमाच केवळ बुभुक्षित नव्हती; तर तोसुद्धा तसाच होता. आतल्या तळणाचा वास त्याच्यासुद्धा नाकावर आलाच होता. शिवराम मला एकापरी गरीब भाबडाच वाटला; पण त्यानं दुपारी पानावर बसल्यावर आपल्या स्वभावाची चुणूक दाखविली. पंगतीत पाण्याचा तांब्या ठेवायला चिमा बाहेर आली त्या वेळी तिच्यावर डोळे वटारून त्यानं म्हटलं,

"झालं का भटकून पुरे? थांब तू; घरी ये म्हणजे तू आहेस अन् मी आहे!"

त्यावर मी म्हटले, "जेवायच्या वेळेला काही बोलू नको बाबा!"

तो दबकला. मग जेवण होईपर्यंत काही बोलला नाही. चिमा वास्तविक समोरच्या मुलांच्या पंगतीत जेवायला बसायची; पण तिने आपले पान स्वैंपाकघरातच मांडायला लावले. सगळे पदार्थ ती मोठ्या चवीनं जेवली. खरोखर तिचा त्यावेळी फोटोच घ्यायला हवा होता. चार-पाच शकुनउंडे तुपात घोळवून तिने पहिल्या सपाट्याला उठवले. पुन्हा बायको तिच्या पानात दोन वाढायला लागली तर तिनं म्हटलं,

"परातीत सात-आठ आहेत तेवढे सगळे वाढ मला!"

"एकदम नको. हे संपले की पुन्हा वाढीन. तुला हवे तितके खा. खूप केले आहेत मी!'

चिमाने त्या दिवशी खाण्याचा कहर केला. उंट पाणी एकदमच भरून घेतो तसं तिने अन्न भरून घेतलं. ती आता दुष्काळात जाणार होती आणि त्यासाठी दोन तीन दिवसांचे जणू एकदाच जेवून घेत होती. बायकोला वाटले की. ही पानावरच उलटून घालणार. तिला एकापरी घृणा आली, एकापरी दया आली. पानाशेजारी हात टिपताना तिने बायकोला म्हटले, "काकी,खूप जेवले. अगदी इथे, गळ्याला येऊन भिडेपर्यंत. मला तू अधाशी म्हटले असशील, होय ना?" आणि टचकन तिच्या डोळ्यांत पाणी आले. बायको त्यावर काही बोलली नाही. कारण ती जे म्हणणार होती ते चिमाने स्वतःहून म्हणून घेतले होते.

शिवराम भाटीकराने बाहेर माझ्या पंगतीला तीच अवस्था केली. बायको पसापायलीचे नव्हे; तर खांडीपिंडीचे करणारी, म्हणूनच त्या दिवशी तिची अब्रू बचावली. जेवल्यावर लगेच त्याला निघणेच शक्य नव्हते. तो आंचवून आला आणि पडवीवर दोन तास सुस्तपणे झोपला. तो उठल्यावर बायकोनं चिमाला स्वतःची साडीचोळी नेसायला लावलं आणि विचारलं, 'आज तरी सरळ जाशील ना घरी?'

"काकी! मी पळपुटी, निलाजरी ठरलेच आहे. वाजती ढोल झालेच आहे. मला पळायचं असतं तर एवढा वेळ तुला दिसलेच नसते इथे. पण मी आज तरी तसे करायची नाही. तुला अपेश द्यायची नाही. तू मला गोडधोड वाढलं आहेस. मी अगदी दावं लावलेल्या वासरासारखी घरी जाते. तू काळजी करू नको!" 'आता काय म्हणावं या पोरीला!' बायको आतल्या आत पुटपुटली. तिनं आपलं बासन सोडून एक खण तिच्यापुढे केला.

"काकी, कशाला देतेस तू हा? तो मला का मिळायचा आहे! तो आईच्या डोंबल्यावर पडायचा!"

"बरं, बरं! शहाणपणा नको करू. दिलेलं मुकाट्याने घ्यावं," म्हणून बायकोनं त्याची तिकोनी घडी तिच्या हातात कोंबली. मग बाहेर येऊन शिवरामाला म्हटले, 'पोरगी जरा वेगळी आहे.तिला शहाणपणानं वागवून घ्या. शक्य तर येत्या मार्गेसरात तिचं लग्न करून टाका. उगाच मार बडव करू नका!'

"ते काही सांगू नको तू. सगळा वाह्यातपणा बाहेर काढतो मी तिचा. चांभाराच्या देवाला—"

मी चिमाकडं पाहिलं; पण तिच्या डोळ्यांत भयाऐवजी निसुकपणाचीच छटा दिसली. ती बापाच्या पाठोपाठ चालू लागली. शेताच्या बांधावरून उजवीकडे वळताना तिने आमच्यावर एक दृष्टी टाकली. मला वाटलं होतं की, ती जाताना रडेल. रडली असती तर आमच्या मायेनं रडली म्हणून आम्हांला आमचं मोठेपण वाटलं असतं; पण ती जितक्या उदासपणे आमच्या पागोळीत उभी राहिली तितक्याच उदासपणे निघून गेली!

त्या रात्री मला तिचंच स्वप्न पडलं, चिमाच्या पाठीवर,पोटऱ्यांवर माराचे वळ उठले आहेत आणि ती आमच्यासमोर आपलं अंग उघडं करून आम्हांला म्हणते आहे, "पहा. पहा, हा माझ्या बापाचा पराक्रम! मी पळून गेले म्हणून तुम्ही माझा तिरस्कार करीत होता नाही का..."

आमचं सगळं घर मग भातकापणीच्या उद्योगात गढून गेलं.सगळं भात मळून घरात घालीपर्यंत दिवाळी जाऊन कार्तिकी एकादशी उजाडली. मग आलं सुपारीचं पाडप. ती पाडणं, घरात आणणं, सोलणं, उकडणं, वाळवणं, म्हणजे दोन महिन्यांचा अखंड यज्ञच. त्या कामाच्या सपाट्यात आम्ही आम्हांलाच विसरलो होतो; तिथे चिमाची कुठली आठवण! पण आम्ही विसरलो तरी चिमा आम्हांला विसरली नव्हती.

मार्गशीर्षाच्या पहिल्या पक्षात एका सकाळी ती सूर्याच्या किरणांबरोबरच आमच्या घरी दाखल झाली. मी पडवीवर रात्री सोललेल्या सुपारीची सालं भरीत होतो आणि बायको सडा  टाकीत होती. तिच्यापुढं उभी राहून चिमा घाबऱ्याघुबऱ्या म्हणाली, "काकी, मला आधी कुठं तरी लपव!"

आम्हा दोघांचेही हात एकदम स्तंभित झाले. तिला चांगलीच धाप लागली होती. ऐन थंडीत सकाळच्या रामपारी ती नखशिखान्त घामानं न्हाली होती.तिचं आखूड पण फुललेलं नाक लाल झालं होतं. गालही तांबडे झाले होते. ती चालत आली नव्हती; तर धावत, झेपावत आली होती. तिच्या डोळ्यांत भय भरले होते आणि ती पुनःपुन्हा मागे वळून पाहत होती.

"पुन्हा आलीस ना पळून?" बायकोनं नाखुषीनं तिला विचारलं.

"होय, आले. जिवाच्या आकांताला आले. मला आधी लपव. तो आत्ता येईल."

"अग, तो कोण?"

"बाप!"

"मग येऊ दे. बाप म्हणजे कोणी वाघ नव्हे ना?"

"वाघाच्या पुढचा. मला विकायला निघाला आहे तो. या काकाएवढ्या माणसाला. काळा डोम आहे तो माणूस. एका डोळ्यात फूल पडलं आहे बुबुळभर. बायको मेली आहे त्याची अन् खंडीभर पोरांची फटावळ आहे. कुठला आहे तिकडचा बांद्या–सावंतवाडीकडचा. नोटांचं पुडकं घेऊन आला आहे. रात्री बापाने त्या मोजून घेतल्या. सकाळी निघायचं ठरलं. त्याच्या गावी जाऊन 'सुमुहूर्त सावधान' करायचं. रात्रभर डोळ्याला डोळा लागला नाही माझा. वाटलं की, पडवीवर झोपलेल्या त्या शुक्राचार्याला नखांनी फाडून काढावा. पण...पण...नाही जमलं ते. मग पहाटे हळूच मागच्या दारातून निसटले अन् धूम ठोकली. वाट पाहिली नाही, आडवाट पाहिली नाही. सरळ इथं आले!"

"अग, पण आमच्यामागे तुझी का पीडा ही! इथं का आलीस सांसणायला?" बायको तुसडेपणे म्हणाली.

"काकी रागावलीस माझ्यावर? तुझ्यावर विश्वास होता अन् अन्य कुण्णाकुण्णावर नव्हता म्हणून तुझ्याकडं आले. तू त्या दिवशी मला पावसातून घरात घेतलंस. तुझं लुगडं मला नेसायला दिलंस. चुलीशी बसवून चहा पाजलास. इतर अनेक घरी मी गेले; पण सगळ्यांनी 'हड् हड्' करून, मी जात नाही असं पाहून, माझ्या पुढ्यात गोळाभर अन्न वाढलं, केवळ त्यांच्या अन्नावर माझी दृष्ट पडू नये म्हणून. पण तू तसं केलं नाहीस. तुझे शकुनउंडे अजून माझ्या काळजात आहेत. जाताना मला खण दिलास. जणू या घरची मी माहेरवाशीणच होते...म्हणून इथं धाव घेतली."

"मग मी दार उघडलं तो अन्यायच केला म्हणायचा!"

"तसं म्हण, हवं ते म्हण; पण मी घरात जाऊन लपणार आहे. मी इथं आल्याचं सांग मात्र बापाला! तुझ्यावर हत्याच घालीन!"

आणि ती एकदम घरात घुसली. आम्ही दोघं बघतच राहिलो. तीच धिटाई. तोच सरळपणा. तीच मुलीच्या जातीला न शोभणारी धटिंगण वृत्ती; पण या वेळी माझं मन तिला निखंदायला तयार होईना. तिच्यावर प्रसंगच तसा होता. ती एका वाघाच्या तोंडी पडत होती आणि म्हणूनच जिथं विश्वास वाटला तिथं जीव लपवायला आली होती. पुढचं सगळे आमच्या सारासार बुद्धीवर सोपवून ती घरात घुसली होती.

"आता काय करायचं?" मी बायकोला म्हटलं.

"दुसरं काही करायचं नाही. बाप आला की बखोटीला धरून त्याच्यापुढं उभी करायची. म्हणायचं, की ही तुझी मुलगी. वीक नाही तर विहिरीत लोट!"

"तिचा विश्वासघात करायचा म्हणतेस?"

"मग काय जन्मभर तिचे लोढणं गळ्यात बांधून घेणार? अन् मुलगी अशी निस्संग! उद्या इथूनही पळाली म्हणजे झालात की नाही अपेशाचे धनी..."

"हं...खरं आहे तुझं म्हणणं."

"घटकाभर लपवलीत म्हणून काय तिला कायमची लपवता येईल? आज ना उद्या तिच्या बापाला कळेलच. मग त्यानं फिर्याद केली म्हणजे! अमक्या तमक्याने माझी मुलगी पळवून नेली..."

"त्याचं काय तोंड लागलं आहे फिर्याद करायचं! उलट त्याला वाटेल, एका पोरीचा भार कमी झाला!"

"मग काय जावई शोधायला जुती झिजवणार! स्वतःची मुलंबाळं आहेत आपल्याला. अन् उद्या तिचा बाप पैसे मागायला आला म्हणजे! 'तो अमका तमका इतकी रक्कम देऊन माझ्या मुलीला नेत होता. तुम्ही आड आलात त्याच्या. तेव्हा आता तुम्हीच द्या तेवढे रुपये !' त्याचं नुकसान होणार या व्यवहारात. मग तो बरा गप्प बसेल! विकत श्राद्ध घेऊन हे सव्यापसव्य सांगितलं आहे कोणी?"

"हो, तेही खरं!"

हेही खरं, तेही खरं, असंच चाललं होतं आमचं. मन सांगत होतं, 'तिला दवडू नको.' बुद्धी सांगत होती,'हे तुझ्या गळ्याशी येईल.' नात्याची नव्हे; पात्याची नव्हे; अशा एका मुलीने निष्कारण आमच्या अंतरात वादळ उठवलं होतं. बायको सांगत होती ते व्यवहाराला धरून होतं. नसत्या भानगडी घेऊन बसायला मला सवड होती कुठं! अन् कशासाठी म्हणून घ्यायच्या त्या?

एवढ्यात शिवराम भाटीकर आलाच. तो तग्रवग्र होऊन आला होता. डोळे लाल करून आला होता. हातात उसगीची लवलवती छडी घेऊन आला होता. चिमा त्याला या वेळी दिसली असती तर त्याने आमच्या देखत तिला फोडून काढली असती. त्याच्या अंगात कांचनभट शिरला होता.

"चिमा आली आहे का इथं?" अंगणातूनच त्याने प्रश्न केला.

"चिमा...नाही...इथं नाही आली," मी चटकन् उत्तर दिले.

"नाही कशी? इथंच यायला हवी. तुम्ही खोटं सांगता मला. गेले दोन महिने तुमच्याच घरचं गुणगान चाललं होतं तिच्या तोंडून!"

"भाटीकरा! हे बोलणं बरं नव्हे. मागे ती इथं आली, त्या वेळी मीच तुला निरोप पाठवून बोलावून आणलं होतं ना?"

माझ्या या शब्दांनी तो वरमला. काही तरी पुटपुटत मागच्या पावली चालता झाला. एवढा वेळ स्तब्ध राहिलेल्या माझ्या बायकोनं मला विचारलं, "हे काय केलंत तुम्ही?"

"मी केलं नाही. आपोआप घडलं ते. 'आहे' म्हणायचं ते 'नाही' आलं तोंडातून."

आणि एवढ्यात चिमा बाहेर आली. तिनं बापाच्या येण्याच्या आधीचा आमचा संवाद ऐकला होता. ती बायकोच्या पुढं उभी राहून म्हणाली,'काकी, एवढी जड झाले मी तुला! कशाला मग त्या दिवशी घरात घेतलंस? कशाला माया लावलीस? तूच मला उपदेश केला होतास ना, चांगलं वाग म्हणून? मी चांगलं वागायचं ठरवलं होतं; पण म्हणून काय स्वतःला विकून घेऊ? काकी, मला कळलं. मी चांगलं वागायचं ठरवलं तरी माणसं मला चांगलं वागू देणार नाहीत. अन् त्यांतलीच एक तू! मी नाही राहत तुझ्याकडे...मग मात्र मला म्हणू नकोस याच्याबरोबर का गेलीस अन् त्याच्याबरोबर का नाचलीस..'

आणि चिमा एकदम घरातून बाहेर पडली. मी जाणलं की सगळ्या जगातले अपमान झेलले, सोसले तरी ती काकीच्याकडचा अपमान सहन करायला तयार नव्हती.आम्ही तिच्या जात्या आकृतीकडे स्तंभित होऊन पाहत राहिलो. मला ते सहन झाले नाही. तिच्या त्या सडेतोडपणानंच ती मला आपलीशी वाटू लागली. मी तिला ओरडूनच हाक मारली, 'चिमा! माग फीर!'

तिनं चटकन् तोंड वळवलं. तिच्या त्या लालसर चेहऱ्यातून जणू विजेच्या शलाका बाहेर पडत आहेत असं मला वाटलं. तिथल्यातिथं खुंटासारखी उभी राहून ती म्हणाली,

"अं, हं! तुम्ही नाही. काकीला हाक मारू दे मला, तरच येईन!"

मी बायकोला म्हणणार होतो की, 'काय होईल ते होवो; तू बोलाव तिला!' पण आधीच ती म्हणाली,

"चल ये मागं. तू अगदी खमंग भेटलीस मला—"

चौदा

# व्यंकूची शिकवणी

**द. मा. मिरासदार**

निरनिराळ्या बऱ्याच परीक्षा पास होऊन अखेर मी एका खेड्यात मास्तरची नोकरी धरली तेव्हा माझे वय वीस–बावीस इतकेच असावे. त्या वेळी माझे लग्न झाले नव्हते. मी अगदी अफुट होतो. माझे बाहू पिळदार असून ते वेळीअवेळी फुरफुरत असत. गर्दन एखाद्या लोखंडी गोळ्याप्रमाणे फुगीर होती. मांड्यांचे पट तट्कन् उठून फिरत होते. माझी भरगच्च छाती हा तर माझ्या खास अभिमानाचा विषय होता. त्या वेळी मी चालू लागलो म्हणजे पायाखालची भुई दबली जात असे. सांजसकाळ तालमीत जाऊन मेहनत करण्याचा नाद मला लहानपणापासून होता. त्यामुळे डोक्यापासून पायाच्या बोटापर्यंत सर्वांगावर तांबडी माती चिकटलेली असे. एखादा तांबडा मारुती रस्त्यावरून चालावा त्याप्रमाणे मी चालत असे. हत्ती झुलावा त्याप्रमाणे मी झुलत असे. एकंदरीत मी मोठा राजबिंडा इसम होतो.

त्या वेळेचे माझे जीवन अगदी साधे होते. पहाटे चार वाजता उठावे आणि रात्री नऊ वाजता झोपावे, असा माझा देवाघरच्या पाखरासारखा निर्मळ आयुष्यक्रम होता. दोन्ही वेळेला शाळेत जावे, मधल्या वेळात भाकरतुकडा हाताने करून खावा आणि उगीच पडावे, सकाळसंध्याकाळ मेहनत करावी, असा माझा सरळसोट, धोपटमार्गी कार्यक्रम होता. जेव्हा जेव्हा वेळ मिळे तेव्हा तेव्हा गुरुचरित्र, शनिमाहात्म्य, मारुतिस्तोत्र असली सोज्ज्वळ पुस्तके नाकाला लावून मी वाचत असे. यापलीकडे या जगातले एक अक्षरही मला माहीत नव्हते. आपण बरे आणि आपली नोकरी बरी, ही माझी त्या वेळेची वृत्ती होती. त्यामुळे गावात माझ्याविषयी आदर होता. एखादा साथीचा रोग फैलावावा त्याप्रमाणे माझ्याविषयी सगळीकडे कौतुक फैलावले होते. त्या गावाच्या दृष्टीने मी एक आदर्श पुरुष होतो.

एके दिवशी संध्याकाळी मी नेहमीप्रमाणे मारुतिस्तोत्र म्हणत बसलो होतो. समोर कंदिलाचा उजेड झगमगत होता. बाहेर अंधार पसरला होता. रस्त्यावरची वर्दळ बंद झाली होती. वारा भणाभणा करीत वाहत होता. आणि मी डोळे मिटून मारुतिस्तोत्र म्हणत होतो. मधूनमधून हात जोडून नमस्कार करीत होतो.

आणि मग एकदम बाहेरून हळी आली,

"मास्तर...मास्तर हायती का?"

माझी खोली आडबाजूला होती. त्यामुळे सहसा माझ्या खोलीवर कोणी येत नसे. निदान अशा वेळी तरी. त्यामुळे ती हाक ऐकू आल्यावर मी दचकलो आणि डोळे उघडून पाहिले. म्हणालो,

"कोण आहे?"

पण माझा प्रश्न पुरा व्हायच्या आतच एक म्हातारा आत आला. हातातली काठी त्याने खाली ठेवली. उंचापुरा, दांडगा आणि काळशार. ओठावर मिशांचा घोस. धोतर, कोटटोपी, हातात सलकडी, अंगठ्या–असा थाट. काठी खाली ठेवून तो मला म्हणाला, "रामराम मास्तर."

आणि तो भिंतीला टेकून खाली बसला.

मी म्हणालो, "रामराम."

यावर त्याने थोडा वेळ दम घेतला. मग तोंडातला थुंका बाहेर टाकून तो हसला.

"मी यदू वडार. कंत्राटदार हाय मी."

"बरं."

"माझा पोरगा तुमच्या शाळेतच हाय. तुमाला ठाव आसंलच की?"

"नाही बुवा. कोण?"

"व्यंकू."

"हं हं, आला लक्षात."

खरे म्हणजे लक्षातबिक्षात काहीच आले नव्हते. पण काही तरी बोलायचे म्हणून 'हं हं' केले इतकेच.

"त्यो आता सातवीला हाय बगा. आँदा सुटला पायजे सातवीतनं. तवा तुमी त्येची शिकवनी घेता का, आसं इचारायला आलुया मी."

"का बरं? शिकवणी कशासाठी लावताय्?"

माझा हा प्रश्न ऐकल्यावर म्हातारा एकदम भडकला. आवाज चढवून मिशा हालवीत तो म्हणाला,

"अवो कार्ट लई उनाड हाय. अभ्यासाकडं कायसुदिक बगत न्हायी. दिवस रात्र गावात गटाळ्या घालत आसतंय. सुधराल तर तुमीच सुधराल बगा त्येला."

हे ऐकल्यावर माझा ऊर अभिमानाने भरून आला. एका उनाड मुलाला ताळ्यावर आणण्याची जबाबदारी माझ्यावर टाकलेली बघून माझ्या सद्वर्तनाबद्दल माझी स्वतःचीच खात्री पटली. हे काम मी करणे आवश्यक होते. शाळेच्या दिवसांत कुठल्याही मुलाने पुस्तकाला नाक लावून बसणेच योग्य. हा पोरगा अभ्यासाकडे ढुंकूनही पाहत नाही आणि दिवसभर उनाडक्या करतो ही अगदी वाईट गोष्ट होती. छेः छेः! माझ्या लहानपणी मी असे बिलकुल केले नव्हते. मी विचार करण्यात गढलो हे बघून म्हातारा म्हणाला,

"मास्तर, तुमी पैक्याची काळजी करू नगा. एवढे पोरगं सुधरा माजं. वंजळभर रुपये तुमच्या वटीत घालीन मी. मग तर झालं?"

हे ऐकल्यावर तर त्याला सुधारण्याचा माझा निश्चय पक्का झाला. मी मान हलवून गंभीरपणे म्हणालो,

"ठीक आहे. द्या त्याला पाठवून."

अशा रीतीने ही शिकवणी ठरली आणि व्यंकू रोज रात्री माझ्याकडे शिकवणीला येऊ लागला.

पहिल्या दिवशी तो आला, तेव्हा त्याला बघून मी बराच निरुत्साही झालो. व्यंकू म्हणजे बाराचौदा वर्षांचे बिनमिशाचे किडकिडीत पोरगे असेल असा माझा समज होता. पण हा गडी चांगला अठराएकोणीस वर्षांचा असावा. काळाकुट्ट, आडव्या अंगाचा, नकट्या नाकाचा आणि जाड कातडीचा. वयाच्या मानाने त्याला मिशाही भरपूर आल्या होत्या. तो एखाद्या बापई गड्यासारखा दिसे. त्याला बघून मी मनात हबकलो. पण वरकरणी तसे काही न दाखविता मी त्याची शिकवणी सुरू केली, आणि चांगले वागण्याने काय फायदे होतात, हे त्याला सविस्तर वर्णन करून सांगितले, त्यानेही ते मुकाट्याने ऐकून घेतले. कुठेही मला विरोध केला नाही. हे बघून मी खूष झालो. पहिल्यांदा तो आला तेव्हा चेहऱ्यावर नाखुषी घेऊनच आला होता. पण हळूहळू तो रुळला.रोज नेमाने येऊ लागला. माझ्याशी खुल्या दिलाने बोलू लागला.

एके दिवशी शिकवणी चालू असताना मी मध्येच त्याला एक प्रश्न विचारला. पण मान खाली घालून तो मुकाट्याने बसला. काही बोलेचना. मी पुन्हापुन्हा विचारले तरी बोलेना. शेवटी मी रागावून म्हणालो.

"गाढवा, तुला तोंड आहे का नाही?"

त्याने मान हलवली आणि तोंडावर बोट ठेवून ते आहे असे स्पष्टपणे मला दाखवले. त्याचे दोन्ही गाल फुगले होते. मग काय खाऊन आला होता कोण जाणे!

"काय खाल्लंस रे?"

यावर पुन्हा त्याने मान हलवली. "थोडं थांबा' असा हाताने इशारा केला आणि मग दारापाशी जाऊन लालभडक पिचकारी बाहेर सोडली. मग आत येऊन तो म्हणाला, "केलं तोंड मोकळं मास्तर तुमी? चांगला तंबाखूची गुळणी धरून बसलो हुतो मघाधरन, आसं पान जमलं होतं म्हणून सांगू, काय इचारू नका."

मी कुतूहलाने म्हणालो, "म्हणजे पानतंबाखू खातोस काय तू?"

"व्हय मास्तर."

"किती वेळा खातोस?"

"धापाच येळा खातो की."

"खाऊ नये तंबाखू लेका. वाईट आसतं."

"काय वाईट हुतं मास्तर!"

मला त्याच्या या प्रश्नाचे उत्तर देणे अवघड गेले. कारण मी स्वतः तंबाखूच काय, पण पानही फारसे खाल्ले नव्हते. त्यामुळे त्याचा बरेवाईटपणा मला माहीत नव्हता. तरी पण अवसान आणून मी म्हणालो,

"लेका, खाऊ नये म्हणून खाऊ नये."

व्यंकूने पुन्हा एकदा पिचकारी टाकली आणि मला म्हटले,

"मी सांगू मास्तर—'

"काय?"

"उलट तंबाखू खावी मानसानं. लई चांगलं आसतं."

मी कुतूहलाने पुन्हा विचारले,

"असं? ते कसं काय?"

"अवं, देवानंच सांगून ठिवल्यालं हाय, तंबाखू खावी म्हणून."

"काय सांगितलं आहे देवानं?"

यावर व्यंकूने मला जी कथा सांगितली ती मला अगदीच अपरिचित होती. त्याच्या सांगण्याचा सारांश असा होता की, तंबाखू ही फार उत्तम वनस्पती आहे आणि माणसाने ती हमेशा तोंडात टाकावी, असा प्रत्यक्ष देवाचाच हुकूम आहे. विठोबाने कमरेवर हात ठेवून असे शुभ वर्तमान जगाला सांगितले आहे की, ही वनस्पती कमरेएवढीच उंच असते. ती किती खावी असा प्रश्न विचारल्यावर मात्र त्याने गणपतीकडे बोट दाखविले. गणपतीने डावा हात पसरून उजव्या हाताने दोन बोटांची चिमूट सदैव धरलेली आहे.ती कशासाठी? या वनस्पतीचे पान हातभर रुंदीचे असते आणि माणसाने ती चिमूटभरच तोंडात टाकावी हेच सांगण्यासाठी. आणि नाही खाल्ली तर प्रत्यक्ष मारुतरायाचा कोप होतो. न खाणाऱ्या माणसाच्या मुस्कटात लगावण्यासाठी त्याने एक हात जो उगारलेला आहे तो अद्यापि तसाच आहे.

व्यंकूने सांगितलेली ही गोष्ट ऐकून माझा त्याच्याविषयीचा गैरसमज बराच दूर झाला. तो पानतंबाखू खातो हे योग्यच आहे असे मला वाटू लागले. फार काय, पण अशा दिव्य वनस्पतीची चव मीही घेऊन बघावी असा त्याने आग्रह केल्यानंतर मी विशेष विरोध केला नाही आणि एक काडी त्याच्या हातून घेऊन बेलाशक चावली. त्या एका काडीनेच मला विलक्षण चमत्कार दाखविल्यामुळे माझी या औषधी वनस्पतीवर फारच भक्ती बसली. काडीच्या दोन काड्या, चिमूट असे करता करता मी बकणाभर तंबाखू एक पानाला खाऊ लागलो आणि पिचदिशी थुंकू लागलो. हळूहळू दोन बोटे तोंडासमोर धरून, जागेवरून न ऊठता, लांबवर पिचकारी कशी टाकावी हेही व्यंकूने मला शिकवले. त्याचे त्या विषयातले अगाध ज्ञान पाहून मला त्याच्याविषयी फारच कौतुक वाटू लागले.

एके दिवशी रात्री आम्ही दोघेही असेच पानाचे तोबरे भरून पिचकाऱ्या टाकत बसलो होतो. शिकवणीला अद्याप सुरुवात व्हायची होती. दोघांचीही तोंडे बंद झाल्यामुळे अभ्यासाचे काम थोडेसे लांबणीवर पडले होते. पिचकारी टाकून थुंकल्यावर तोंड थोडा वेळ मोकळे होत असे. पण तेवढ्या वेळात अभ्यास करणे जमण्यासारखे नव्हते. म्हणून इकडल्या तिकडल्या गप्पा करीत होतो.

मग व्यंकू म्हणाला,

"मास्तर, आज जरा लवकर जातो बरं का मी."

व्यंकूचे तोंड मोकळे असले तरी माझे नव्हते. म्हणून मी कुत्र्यासारखे वर तोंड करून मुखरस सांभाळीत म्हणालो,

"का रे, का?"

"आज कने, नवाच्या ठोक्याला तमाशाचा फड हुभा ऱ्हायचा हाय भाहेर. तकडं जावं म्हनतोय."

गेले चारपाच दिवस गावाबाहेरच्या बहिरोबाची जत्रा भरली आहे आणि तिथे नाना करमणुकी चालल्या आहेत ते मला माहीत होते. कुठला तरी एक तमाशाचा फड आला आहे हेही माझ्या कानावर होते. पण तमाशा मी चुकून कधी पाहिला नव्हता. तो बघण्यासारखा नसतो एवढेच ज्ञान त्याच्याविषयी मला होते. त्यामुळे व्यंकूने तमाशाला जातो म्हणून सांगितल्यावर मला त्याच्याविषयी काळजी वाटू लागली. या पोराचे मन वळवले पाहिजे, आणि त्याला सुधारले पाहिजे, असे मी ठरवले. मग मी लांबलचक, पल्लेदार पिचकारी सोडून म्हणालो,

"छीः छी! व्यंक्या, गाढवा, तू तमाशाला जाणार!"

व्यंकू मान हालवून गंभीरपणाने म्हणाला,

"होय मास्तर."

"तमाशा पूर्वी पाहिला आहेस का कधी?"

"नेहमी. एक बारी चुकवली न्हाई आजून म्या."

व्यंकूचे हे बोलणे ऐकून मला धक्का बसला.

"काय, म्हणतोस काय तू?"

"आज आठ वर्सं झाली मास्तर. एक फड चुकला न्हायी."

असे म्हणून त्याने दोन्ही मांड्यांची ढोलकी करून त्या हाताच्या बोटाने बडवायला सुरुवात केली. तो पुढे एखादे मार्मिक गाणेही तोंडातून बाहेर काढण्याच्या बेतात होता. पण तेवढ्यात मी दुःखाचा आवाज काढून म्हणालो,

"अरेरे...व्यंकू, काय हा तुझा अधःपात!"

"म्हंजे काय मास्तर?"

"अधःपात म्हणजे–आपलं हे... बर ते असू दे. यापुढं तमाशाला जाणं बंद. समजलं?"

"का बरं?"

"अरे, तमाशा फार वाईट असतो. चांगल्या माणसानं कधी बघू नये."

"का बरं बगू ने? काय वाईट असतं त्यात?"

व्यंकूचा हा प्रश्न ऐकून माझी दातखिळी बसली. त्याच्या त्याही प्रश्नाचे उत्तर मला सांगता येण्यासारखे नव्हते. मी गप्प राहिलो हे बघितल्यावर त्याला इसाळ आला.

"मास्तर, तमाशासारखी फस्कलास गोष्ट न्हायी दुनवेत. मानूस नुसतं उलथंपालथं होतय बगितल्यावर."

"ते कसं काय?"

"तीच तर गंमत हाय. मेंढरासारकी मानसं पळत्यात तकडे ते काय बिनटाळक्याची असत्यात काय? तिकटं बंद हुत्यात. बसाय जागा मिळत न्हायी. नुसती मानसं, मानसं, मानसं! उगी पेटल्यावानी दिसतं जकडंतकडं."

व्यंकूने सांगितलेल्या या माहितीमुळे मला बरेच आश्चर्य वाटले. तमाशा हा फार चावट प्रकार असल्यामुळे लोक तिकडे बिलकूल फिरकत नसतील अशी माझी कल्पना होती. तमासगिरांना कुणी दाराशीही उभे करीत नसतील, असे मला वाटत होते. आणि हा तर सगळे उलटे सांगत होता. एकूण या विषयातलेही माझे ज्ञान चुकीचे होते काय?

व्यंकू म्हणाला,

"मास्तर, तुमी एकदा बगाच तमाशा. उगं आपली गंमत म्हणून एकदा बगा. आज तर चोरंगी सामना हाय. हूं जाऊ द्या. बगा अन् मग सांगा, चांगला का वाईट त्ये!"

व्यंकूचे हे सरळ बोलणे मला एकदम पटले. कुणालाही पटावे असेच त्याचे बोलणे होते. कुठलीही गोष्ट स्वतः पाहिल्याशिवाय तिच्यासंबंधी बोलू नये, हे त्याचे म्हणणे अगदी योग्य होते. आपण बघून ठरवावे हे चांगले. इतकी माणसे बेधडक तिथे जात असतील ती काय गाढव म्हणून? छेः छेः! माझ्या समजुतीत मुळातच काही तरी चूक असावी.

माझ्यासारख्या भिडस्त माणसाच्या मनात असे विचार आले आणि तमाशाला जाण्यावाचून आपल्याला गत्यंतर नाही, असे मी ठरविले. इतके झाल्यावर आता मी नाही म्हणायचे हे बरे नव्हते. अशाने त्याला फार वाईट वाटले असते. त्यापेक्षा जावे हे उत्तम. निदान त्याचे तरी समाधान होईल.

मी कोटटोपी घातली आणि म्हणालो, "चल. तू आता म्हणतोच आहेस एवढं तर चल. तुझं तरी समाधान होऊ दे."

पाटीदप्तर टाकून व्यंकू ताडकन उठला. धोतर नीट खोवत मला म्हणाला,

"भले मास्तर! आशी इरेसरी पायजे. धापैकी धा मार्क तुमाला."

"पण मला समजेल ना सगळं? पहिल्यांदाच येतो आहे म्हणून विचारतो."

"तुमी चला तर खरं."

असे म्हणून त्यानं एक डोळा मिचकावला, तेव्हा मला फारच गंमत वाटली. मग मी त्याला दोन डोळे मिचकावून दाखवले. उगीच आपले गमतीने. आणि आम्ही लगबगीने बाहेर पडलो.

तो म्हणाला ते काही खोटे नव्हते. कनातीत ही गर्दी उसळली होती. माणसांच्या अंगावर माणूस नुसते पडत होते. बंदुकीत दारू ठासून भरावी त्याप्रमाणे माणसे ठासून भरली होती. कोंगाड्यांसारखा कलकलाट चालला होता. पण कार्यक्रम सुरू झाल्याबरोबर कसे गपगार झाले. आम्ही दाटीवाटीत कसे तरी जाऊन दोन पायांवर बसलो होतो.

पायाला अशी रग लागू लागली की फार वेळ बसवेल असे वाटेना. पण गणगौळण संपली आणि मागून इतक्या गंमतीदार गोष्टी घडू लागल्या की पार सगळे विसरून गेलो. झकपक पोषाख केलेल्या तरुण बायका, पोरी अशा नखऱ्याने बोलत होत्या आणि नाचत होत्या म्हणता! काही विचारू नका. तो सोंगाड्या असलेला माणूस मध्येमध्ये त्यांच्याजवळ जाऊन असे काही मजेदार, चावट बोलत होता की, मला वाक्यावाक्याला गुदगुल्या होत होत्या, हसू कोसळत होते. मध्येच हातवारे करून तो काही तरी चमत्कारिक अभिनय करीत होता. त्या वेळी त्या बायका अन् लोक भयंकर हसायचे. मला काही त्या अभिनयाचा अर्थ कळला नाही. पण त्यामुळे अंगाला काही तरी गुदगुल्या होतात एवढे मात्र पक्के ध्यानात आले. शिवाय व्यंकू अधूनमधून माझ्या कानात कुजबुजत होता आणि माहिती सांगत होता : "ही कोपरगावकरीन. ही जुन्नरकरीन. अलीकडं हिची बाडी लई स्ट्रांग झालीय. पण पयल्यांदा अशी नव्हती. ही पुनेकरीन. हा तासगावचा सोंगाड्या येशवंता. समद्या सोंगाड्यात बेनं हाय..." असली उपयुक्त माहितीही पुरवत होता. त्यामुळे तर हा कार्यक्रम एकंदरीत मला फारच सुरस वाटला. त्या बायका नाचत असताना मध्येच डोळ्यांची मजेदार हालचाल करीत, तेव्हा लोक हलकल्लोळ करीत, शिट्ट्या वाजवीत. व्यंकू तर लेकाचा पहिल्यापासून एकसारखा शिट्ट्या ठोकत होता. मला त्याचा त्या वेळी फारच हेवा वाटला.

हा सगळा कार्यक्रम पाहत असताना मी स्वतःला पार विसरून गेलो होतो. धुंदीच्या समुद्रात बुडाल्यासारखे वाटत होते आणि त्या बुडण्यातच कसलेतरी अपार सुख वाटत होते. शेवटी एकदोन वाजता सगळे संपले. दुखऱ्या पायांनी मी घराकडे परत आलो आणि अंथरूण टाकून पडलो, तरी माझ्या डोळ्यांसमोरून ती रंगदार दृश्ये हलत नव्हती. मनात नाना विचार येत होते. खरोखर लोक उगीचच एखाद्या गोष्टीला नावे ठेवतात. आता या तमाशात वाईट काय होते? चांगल्या सुरेख सुरेख बायका येतात, गाणी म्हणून आपली करमणूक करतात, नाचतात. आणखी काही काही करतात. अंगावर काटा उभा राहील असे काही बोलतात, त्यांतले सगळेच काही समजत नाही म्हणा. पण त्यात वाईट काय होते?...

या अशा विचारातच मी पुढची रात्र आणि दिवस घालवला आणि मग पुढे चारदोन दिवस व्यंकूशी याच विषयावर गंभीरपणे चर्चा केली. तमाशा मी पाहिला ही गोष्ट खरी. पण त्यातल्या अनेक गोष्टी आणि अनेक बोलणी मला नीटशी समजली नव्हती. त्यामुळे त्या शंकांचे त्याच्याकडून निरसन करून घेणे हे मला आवश्यक वाटले. या सगळ्या चर्चेचा निष्कर्ष इतकाच निघाला की, करमणुकीच्या या प्रकारात नव्या माणसाला न समजणाऱ्या गोष्टी पुष्कळ असतात. त्यांचा अर्थ शब्दांनी समजावून घेता येत नाही. त्यासाठी पुन्हा पुन्हा तिकडे वळणे हाच एकमेव तोडगा होय. चर्चेचा निर्णय अशा रीतीने लागल्यामुळे नि तमाशाच्या फडाचा मुक्कामही थोडाच उरल्यामुळे मला रोज रात्री कनातीत हजेरी देणे भागच पडले. रात्र रात्र जागून न कळणाऱ्या गोष्टींचे अर्थ लावत

बसावे लागले. ते करता यावे म्हणून मला सकाळसंध्याकाळची मेहनत बुडवावी लागली. शरीराचा बांधेसूदपणा गमवावा लागला. गुरुचरित्र आणि मारुतिस्तोत्र ही उत्तम पुस्तके पेटीत कुलूप घालून ठेवावी लागली आणि आणखी बऱ्याच गोष्टी कराव्या लागल्या! सुदैव एवढेच की, माझ्या या कार्यक्रमात व्यंकू सदैव माझ्याबरोबर राहिला. त्याने वेळोवेळी मला संदर्भासहित स्पष्टीकरण करून सांगितले आणि मला बहुमोल मदत केली. त्यामुळे माझे या विषयातले अज्ञान हळूहळू नाहीसे होऊ लागले. माझ्या सरळसोट डोक्यात प्रकाश पडू लागला आणि उत्तरोत्तर मी ज्ञानी पुरुष बनत चाललो.

एके दिवशी रात्री 'कोपरगावकरीन', 'जुन्नरकरीन' इत्यादी बहुमोल विषयांवरील चर्चा नेहमीप्रमाणे बराच वेळ करून माझा हा गुणी विद्यार्थी निघून गेला होता आणि मी डोळे मिटून लावणीची एक ओळ गुणगुणत अंथरुणावर लोळत पडलो होतो. कंदिलाचा बारीक केलेला प्रकाश खोलीत अंधुकपणे पसरला होता. उजेडाची एक लहानशी तिरीप माझ्या डोळ्यांवर येत होती. बाहेर काळाकुट्ट अंधार पडला होता आणि मी फार अस्वस्थ झालो होतो. कधी या कुशीवर वळावे, कधी त्या कुशीवर वळावे, असा सारखा चाळा करीत होतो. झोप कशी ती लागत नव्हती. डोक्यात नाना विचार येत होते. हे विचार कसले हेही नीटसे समजत नव्हते आणि उगीचच काही तरी चमत्कारिक वाटत होते. खोलीतला एकटेपणा खायला उठत होता. डोके चढल्यासारखे झाले होते. फार म्हणजे फारच चमत्कारिक वाटत होते.

तेवढ्यात दारावर बाहेरून कुणी तरी खडखड केले.

मी दचकून उठून बसलो. डोळे बारीक करून अदमास घेतला. मग म्हणालो,

"कोण आहे?"

बाहेरून मंजूळ आवाजात कुणी तरी म्हणाले,

"मी हाय. इंद्रा."

कंदिलाची वात मोठी करून मी दार उघडले. दिव्याच्या उजेडात न्याहाळून बघितले.

दाराच्या एका अंगाला एक तरणीबांड, धिप्पाड बाई उभी होती. गोरीपान, अगदी हळदीच्या रंगासारखी. उफाड्याच्या अंगाची आणि उगीचच भिरीभिरी नजर फिरवणारी.

मला दरदरून घाम सुटला, भीती वाटली, आणि आणखीही काही तरी वाटले. या अपरात्री, अशा वेळेला या मोहनेचे माझ्याकडे काय काम असावे बरे?

कापत कापत मी विचारले,

"कोण पाहिजे?"

निऱ्यांचा घोळ झोकात उचलून खणखणीत आवाजात ती म्हणाली,

"मालक हायती का आमचं आत?"

मी माझ्याच खोलीत मागे वळून पाहिले. अगदी निरखून पाहिले. पण मालकच काय, कुणी नौकरही माझ्या खोलीत दिसत नव्हता. माझ्या खोलीत त्या एकट्या पोराखेरीज दुसरे कोणी येऊनही गेले नव्हते. मग हिचा मालक कोण असावा?

"कोण मालक?"

यावर ती बाई खुदकन् हसली. अशी हसली की माझ्या काळजाचे पाणी पाणी झाले.

मानेला झटका देत देत ती म्हणाली,

"आमचं मालक तुमच्याकडंच येत्यात न्हवं?"

"नाही बुवा."

"आं? त्ये तर म्हणत होतं—"

"काय?"

"तुमच्याकडं शिकवणीला जात आसतो म्हणून."

मी जागच्या जागीच खिळून उभा राहिलो. म्हणजे ही बाई व्यंकूबद्दल तर बोलत नव्हती!

"कोण? व्यंकू काय?"

"व्हय त्येच." ती बाई तोंडाचे वेडेवाकडे हावभाव करीत म्हणाली. बहुधा यालाच मुरका म्हणत असावेत! व्यंकूने मला त्याची लक्षणे एकदा सांगितली होती. मला बरोबर आठवले.

"बरं बरं, त्याचं काय?"

"अवं, रोज ह्या टायमाला घराकडं येत्यात अन् आजच आलं न्हायीत. म्हून पुसाया आले मी."

"आसं आसं."

"मंग? ... गेलं काय त्ये?"

"मघाशीच गेला तो. पुष्कळ वेळ झाला."

"कुठं बसलाय मुडदा मधीच कुणास ठाऊक."

असे म्हणून त्या बाईने भुवया उडवल्या. थोडा वेळ विचार केला आणि मग पायाचा झपाटा मारला. दाणदाण पावले वाजवीत ती त्या अंधारात नाहीशी झाली.

त्यानंतर दिवसभर मला दुसरे काही सुचलेच नाही. ही बाई कोण असेल? तिने व्यंकूची चौकशी कशाला केली असावी?

रात्री व्यंकू शिकवणीला आला. मी घोगऱ्या आवाजात विचारले,

"व्यंकू ..."

"काय?"

"काल कुठली बाई आली होती रे चौकशी करायला तुझी?"

व्यंकू दचकून म्हणाला,

"बाई? आन कधी?"

"फाजीलपणा करू नकोस. काल रात्री इथं आली होती ती."

"काय म्हणत होती?"

"तुझी चौकशी करीत होती. तू कुठं गेलास म्हणून विचारलं तिनं."

"च्या बायलीला, हितं येऊन कशाला धडपडली आणखीन्?"

व्यंकू असे म्हणाला खरे; पण मग त्याने हातभर जीभ बाहेर काढून ती चावली आणि मान खाली घातली. त्याच्या त्या मर्यादशील स्वभावाचे मला फारच कौतुक वाटले.

"कोण होती रे ती?"

पण माझ्या त्या गरीब विद्यार्थ्याकडून काहीच उत्तर आले नाही.

मी पुन्हा विचारले,

"तुझी बायको होती का ती?"

व्यंकूने मान हलवून नाही म्हणून सांगितले. म्हणाला,

"माजं लगीनच झालेलं न्हायी मास्तर अजून. असं कसं इचारताय तुमी तरी?"

"मग?"

मी जेव्हा त्याचा पिच्छाच पुरवला तेव्हा तो मान खाली घालून बराच वेळ गप्प बसला. मग घुटमळत, चाचरत म्हणाला,"ती बाई म्हंजे बगा मास्तर—"

"हं."

"मास्तर, ती बगा–"

"हं."

"ती मास्तर बगा–"

मी संतापून म्हणालो, "मास्तरानं बघितलं कालच. गाढवा. पुढं बोल."

"ती बाई–"

"हं."

"मी––ठेवल्याली हाय मास्तर."

"तू?"

"व्हय."

व्यंकूने दिलेल्या या उत्तरामुळे माझ्या मनावर बराच ताण पडला. त्याच्या बोलण्याचा अर्थ समजून घ्यायला मला बराच वेळ लागला. सभोवती काय चालले आहे हे थोडा वेळ मुळीच कळले नाही. मग भानावर येऊन मी उठून बसलो, त्याच्याकडे टक लावून पाहत राहिलो. घसा खाकरून आश्चर्याने म्हणालो. "व्यंकू. गड्या, हे तू जमवलंस तरी कसं?"

माझ्यापुढे या गोष्टीचा कबुली देताना व्यंकू पहिल्यांदा थोडासा बिचकला होता. पण मी इतक्या सरळपणाने हा प्रश्न विचारला की, तो खुलला आणि तोंडातली तंबाखू सांभाळीत त्याने सगळी कथा मला सांगितली. ही कथा बरीच लांबलचक होती. पण तिचे तात्पर्य इतकेच होते की, ही बाई परजातीतली असून त्याच्या जातीत अलीकडेच शिरलेली होती. तिलाही बिचारीला कुणी नव्हते. आणि व्यंकूलाही तूर्त कुणी नव्हते. दुष्काळाच्या कामाच्या वेळी ती व्यंकूच्या बापाकडे कंत्राटात कामाला होती आणि तेव्हापासून व्यंकूने त्या भल्या बाईला आश्रय दिला होता. गेल्या वर्ष दीड वर्षापासून व्यंकूचे तिच्याकडे खाते होते. अगदी स्वतंत्र खाते होते.

ही सर्व हकीकत मी मन:पूर्वक आणि लक्ष देऊन ऐकली. आणि मग माझे अंत:करण भरून आले. आपल्या विद्यार्थ्याने एवढा मोठा पराक्रम करावा आणि आपल्याला त्याची दखलही असू नये याची मला फार खंत वाटली. मघाशी एकटा असताना मला जसे अगदी चमत्कारिक वाटत होते, तसे काही तरी चमत्कारिक पुन्हा व्हायला लागले.

पण दुसऱ्याच क्षणी मला माझे कर्तव्य आठवले. या उनाड मुलाला सुधारायचे आणि सन्मार्गावर आणून सोडायचे ही मी घेतलेली जबाबदारी मला हळूहळू आठवू लागली आणि मी सावरून बसलो. पूर्वीचा अनुभव माझ्या जमेला होता. सरळ उपदेश करून त्याचे मन वळवणे ही गोष्ट जमण्यासारखी नव्हती. मी काहीही सांगितले तरी हा जिज्ञासू विद्यार्थी मला उलटे प्रश्न विचारणार आणि त्या प्रश्नाचे उत्तर आपल्याला या जन्मातही देता येणार नाही. मग काय करावे बरे?...

मनाशी असा बराच वेळ विचार केला. तोपर्यंत व्यंकूचे दोनतीनदा पान खाऊन झाले. मीही त्याच्याकडून पान मागून घेतले आणि तंबाखू तोंडात टाकून ती दाढेला धरीत म्हणालो,

"व्यंक्या–"

"काय मास्तर?"

"याचे तोडगे तरी काय असतात मला सांग!"

"कशाचे?"

"या गोष्टी जमवायचे."

माझा हा प्रश्न ऐकल्यावर त्या ज्ञानी विद्यार्थ्याने माझ्याकडे क्षणभर टक लावून पाहिले. त्याच्या दृष्टीत थोडीशी संशयाची छटा असावी. पण माझा चेहरा तपस्व्यासारखा गंभीर होता. ते पाहून तो शांत झाला. म्हणाला,

"तुमाला ते कशापायी पायजेत?"

"उगीच आपलं, सहज."

"मग सांगतो."

"सांग."

"अगदी कंप्लेट सांगतो मास्तर."

असे म्हणून व्यंकूने घट्ट मांडी घातली आणि पान थुंकून टाकून तोंड मोकळे केले. मग एक तासभर अस्खलितपणे तो बोलत राहिला. आपले सगळे अनुभव आणि ठोकताळे त्याने सांगितले. त्याच्या त्या बोलण्यावरून मला एवढे कळले की, या मोहिमेवर निघणारा माणूस घट्ट काळजाचा आणि बेरकी असणे अगत्याचे असते. प्रसंगी जोडपट्टी व्हायची पाळी आली तरी ती पचवायची त्याच्यात ताकद पाहिजे. सुरुवातीला चार चांगली ठिकाणे हेरून तेथे अष्टौप्रहर गस्त घालण्याचे काम त्याने अत्यंत चिकाटीने आणि निरलसपणे केले पाहिजे. या प्रकारच्या बायका रस्त्याने ठुमकत चालतात, तिरप्या नजरा टाकीत फिरतात आणि उगीचच खुदकन् हसतात. अशा बाईचा शोध लावणे हे काम.

त्यानंतर त्यांच्या घराचा ठावठिकाणा लावणे, तिथे डोळ्यांत तेल घालून पहारा करणे, त्यांच्या जाण्यायेण्याची ठिकाणे पाहून ठेवणे, या गोष्टी बेताबेताने सुरू कराव्या लागतात. मग हळूहळू जमू लागते. हे सगळे पथ्य नियमितपणे पाळावे लागते. वेळप्रसंगी चार पैसेही खर्च करावे लागतात. हे प्रकार एकदा पार पाडले म्हणजे संपले. तुमचे काम झाले. पण हे काम एकंदरीत फार कष्टाचे आणि जिकिरीचे असते. एखाद्या शिकाऱ्यासारखी तुमची दृष्टी शोधक आणि सावध असावी लागते. गैदीपणा किंवा घाबरटपणा दाखवून आलेली संधी दवडणे, हे या शास्त्रात फार मोठे पातक समजले जाते. इतकेही करून जमले नाहीच तर सुखदुःख समान मानून संथपणाने दुसरीकडे मोहरा वळवावा लागतो.

व्यंकूने सांगितलेली ही माहिती ऐकून मी तोंडात बोट घालण्याच्या बेतात होतो; पण तोंड पानाने भरलेले असल्यामुळे मला तसे करता आले नाही. तथापि एवढी गोष्ट खरी की, या लहानशा आयुष्यात माझ्या या विद्यार्थ्याने फारच बहुमोल अनुभव गोळा केले होते. त्यांची किंमत कशानेही करता येण्यासारखी नव्हती.

प्रश्न विचारला त्या वेळी माझ्या अंगात बराच उत्साह होता. पण ही सगळी माहिती ऐकल्यानंतर मला थोडासा घाम आला. चेहरा हताश करून मी म्हणालो,

"गड्या, हे तू मला उगीच सांगितलंस."

"का बरं मास्तर?"

"मला या माहितीचा काय उपयोग?"

"का न्हायी?"

"मला हे सगळं जमेल असं वाटत नाही."

हे ऐकून व्यंकूचा चेहरा उजळला.

"मास्तर, हे अवघड शास्त्र हाय. पण तुमी कच खायचं काम न्हायी. तुमी टैट रहा. तुमालाबी जमंल. केलं म्हंजे होतं."

आता मी त्याच्या कलानेच घ्यायचे ठरवले. म्हणून आनंदित मुद्रेने म्हणालो,

"खरं म्हणतोस?"

"अगदी खरं. आईच्यान् खरं."

"ठीक."

"असल्या बाया मास्तर, आर्जंट वळखू येत्यात."

"ते एक बरंच आहे म्हणायचं."

"आता तुमी मास्तर पयल्यांदा आसं करा–"

"कसं?"

"अं...तुमाला शिट्टी घालता येती का?"

मी शरमून म्हणालो.

"नाही बुवा."

"अराराररा..."

"काय झालं?" मी घाबरून विचारले, "शिट्टी वाजवायला आलीच पाहिजे म्हणतोस?"

"तर!...अवो, त्याच्याशिवाय फुडं एक पाऊल टाकाया यायचं न्हायी तुमाला. दर ठिकानी त्याची जरूर लागणार. घरापाशी लागणार, देवळापाशी लागणार, वढ्यात लागणार—"

हे शीळ-प्रकरण एकूण महत्त्वाचे होते. व्याकरण आल्याशिवाय जशी भाषा येत नाही, तसेच हे होते म्हणायचे! आधी शुद्धलेखन, मग लेखन. हे शाळेतले तत्त्व मला आठवले आणि व्यंकूचे म्हणणे मला पटले.

मग मी म्हणालो,

"खरी गोष्ट, पण त्यावाचून अडून कसं चालेल? तूर्त बाजारातील शिट्टी आणून वाजवली तर चालेल का?"

"छट्...त्यानं काय हुनार?"

"माझी स्काऊटची शिट्टी आहे. छान वाजते. ती आणू का?"

माझ्या या बोलण्यावर व्यंकूने मान हलवून निषेध व्यक्त केला. तेव्हा मी गप्प बसलो. तोही गप्प बसला. मनाशी विचार करीत राहिला. मग पाटीदप्तर उचलून म्हणाला,

"उद्यापासून पयल्यांदा हे काम शिकायचं मास्तर. मग फुडचं फुडं."

आणि निघून गेला.

त्यानंतर पुढच्या चारआठ दिवसांत आमचा हा कार्यक्रम रोज चालला. गावाबाहेर माळावर जाऊन आम्ही दोघेही शिट्ट्या वाजवीत बसू लागलो. दोन्ही हातांची दोन बोटे जीभेला लावून आणि जीभ आत वळवून मी तोंडाला फेस येईपर्यंत शिट्टी वाजवत राहिलो. दहापंधरा दिवसांतच माझ्या मुखातून कर्णकर्कश आवाज बाहेर पडू लागला आणि त्यामुळे आसपासचे सगळे वातावरण दुमदुमून जाऊ लागले. अहोरात्र मला शिट्टी वाजवण्याचा नाद जडला. त्या काळात झोपेतसुद्धा मी शिट्टी वाजवीत होतो, असे मला आढळून येऊ लागले. कारण झोपेतून जेव्हा मी जागा होई तेव्हा माझी दोन्ही हातांची बोटे तोंडात खुपसलेली दिसत. फार काय, शाळेतही मी एकदा शिट्टी वाजवून दाखविली, तेव्हा पोरांनी शाळा डोक्यावर घेतली. खुद्द व्यंकूने मला शाबासकी दिली.

अशा रीतीने त्याच्या देखरेखीखाली या शास्त्रातले शुद्धलेखन मी शिकलो. पहिला धडा पूर्ण झाला. दुसऱ्या धड्याची वाट पाहू लागलो.

पण पुढचे धडे व्यंकूकडून घेण्याचा माझ्यावर प्रसंगच आला नाही.

एके दिवशी नेहमीप्रमाणे तो माझ्याकडे आला नाही. आणि मग दोन दिवस, चार दिवस गेले, आठवडा लोटला, तरीही तो आला नाही.

मी चौकशी केली तेव्हा कळले की, एकाएकी बोलावणे आल्यामुळे तो आजोळी गेला आहे. परत कधी येईल याची निश्चिती नाही.

महिना दीड महिना लोटला आणि तरीही तो आला नाही.

या दीड महिन्यात माझी पुष्कळच प्रगती झाली. पानतंबाखू खाऊन लावणीची ओळ गुणगुणत मी काम करायला शिकलो. गुरुचरित्र, शनिमाहात्म्य ही भाकड पुस्तके अडगळीत टाकून देऊन मी 'तोतामैना', 'गुलबकावली', 'शुकबहात्तरी' ही गमतीदार पुस्तके नियमाने वाचू लागलो. तोंडातली लाळ पुसत पुसत आणि वरचेवर जीभ बाहेर काढीत वाचू लागलो. फार काय सांगावे, कुणाचीही भीती न बाळगता तमाशाच्या कनातीत एकट्याने जाऊन उभा राहू लागलो. मोट्ठा आरडाओरडा करीत हसू लागलो. काही काही वेळा तर बेदरकारपणे मी तोंडात बोटं खुपसून कानठळ्या बसवणाऱ्या शिट्टयाही फुंकल्या. एकंदरीत माझ्यात फारच सुधारणा झाली.

आणि मग एके दिवशी रात्री अचानकपणे व्यंकू खोलीवर आला. फार दिवसांनी माझा हा गुणी विद्यार्थी परत आला.

त्याच्या हातात पाटीदप्तर नव्हते. कपडेही झकपक नव्हते. चेहरा सुकला होता. उदास तोंड करून तो भिंतीला टेकून बसला. काही न बोलता बसला.

त्याला बघून माझा आनंद गगनात मावेना. तो गेल्यापासून मी काय प्रगती केली होती हे मला त्याला सांगायचे होते. पण त्याची दुःखी मुद्रा पाहून माझी थोडीशी निराशा झाली. मीही गप्प बसलो.

असा थोडा वेळ गेला.

मग मी विचारले,

"व्यंकू, कुठं रे होतास इतके दिवस?"

मान वर न उचलता खालच्या आवाजात तो म्हणाला,

"मामाच्या गावी गेलतो."

"कशाला?"

"मामा आजारी हुता."

"मग मेला काय?"

"त्याला काय धाड झालीया मरायला? हाय बरा. पण मला सोडता सोडीना."

"मग लेका चेहरा का तुझा असा सुतकी?"

माझ्या या प्रश्नाला उत्तर म्हणून त्याने एक लांबलचक शिवी दिली.

मी रागावलो. त्याच्याहीपेक्षा मोठी आणि मार्मिक शिवी देऊन म्हणालो,

"गाढवा, मला शिवी देतोस?"

"तुमाला न्हाई हो मास्तर."

"मग?"

"च्या बायली, त्या बाईला हो आमच्या!"

"का बरं?"

"मास्तर...आज बगा इकल्या दिसांनी मी तिच्याकडं गेलो, बसलो. पन एक अक्षर बोलली न्हायी. मी तापलो तर मलाच गुरकावून बोलली. शेवटाला तर मला घराभायेर काढलं तिनं. कशी बायलीची जात हाय बगा."

व्यंकूचे हे बोलणे ऐकून माझे अष्ट सात्त्विक भाव जागृत झाले. उचंबळून येऊन मी म्हणालो,

"हा नादच वाईट. आता पटलं का तुला?"

व्यंकू काही बोलला नाही. गप्प राहिला. बराच वेळ शांतता पसरली. मग तो म्हणाला,

"पण मास्तर, तिनं आसं कशापायी केलं आसंल?"

त्याला उत्तर देण्यासाठी मी घटकाभर थांबलो. शेवटी एक तरी प्रश्न व्यंकूने असा विचारला होता की ज्याचे उत्तर मला देता येण्यासारखे होते! मग माझे सगळे सात्त्विक भाव जिरून गेले. छाती अभिमानाने फुलली. मान आपोआप ताठ झाली. मग अत्यंत सावकाशपणे मी म्हणालो,

"ती हल्ली माझ्याकडे असते."

पंधरा

# भुजंग

**शंकर पाटील**

दुपारची मोट थांबली तशी जनाई उसाच्या फडातनं बाहेर आली. पाण्याची दारं मोडून मोडून कंबर धरली होती. पाल्यानं कापलेले अंग सारं भगभगत होतं. केव्हा घरात जाऊन पडीन, असं तिला झालं होतं. पण थेट वस्तीवर न जाता, वाट वाकडी करून ती शेंगाच्या वावरात शिरली. आज सोमवार. दोन वेल उपटून घ्यावेत. पोरही चार शेंगा खातील आणि आपल्याही पोटाला जरा आधार होईल म्हणून लगालगा ती शेंगाच्या वावरात आली. भुलल्यागत बघत उभी राहिली. गॅसबत्तीच्या प्रकाशात हिरवागार शालू झागमाग करावा तसं ते वावर चमकत होतं. वर ऊन असलं तरी खाली गार वाटत होतं. शेंगांना आलेली पिवळी फुलं वेलबुट्टीगत दिसत होती. हिरव्या-पिवळ्या रेशमी धाग्यांचा एक रुमालच खाली विणला होता. रात्रंदिवस घाम ढाळून आपल्या हातांनी काढलेल्या त्या कशिद्याकडं बगत जानई थोडा वेळ उभी राहिली आणि एकाएकी एक विमान चालल्याचा आवाज कानावर येऊ लागला. "अगबाई, विमान!" म्हणून तिनं वर बघितलं,पण वर काहीच नव्हतं! नुसतं कोरडं आभाळ पसरलं होतं.

निळंभोर आभाळ. चिटपाखरूसुद्धा नव्हतं आणि रौं रौं रौं असा आवाज तेवढा कानावर येत होता. कुठनं आवाज येतोय हे कळेना आणि झेंडू फुटल्यागत झाला. उभं राहायला नको म्हणून गडबडीनं वेल उपटायला ती खाली वाकली आणि विमान समोरनं अंगावर आल्याचा भास झाला! खाली केलेली मान वर करून बघती, तर समोरच्या चार काकरीचे वेल उलथे पालथे होत होते. भुईमुगाच्या आऱ्या वर उचलत होत्या. आणि पायाखालची जमीन हादरा घेत होती. रौं रौं रौं असा आवाज जवळ येत होता आणि डोळ्यांनी बघितलं! काळ्या ठिपक्यांची एक चार वाव तुळी अंगावर धावून येत होती! "अगबाई,साप!" म्हणून जनाई झटक्याने मागे फिरली आणि जमिनीला पाय न टेकता एक वारं सुटावं तशी पळत सुटली. मागं न बघता थेट वस्तीवर येऊन थडकली. धाबं दणाणून गेलं होतं. तिच्या जिवात जीव नव्हता. पोटात घाबरा पडला होता. अंग सारं घामानं थबथबलं होतं. तोंडावाटे शब्द फुटत नव्हता. वाचाच गेल्यागत झाली होती आणि हातपाय थरथरत होते. ऊर धाडधाड करीत होता. वस्ती कशी गाठली हेच तिला समजत नव्हते. वस्ती गाठली, हे तरी खरं का, म्हणून डोळ्यांनी ती भोवतीभर बघत

होती, मनाची खात्री करून घेत होती आणि आजूबाजूचे सारे भाऊबंद गोळा होऊन येत होते.

बघता बघता सारी वस्ती गोळा होऊन आली. कालवा उडला. "काय झालं आए?" म्हणून पोरं पदराला धरून विचारू लागली. जमा झालेली सारी माणसं तोंडाकडे बघत राहिली. आता काय सांगायचं? ऊर अजून धडधडत होता. कानातला आवाज जात नव्हता. काही बोलणंच सुदरत नव्हतं. आणि कसं सांगायचं? तोवर चुलत सासराही उठून आला आणि विचारू लागला.

"काय झाले जना?"

"उनाची अशी आरडत का पळत आलीस?"

धाप लागलेला ऊर तिला धड बोलू देत नव्हता. घडला प्रसंग कसाबसा तिनं वर्णन केला आणि लोकांच्या तोंडाकडे बघत ती गप्पच बसून राहिली. ते ऐकून सारी वस्तीच भ्याल्यागत झाली. भ्याच पडलं. आपल्या रानात एक भुजंग आहे–पंधरावीस एकर रान हिंडतोय, असं आपल्या वाडवडलांच्याकडून भाऊबंदांनीही ऐकलं होतं.ऐकून सगळ्यांना माहीत होतं. पण गेल्या दहा वर्षांत त्याचं नाव कधी निघालं नव्हतं. कधी कुणाची गाठभेट नव्हती. एकदा दोनदा त्याची कात तेवढी रानात आढळली होती. त्यावर त्याचा कधी दूम नव्हता. कैक वर्षं त्याचा विसर पडल्यागतच झाला होता. त्यावर आज जनाईला दर्शन दिलं होतं. वस्ती सारी चपापल्यागत झाली होती. जनाईच्या पोटात तर खड्डाच पडला. गोळा झालेले भाऊबंद निघून गेले आणि ऐकलेला आवाज कानात घुमत राहिला. एक विमान सारखं फिरत राहिलं.

ना अन्न, ना पाणी! विचार पडला. सुग्गी जवळ आलेली. रातध्यान रानात राबायचे हे दिवस. कसं करायचं? चांद उगवायला मोट धरली म्हणजे पाणी पाजवायला फडात शिरावं लागतं. भाद्दर फडात गाठ पडला तर काय करायचं? दारं मोडताना अकांचित समोर उभा राहिला तर कसं करायचं? आता शेंगा काढायच्या, जुंधळा कापायचा, कसं रात्रीचं खळ्यावर वस्ती राह्यचं? धाकली पोरं रानातनं हिंडायचीसवरायची. कुटं आडवा आला तर कसं व्हायचं?...देवा, कसं होईल माझं?–- जनाईला घोर पडला.

नवरा एक खुळा गाठ पडलेला! बिनकामाचा. कच्चीबच्ची चार पोरं देवानं पदरात बांधलेली. त्या नवऱ्यासंग झडती द्यावी, पोरांचा सांभाळ करावा, रानात राबावं, शेतं पिकवावीत, का आता ही काळजी करावी? कसा पाय टाकायचा रानात? बसेल तिथं बसेल आणि पडेल तिथं पडेल, असा नवरा भेटला! "बाबा का बसलाईस!" म्हणून विचारायची सोय नाही. 'ओ नाम्या आणि सांगकाम्या' असता तरी बरं झालं असतं. "जरा सोबतीला तरी चल" असं म्हटलं असतं. आता एकटीनं कसं रान सांभाळायचं, कशी सुग्गी बडवायची, कसा घरप्रपंच चालवायचा आणि कशी पोरं जगवायची? जनाई महासंकटात पडली. विचार येऊ लागला...नवरा बुद्धीने धड असता तर का अशी पाळी

आली असती? दोघे मिळून रातध्यान राबलो असतो. मग भ्याचं काय काम होतं? फेऱ्यात सापडलेली जनाई विचारात पडली होती. पोरांची तोंड चिमणीगत झाली होती.

आणि खुळा नवरा घुम्यागत आत आला. एक नाही, दोन नाही. "बाई, तू का गप पडलीस?" असे विचारणं नाही, पुसणं नाही. तो मुक्यानंच आत आला आणि भाकरीची बुट्टी तेवढी रिकामी करून बाहेर पडला. अंगणात जाऊन खुशाल बसून राहिला.पोट भरल्यावर रवंथ करीत बसावं तसा बसून राहिला. पडल्या जागेसनं जनाई बघत राहिली आणि तिडीक आल्यागत मनात कळवळली. जेवायचं तेवढं कसं कळतंय? देवानं येवढी बुद्धी कशी दिलीया? त्यात कशी चूक होत नाही बापड्याची? एक दिस तरी चुकायचा होता. टाचकं पडलं तर आनि अंगावर धावून येतोय? कसं करावं?... हातचं उसं करून कलंडलेली जनाई चटशिरी उठली आणि आत भाकरीच्या बुट्टीकडं गेली. एक चतकोर भाकरी त्यात शिल्लक नव्हती! कोरड्यास सारं चाटूनपुसून संपवलेलं होतं. जनाईचं आतडं पिळवटून आलं. आता तिसऱ्या प्रहरी पोरं काय खातील? एकट्यानं खायचं आनि बाकीच्यांनी उपाशी मरायचं? देवानं ह्याला येवढी खाद कशी लावली? ह्याच्या पोटात ही कसली आग पडली?...हातात रिकामी बुट्टी धरून तिने लेकीला विचारलं,

"बाई, तुम्ही जेऊन किती भाकऱ्या होत्या ग बुट्टीत?"

"काय तरी बाराचौदा असतील की. रात्रीच्याबी सकाळीच करून ठेवल्या होत्या."

"अग ह्यात कायच शिल्लक न्हाई की!"

लेक जवळ येऊन उभी राहिली आणि बुट्टीकडे बघत म्हणाली, "मग अप्पानं खाल्ल्या जणू."

"त्योच गिळायला बसलाय बाईऽऽ त्यानंच खाऊन टाकल्या! कुठलं धान्य आणावं आनि आता कसं करावं? ह्या असल्या खादीला आता करू तरी काय?"

असं म्हणत ती कपाळ धरून खाली बसली आणि तिची लेकही पुढ्यात बसून म्हणाली, "आनि आएऽऽ तू उसाला पानी पाजायला गेल्यावर एक मापटंभर तुरीच वट्यात घेऊन खाल्ल्या बघ."

"आता काय करावं गं ह्या भोगाला!"

असं म्हणून बसलेली जनाई उठली आणि रागारागानं एक खुरपं घेऊन पुन्हा शेतात गेली. सोमवारचा दिवस होता. पोटात काही अन्न नव्हतं. काही खाल्ली नव्हती. प्याली नव्हती. बापडी उपाशीतापाशीच रानात गेली. जोंधळ्याच्या रानात जाऊन वैरण करत बसली. केल्याशिवाय निर्वा नव्हता. कोण वैरण आणून देणार? आणि वैरण घातली तर म्हशी धारा काढू देणार! केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतं. रागाची भूल पडून दुपारचा विसर पडला होता. हातात खुरपं खेळवीत ती पुढं निघाली होती आणि एकाएकी विमानाचा आवाज कानावर आला! जनाई बाहेर पळत आली. हातपाय लटपटत होते. ऊर धडधडत होता. हातातलं खुरपं टाकूनच ती बाहेर आली होती आणि मनात विचार आला—वाऱ्यानं जुंधळा वाजत असंल. ती कान देऊन सावचित्तानं ऐकत राहिली.

धौं धौं वारा सुटला होता. जोंधळ्याची धाटं अंगात पीर संचारल्यागत डोलत होती. जरा वेळ बांधालाच उभं राहून तिनं पारख केली आणि का भ्यायचं म्हणून ती पुन्हा जोंधळ्यात शिरली. खुरप्याच्या मागानं आत जाऊ लागली. पडलेलं खुरपं दिसलं आणि ती उभी रहिली. दोन्ही हात जोडून म्हणाली,

"बाबा भगवाना, तारणारा तूच, मारणारा तूच! हो तर तार; न्हाई तर मार. लई झट्याझोंब्या खाऊन प्रपंच चालिवलाय—तू आनि जीव खाऊ नकोस. दाह्रा एक असला गाठ पडलाय, मग मला केल्याशिवाय निर्वा हाय? हे बघ, येत्या अवसाला तुझ्या नावानं नारळ वाडीवतो. त्यात गप हो!"

येवढं सांगून ती खाली बसली. हातात खुरपं घेतलं आणि जीव घट्ट करून कामाला लागली. धरलेला आरा सोडायचा नाही या इराद्यानंच ती खाली बसली आणि दिवसाबरोबर कड लावूनच उठली!

वैरण घेऊन येईतोवर लेक आणि पोरं जनाईची वाट बघत बसली होती. काय होतंय आणि काय नाही, ह्या विचारानं भिऊन गाबागाब होऊन गेली होती. आई रानात गेली होती हे खरं...आधीच वेळ फिरलेली, काय सांगता येतंय? आईला बघून पोरांना बरं वाटलं आणि लेकरांना बघून आईला बरं वाटलं.

जनाई आली. डोक्यावरच्या वैरणीचा भार टाकून उस्स करून खाली बसली. पोरं भोवतीनं गोळा झाली. लेकही येऊन जवळ बसली.जनाईनं लेकीला विचारलं. "सुसे, चूलबिल काय पेटिवलियास का न्हाई ग अजून? काय करून ठेवलयस का न्हाई?"

कपाळाला आठ्या घालून लेक बोलली, "काय करून ठेवायचं?"

जनाई कळवळून म्हणाली,"अग सुसे, सोमार की ग माझा आज! दुपारी ते तसं झालं! पोटात अन्न न्हाई ते जाऊन रानात बसलो होतो! काय तरी करून ठेवलं असतंस तसं आल्याबरोबर आता सोमार सोडला नसता? आता आनि कवा करायचं ग?"

आणखी थोड्या आठ्या घालून लेक सांगू लागली,"मी तरी काय करू? चपात्या कराव्यात म्हणून कनीक भिजवून ठेवली तर कनकेचा सगळा गोळाच उचलून भाईर न्हेला आनि बसून सारी कनीकच खाऊन टाकली की!"

न बोलता जनाई लेकीच्या तोंडाकडं बघत राहिली. आता काय बोलायचं आणि काय ऐकायचं? कसला वाडाचार न लावता ती उठली. आपल्या काळजीतच बाहेर गेली. ताजी आणलेली वैरण सोडली. मूठभर दावणीत विसकटली. मग आत जाऊन हातपाय धुतले. चुळा भरल्या. पोटाला आधार मिळावा म्हणून घटाघटा तांब्याभर पाणी ढोसलं. त्यातलंच जरा थंड पाणी डोळ्याला लावलं आणि एक मूठभर कळणा म्हशीपुढं ठेवून ती लगेच धार काढायला बसली. धार काढून झाली आणि अवचित बोक्यानं येऊन घात करावा तसा अंगणात बसलेला नवरा आडवा येऊन उभा राहिला. भरलेली दुधाची कासंडी त्यानं हातातली काढून घेतली आणि एकदम तोंडालाच लावली! हात पुढं करावा तर दूध सारं भुईला सांडेल म्हणून ती गप्पच बघत राहिली. मनात बोलली,"तू तरी काय करशील?

कुणी तरी केल्यालं हाय. पे बाबा, काय करायचं?" आणि कासंडी रिकामी करून तो पुन्हा बाहेर पडला! अंगणात जाऊन बिनघोरी बसून राहिला. चूल न पेटवता जनाईही भिंतीला पाठ लावून बसून राहिली. नुसती बघत राहिली...एक खेळ बघत बसावा तशी!...खेळच! दुसरं काय? हे देवा, काय जलम म्हणायचा हा! असलं काय कुणी केलं असंले ? काय झालं म्हणायचं हे! असला कसला साप पायांत सोडलास माझ्या!... आणि विमान तरंगत राहिलं. रौं रौं रौं आवाज कानात घुमू लागला...

लेकीनं विचारलं, "आई बसलीस का ग?"

"तर काय करू बाई?"

"सैपाकपानी काय करायचं न्हाई?"

"लाव इस्तू त्येला!"

"सोमार की ग आएऽऽ."

"व्हय बाई, उप्पार्शी पडायचं. सनावारीच त्याला जोर येतोय! काय करून तरी काय पोटात पडनार हाय?"

लेकीनं विचारलं,"मग उपाशी निजायचं?"

"टाक हाथरून."

"च्या तर एक घोटभर करून देऊ?"

"काऽऽय नगो बग..."

...ही झाली का सोमवारची गोष्ट! आणि बघा मंगळवारची सांज! नुकता दिवस मावळला होता. जनाई तांब्या घेऊन पाठीमागच्या वगळीला गेली होती. येता येता घराजवळच शेंडाखाली शेणाचा पू दिसला. चांगली एक पाटी भरेल एवढं शेण पडलं होतं. ते सोडून कसं यायचं? पण हातातनं आणता यायचं नाही म्हणून ती गडबडीनं वस्तीवर आली. आणि हातपाय न धुता आधी एक पाटी घेऊन तिकडं गेली. बरं शेण गावलं म्हणून लगालगा जवळ गेली आणि खाली वाकून हात पुढं करणार येवढ्यात पू हालला! भली जंग चुंबळ उलगडावी तसं झालं. फुस फुस करत बाबा पुढं निघाला. एक खोंड निघाल्यागत उसासा टाकत चालला. आणि विमान सुटलं! रौं रौं रौं आवाज कानावर आला. पाटी तिथंच टाकून जनाई वस्तीवर येऊन हजर झाली आणि निपचिप भुईला पडली...

थोडक्यात चुकामूक झाली होती; नाही तर काय झालं असतं? आज ह्या घटकेला सगळी पोरं परदेशी होऊन बसली असती! काल दिसला नाही तंवर आज! बाबा, का गाठ घ्या लागलाईस माझी? का रोज पाठ धरलियास? चांगलं शेण धरायला म्हणून पाटी घेऊन आलो आणि तू बसलाईस! का भूल पाडलीस रं बाबा अशी? चांगलं दोन्ही हात फुडं करून धरणार हुतो की रं तुला! कवटाळायलाच आलो हुतं की रं बाबा! आता कसं करू ह्या भोगाला!...तिच्या नजरेपुढनं तो ढीग जाईना झाला आणि रौं रौं रौं आवाज कानात बसून राहिला. विमान फिरत राहीलं. हुबेहूब विमान! असला कसला आवाज

काढत असंल? हे काय असलं म्हणायचं हे? बाबा, आता सकाळी पाणी पाजायला फडात कशी शिरू मी? कशी दारं मोडू? कुनाला सोबतीला बोलावू?

जनाईच्या काळजाचं पाणी पाणी होऊन गेलं. आता कसं करायचं? का पाठ धरली असेल? एकदा सोडून दोनदा झालं. अलबत मलाच का भेटत असंल? काय झालं सवरलं तर माझी पोरं कोंच्या वाटेला लागतील। कुणाचं पाठबळ हाय, का काय हाय? हा दाह्ला असला! आता काय करू? कसं करू?... तशीच उठली आणि कुणाजवळ न बोलता सवरता, घडलेली गोष्ट आपल्या मनात ठेवून गप चुलीपुढं बसली. अशान् असं म्हणून बोलावं तर पोरं आनि घाबरून बसतील! ती आनि रातीइरेचं भिऊन उठाय लागली तर काय करायचं? ते आणि कुठं निस्तारत बसायचं? काय काय होतंय काय काय नाही, हे गप बघत बसायचं ठरवून ती चुलीपुढं आपल्या उद्योगाला लागली. काम तरी धड सुधारतंय? काही सुदारेनाच झालं. चुलीवर माडगं ठेवावं म्हणून जाळ लावला आणि भाकरीसाठी पिठाचा डबा जवळ घेऊन बसली! काटवट पुढ्यात घेतल्यावर ह्याची आठवण झाली...देवा? असं का हे? असं का व्हाय लागलंय?... ती चटकिन्या खाली वाकली. दोन बोटांच्या चिमटीनं चुलीतला अंगारा उचलून हातात घेतला. कपाळाला, गळ्याला बोट लावून तिनं चिमूट तोंडात सोडली आणि वर आढ्याकडं बघत ती पुटपुटली, "आता नदरं पडू नगो. येत्या आमुशाला नारळ फोडतो."

अंगारा जिभेवर विरघळला. त्याची लाळ होऊन नरड्यातनं पोटात गेली. जनाईही कामाला लागली. माडगं तयार झालं. गुमान पोरांना तेवढं वाढावं आणि मग नवऱ्याला हाक मारावी म्हणून उठली. चोरून पोरांनाच तेवढी खुणावून आत आली. बापाला न कळता पोरंही पटापट आत येऊन बसली. सकाळपासून एक चतकोर भाकरी कुणाच्या वाटणीला आली नव्हती. सगळीच व्याकळून गेली होती. भुईचा आवाज होईल म्हणून घंगाळ अधांतरी हातात धरून गपचिप बसली होती. प्रत्येकाच्या घंगाळात जनाईनं ऊन ऊन माडगं वाढलं आणि हातानेच खुणावून म्हणाली,"आटपा भराभरा." तोवर पायाचा आवाज कानावर आला आणि बाबा आत येऊन हजर झाला! सगळीच येडबडली. घंगाळ हातात धरून पोरं तोंडाकडं बघत राहिली आणि आत येऊन उभा राहिलेला त्यांचा बाप खाली वाकून एकेकाच्या हातातलं घंगाळ हिसकावून घेऊ लागला. जनाईच्या पोटात भडका उडाला. ध्याई सगळी पेटल्यागत झाली आणि त्याच्या धोतराला धरून ती म्हणाली,"आधी पोरांचं घंगाळ सोड. चुलीवरचं हे सगळं माडगं तू एकटा तोंडाला लाव, पर पोरांच्या हातातलं वढून घेऊ नगो."

कासेत हात घातल्यावर म्हशीनं पाय झाडावा तशी उभ्यानंच त्यानं एक लाथ लगावली आणि मागे न बघता पुढे बघून त्यानं घंगाळ तोंडाला लावलं. सणक्यानं मारलेली लाथ लागून जनाई मागं कलंडली आणि जेवायला बसलेली पोरं आरडत उठली. एकानं खच्चून बोंब हाणली. जनाईनं गळा काढला आणि लेक येऊन गळ्यात पडली. भाद्दर हातातलं घंगाळ काही सोडत नव्हता. पोरं अंगाला लटकत होती आणि तो

ऊन ऊन माडगं न फुकता सवरता घटाघटा पीत होता. बोंब ऐकून दोन्ही अंगाचे चुलतदीर धावून आले आणि जनाईनं त्यांचे पाय धरले. त्यांच्यापुढं पदर पसरून ती सांगू लागली,

"अण्णा, आता कसं करू हो? पोरांच्या हातातली घंगाळ वडून खाया लागलाय; आता कसा जीव जगवू ह्या लेकरांचा? एका हातानं बुट्टी उचलून येवढ्या भाकऱ्या सकाळी बडवल्या हुत्या. त्या साऱ्या एकट्यानं गप केल्या! एक चतकूर भाकरी कुनाच्या वाटणीला येऊ दिली न्हाई. आनि आता जरा जरा माडगं पिऊन तर माझी पोरं निजतील म्हणून हे गाडगं उतरलं, तर तेबी त्यांच्या पोटात पडू दिना झालाय. त्यांच्या हातातलं वडून घेतलं बघा! नुस्तं बगुं नगा भाऊजी. दोघंचौघं जन मिळून जरा पालथा घालून तुडवा तरी ह्येला! किती झडती देऊ ह्याच्यासंग! आनि कसा जीव जगवू?"

धावून आलेल्या त्या चुलतदिरांनाही कळवळा आला आणि अंगानं धडधाकट असलेला इरगोंडा हातात एक काठी घेऊन पुढं झाला. आधी त्याच्या पाठीत एक पेट्ट घालून बोलला,

"पोराच्या हातातलं हिस्कावून घेऊन खाया लागलाईस? कसलं खूळ लागलंय बघतोच तुला!" असं बोलून तो जनाईला म्हणाला,"वैनी, तुम्ही आणि पोरं जेवायला बसा. काठी घेऊन मी हितं हुंबऱ्यावर बसूनच ऱ्हातो. गप ऱ्हायला तर बरं, न्हाई तर आज ह्येला इनामपट्टीत न्हेऊन माती देऊनच मोकळा हुतो! ह्याचा जीवच ठेवायचा न्हाई बघा आता. घ्या वाढून घ्या, तुम्ही."

पाठीत पेट्ट बसून तो भुईला डब पडला होता. दोन्ही हात मागं वळवून पाठीवर मनगट घासत कळवळत होता. एका टिप्पिऱ्यातच त्याची गर्दी उडाली होती. जीव सारा गोळा होऊन आल्यागत तळमळत होता. त्याला असं पडलेलं बघून जनाई म्हणाली, 'बाळानू आटपा रं. त्याला उठाय येत न्हाई तंवर जरा खाऊन घ्या. भुईचा उठला म्हंजे आनि काय तुमच्या तोंडात पडू द्यायचा न्हाई."

अन्नाला बघून कुत्र्याचा खांड धावून यावा तशी लांब पसलेली पोरं चुलीजवळ गोळा होऊन आली. इरगोंडा हातात काठी घेऊन बसूनच होता. जनाईनं पोरांना वाढलं. लेकीला आणि आपल्यालाही वाढून घेतलं. पोरांनी एकेक भुरका मारला आणि कासावीस होऊन भुईला पडलेला गडी कशाला न जुमानता पुन्हा उठून बसला! एका डोळ्यानं जनाईकडं बघत त्यानं आपला एक हात लांब केला. वेटोळा घालून बसलेल्या नागानं भस्कन एकदम फडी काढावी तसा! वाढून घेऊन जेवायला बसलेली जनाई तोंडाकडं बघतच राहिली. एकाएकी डोळ्यात चटणी पडल्यागत झाली. पुढ्यातलं घंगाळ तिनं बाजूला सारलं आणि डोळ्याला पदर लावून ती बोलू लागली,"भाऊजी, कसं अन्न तरी गिळू मी? ही असली कसली हाव सुटली असल ह्येला?"

त्यानं लांब केलेल्या हातावर एक काठी घालून इरगोंडा म्हणाला, "तुम्ही फुडं बगून गप जेवा वैनी. त्यो जागचा उठला तर त्याचा आज जीवच घेतो!"

"आता कशी जेऊ भाऊजी?"

"खुळं का शानं वैनी!" असं म्हणून इरगोंडा डाफरून बोलला,"गप जेवा बगू मुकाट्याने. अशाने उपाशी मरून जाशीला. तुम्हास्नी काय, पोरास्नी आई मिळायची न्हाई. गप जरा खाऊन घ्या."

त्यानं समोर बसून जुलमाने जेवायला लावलं. रात्रीपुरता सगळ्यांच्याच पोटाला आधार झाला. मग चुलीवरचं गाडगं त्याच्या स्वाधीन केलं आणि जनाई पोरांना घेऊन बाहेरच्या सोप्याला येऊन बसली. सगळी अशी बाहेर गेलेली बघून त्यानं आतनं कडीच घालून घेतली! दार बंद करून तो आत बसला. आणि मग आता झोपायचं तरी कसं? मध्यानरात्र झाली तरी भाद्दरानं कडी काढली नाही. डबे एकसारखे धाडधाड वाजत राहिले. काय करतोय काय नाही काही कळेना झालं. कान आत लावून बाहेर बसायची पाळी आली. दुसरे लोक सोबतीला तरी किती वेळ येऊन बसणार? मध्यानरात्र झाली, तशी तीही उठून गेली. कामाधामाच्या लोकांना झोप सोडून बसा तरी कसं म्हणायचं? भरलेला सोपा असा रिकामा झाला आणि जनाईला एक बनात सापडल्यागत झालं! पोरांना पोटाशी धरून ती गप बसून राहिली. एकाएकी मनात शक आला आणि बेतानं उठून तिनंही हळूच बाहेरनं कडी लावून घेतली. काय करणार? लोक सारे झोपलेले बघून बाहेर आला आणि जिवाला काही धोका केला तर काय करायचं? पण एक काळजी सुटली आणि दुसरी लागली...कडी लावून आत बसलाय; त्यानं आपल्या जीवाला काय करून घेतलं, तर काय करायचं? करून घ्याचं म्हटलं तर काय अवघड आहे? विळा, खुरपं, काय तरी हातात घेतलं तर जीव जायाला किती वेळ लागतो? दोर घेतला आणि वरच्या आढ्याला टांगून घेतलं..काय करायचं?

आणि एकाएकी आतनं दार धडकलं. अंगाचा थरकाप उडाला. पाठोपाठ आवाज आला, "आता गप बसत न्हाई : रगताची आंगुळ घालतो आंगुळ! दार उघड तू नुसतं..."

बाहेरनं कडी घातली होती म्हणून बरं! दार उघडं असतं आणि विळा घेऊन आला असता तर आडवायला आलं असतं? देवानंच शहाणपण दिलं म्हणून कडी घालायचं सुचलं...लोक सारे झोपलेले. दिवसभर कामाने सगळ्यांना गडद झोपा लागल्या होत्या. मध्यानरात्र उलटली होती आणि एक अंगात सैतान संचारल्यागत तो करू लागला. त्याचा हा अवतार बघून सोप्यालासुद्धा बसायचं होईना झालं. बाहेरनं कडी घातली हे खरं, पण रागाच्या तावात दार मोडून बाहेर आला, तर काय करायचं? एका कडेनं सगळ्यांची मुंडकी कापली, तर त्याचं काय घ्यायचं? धाडकन दार वाजलं आणि जनाई पोरांना घेऊन बाहेर पडली. लांब रानात जाऊन उभी राहिली.

रात्र सगळी किर्र्र करीत होती. वारा भणभणत होता. येवढ्यात शेंडातनं पिंगळा बोलला आणि काळीज इंदळलं. अकांचित कानात बसलेला विमानाचा आवाज सुरू झाला!... ह्या रानात झाडाझुडपातनं कुठनं आला तर काय करू? आत घरात आसरा

मिळेना आणि बाहेर जमीन थारा देईना! ही पोरं घेऊन कुठं जाऊ? अपरात्री आता कुणाच्या घरात शिरू? कुणाला उठवू? डोळे फाडून तिनं भोवतीवर बघितलं. बांधाची झाडं भुतागत दिसत होती. झाडाझुडपातनं आवाज येत होते. रात्र भरगच्च झाली होती. काळोखात काही धड दिसत नव्हतं. कर्रर्र असा एक कुठनं तरी आवाज येत होता. पोरं सारी भिऊन गाबागाब झाली होती. कुडकुडत होती. थाडथाड दातावर दात बडवत होते. ऊर धाडधाड करत होता. पदर आलेली लेक जवळच उभी होती. ती म्हणाली,

"आता काय करायचं ग आए?"

"काय करायचं बाई?" ती अशी सुस्कारली आणि अवचित नजर शेंडावर गेली. आभाळ कोसळल्यागत झालं. आणि विमान जवळ आल्यागत भास होऊ लागला. एक भूल पडल्यागत झाली. आता काय करायचं? पुन्हा गप सोप्याला जाऊन बसावं, तर तीही छाती होईना झाली आणि गप इथंच राहावं तर जमीन थारा देईना झाली. धीर करून ती खाली वाकली आणि खालच्या जमिनीची माती शिवून म्हणाली, "हे धरणीमाते, आता आम्हाला कुठं जा म्हंतीस? बाई आता तूच पोटात घे! दुसऱ्या कुनाम्होरं पदर पसरू? हिरीत जाऊन पडलो असतो; पर ही पोरं परदेशी होतील! कुनाच्या जिवावर त्यास्नी सोडून जाऊ? बाई तुझ्या एकटी शिवाय आता आम्हाला कुनाचा आधार न्हाई बग..."

आणि एक चमत्कार व्हावा तसं घडलं! बोलावणं पाठवून दिल्यागत इरगोंडा जवळ आला. दुसरे दीरही उठून अंगणात आले. वस्ती सारी जागी झाली. जवळ येऊन उभा राहिलेला इरगोंडा म्हणाला,"वैनी असं लांब रानात जाऊन का उभा ऱ्हायलाय हो?"

"तर काय करू भाऊजी? रगताची अंगुळ घालतो म्हणाय लागलाय न्हवं? दार मोडून भाईर आला तर काय करायचं?"

इरगोंडानं विचारलं,"मग आम्हाला उठवायचं न्हाई!" धाडधाड दार वाजवताना आम्ही जागं झालो. बघतो तर तुम्ही सोप्याला न्हाई."

"सोप्याला कशी बसू? आणि रातीइरेचं ही पोरं घेऊन कुनाच्या घरात शिरू? भाऊजी, इट्ट आला बगा ह्या सगळ्या जन्माचा!"

"ही रात्र असली! अनि पोरंबाळं घेऊन असं रानात ऱ्हायलाय? काय म्हनायचं?"

"काय करू तर?"

इरगोंडा बोलला, "चला आता, आमच्या घरात एक रात्र काढा चला. असं करून कसं भागल?"

"कुनाला तरास तरी द्याचा? काय एक रोजाचं हाय का दोन रोजाचं? जल्मालाच लागलंय की आमच्या!"

"मग आता काय करायचं वैनी? चला."

असं म्हणून तो पुढं झाला. त्याच्या मागोमाग सगळीच पाय उचलू लागली.

कशीबशी रात्र तेवढी गेली. सकाळी उठून बघतात तर तीच तऱ्हा! आत बसलेला बाबा काही कडी काढून बाहेर येईना झाला. सगळी सकाळ ह्यात गेली. दुपार गेली. पोरं

भुकेनं हडाडून गेली. चुलतदीर या म्हणून सांगून गेले. लोकांचे उपकार तर किती घ्यायचे आणि ते कशाने फेडायचे? कुणाच्या तरी घरात जाऊन आज एकदोन घास खाता येतील, पण रोज कोण घालील! ह्या बाबाला रोज एक लेहेर येणार! रोज कोण सांभाळणार? न जेवताखाता, जनाई पोरांना घेऊन वस्तीवरनं गावात गेली. एका वाण्याच्या दुकानात एक अडीशिरी चिरमुरं उधार घेतलं. त्यात कोळवंभर फुटाणं मिसळलं. एका झाडाखाली बसून मुठमुठभर सगळ्यांनी तोंडात टाकले. जरा तोंड हलवायला आधार झाला आणि मग पुन्हा सगळे वस्तीवर येऊन हजर झाले. बाबा अजून आतच होता!

तिन्हीसांज झाली. कडूसं पडलं, तरी दार उघडेना. तसा पुन्हा घोर पडला. कालची एक रात्र तशी काढली. आज काय करावं? आज आणि कुणाच्या घरात आसरा बघावा? हा काय उपद्रव होऊन बसला!

तिन्हीसांज टळली. अंधार पडला. दिवा तरी कशानं लावायचा? पोरांना घेऊन जनाई अंधारातच बसून राहिली. तोवर रानातली कामं आवरून दीर वस्तीवर आले. इरगोंडा आला. मलगोंडा आला. चुलतसासराही आत येऊन सोप्याला बसला. मोबत मिळाली. वेळ चालला. आता काय करावं, ह्या गोष्टीचा खल सुरू झाला. कुणी म्हणालं, दार मोडून आत जाऊ या. चांगलं जाडजूड घनमुंडी दार! आपल्याच हातानं ते तरी कसं मोडायचं? आणि आत जाऊन तरी काय करायचं? त्याची लेहेर गेल्याशिवाय त्याचा उपयोग तरी काय? अखेर दिरांनी ऐकलं नाही. भली दांडगी एक ऐदान आणली. एक दोघंजण हातात काठ्या घेऊन उभे राहिले आणि दोघांनी मिळून ऐदानानं दार उचललं. भाद्दर हातात विळा घेऊन उभा राहिलेला! तो विळा बघून जनाईचं धाबंच दणाणलं! आपल्या दिराच्याच हाताला धरून मागं ओढत म्हणाली, "बाबानू फुडं जाऊ नगा..."

"तुम्ही गपा वैनी." असं म्हणून दीर पुढंच गेले. रागरंग बघून एकानं एकदम काठीचा वार हातातल्या विळ्यावर केला. विळा पडला आणि सगळ्यांनी एकदम त्याच्यावर झडपच घातली. विळा घ्यायला म्हणून तो खाली वाकला आणि वरनं माराचा पिट्टा उसळला. कुठं आवलगामी लागलं की काय झालं कुणास ठाऊक? एकाएकी तो गप्पगार झाला. कसली हालचाल न करता गपच भुईला पडला. तोंड उचलून बघितलं तर काही निराळाच रागरंग दिसू लागला. तोंडात बोट घालून बघितलं तर ते आत शिरेना! बचाळीवर बचाळी गच्च बसलेली. हे काय झालं, म्हणून सगळीच घाबरली. तोंडाचं पाणीच पळालं. हातातल्या काठ्या टाकून कोणी पाणी आणायला पळालं. कोणी कांदा बघायला आत धावलं. सगळी धावाधाव आणि पळापळ सुरू झाली. देवा, हे काय झालं, म्हणून सगळी येडबडली आणि तावडीत सापडलेला बोका डोळा चुकवून निसटावा तशातली गत झाली! कोण कांदा आणतंय, कोण पाणी घेऊन येतंय तोवर तो उठला आणि डोळ्यादेखत बाहेर निसटला. कुणाला पत्त्या नाही ते पळाला. पाठोपाठ जाऊन बघतात तोवर गुप्तही झाला. गेला, गेला म्हणेतोवर नाहीसा झाला.

घर सोडून सगळी बाहेर पडली. आता कुठं म्हणून बघायचं? कुठं उसाच्या फडात शिरला, का जोंधळ्यात बसला, का आणि कुठं गेला—हे काही कळंना झालं. एक जत्रा भरावी तशी वस्ती सारी गजबजून गेली. चूल पेटवून बसलेल्या बायकाही बाहेर आल्या. पोरंबाळं, लेकीसुना, म्हातारीकोतारी सगळीच कावरी बावरी होऊन गेली.कोण ह्या अंगानं गेलं, कुणी त्या अंगानं पळालं, दहा जणांनी दहा वाटा धरल्या. सगळ्या रानाला वेढा दिला. तो कशाला सापडेल? रान तुडवून तुडवून सगळे दमले आणि पुन्हा सगळे वस्तीवर गोळा होऊन आले. गणगौळण संपून वग सुरू व्हावा, तशातली गत झाली. वस्ती सगळी वलावला करू लागली. ह्यातच निम्मी रात्र सरली. दमलेभागलेले लोक घरात जाऊन पडू लागले. जाऊन जाऊन कुठं जाणार, थारा तरी त्याला कोण देणार, पोटाच्या आगीनं तर येईल, असा मनाला ताळा घालून जनाईसुद्धा उठून आत आली. सोप्यातनं स्वैपाकघरात गेली. चिमणी लावून डोळ्यांनी बघत राहिली. एक दांडगी घूस लागावी तशी कळा आली होती. चटर्णामिटार्ची गाडगी सगळी भुईला लवंडली होती. तांदळाचे, गव्हाचे, डाळीचे डबे जाग्स्तानाला नव्हते. त्यांची टोपणं बाजूला पडली होती. धान्य सारं पायात विसकटलं होतं. हात घालून बघावा तो डबा मोकळा होता. मग जनाईनं तसंच सगळं आवरलं. पटापटा पोरंही अंथरुणावर पडली आणि तीही कलंडली. झोप तरी लागती? कशाची झोप! दोनदा-तीनदा उठून दाराची कडी बघून आली. तोवर उजाडलं. गडी येऊन दारात उभा राहिला. आज पाण्याची पाळी...मोट धरायची...छातीत धस्स केलं! पाणी तरी कसं पाजवायचं? दारं मोडायला फडात शिरलं आणि समोर येऊन उभा राहिला तर काय करायचं? रात्री जाऊन फडात बसला असल तर काय त्याचा नेम सांगता येतोय? आधीच दुखवला गेलाय. आसरा धरून फडात बसला असला तर वाटच बघत बसला असलं की! 'आता ये बाई अशी फुडं' म्हटलं तर काय करू?....सगळं येडताक होऊन बसलं. आज पाळी सोडावी तर उद्या मोट धरता यायची नाही. मोट नाही धरली तर उसाला पाणी मिळायचं नाही. ऊस वाळू द्या? तो वाळून कसा चालेल! उसावर तर सगळी भिस्त! त्याच्या जीवावर तर सगळं साल रेटायचं.आनि मग आता कसं करावं? काय व्हैक म्हणायचं हे!....

...बेस्तरवारचा दिवस गेला. शुक्रवार उजाडला. तोवर काही त्याचा पत्ता लागला नाही. फासात गुंतलेला गळा काही मोकळा झाला नाही. आणि मग काही तरी जेवणवेळेला कळलं—बाबा गडद इनामपट्टीत जाऊन बसलाय, अशी बातमी घेऊन चुलतदीर सांगत आला. झालं, आहे म्हटल्यावर आता त्याला घेऊन यायची एक काळजी लागली.उठवून आणायला पाहिजे. गप आला तर आणि बरं! घोर घोर लागून राहिला. जीव सुचित राहीना झाला. एकटीला तर समोर जाता येईल! जनाई उठली. लगेच पलीकडच्या घरात गेली. चुलत सासऱ्याला म्हणाली, "मामा, आता कसं करायचं हो?"

"असं कर–" असं म्हणून तो बोलला, "जना, शानी असशील तर लगालगा वड्याला जा. चांगली बारीक बघून वाळू आण. शेरमापटभर जुंधळं दळल्यागत दळ

आणि पिठात कालवून भाकरी कर एक अडीशिरी पायलीच्या. भला एवढा झुनका करून घे. भाकरीवर घाल आणि बांधून घेऊन जा. लांब ऱ्हाऊन तेवढ्या भाकरी ठेव आणि दर्शन घेतल्यागत करून ये जा की! कशाला आशा धरून बसलियास त्याची?"

"तर काय करायचं मामा?" असं म्हणून जनाई गपगार उभी राहिली. थोड्या वेळानं तीच बोलली. "कसा का असना! त्याच्या नावानं कुक्कू तर लावून घ्याला येतोय. त्यो हाय म्हणून कुकवाला तरी सोबा हाय का न्हाई?"

म्हातारा उसळून बोलला, "त्यो हाय म्हनून अन्नाला म्हाग झालायसा, ह्याचा अगुदर इचार करा!"

"तर काय मग त्याला मारून टाकायचं हाय मामा?"

"न्हाई, बोळ्यानं दूद घालून जतन कर! आनि काढ हालवनवास. पोरं सगळी टाचा घासत मरू द्यात!"

"हेच दिवस काय ऱ्हात्यात?"

"बापडेऽऽ जलम गेला की सगळा यातच!"

डोळ्याचं पाणी पुसून ती म्हणाली,"काय तरी असु द्या. जाऊन घेऊन याला पायजे बगा....त्यो तरी काय करल मामा? कुणी तरी केल्यालं हाय? कितींदी भोगायचं असंल तेवडं भोगायचं."

ह्यात दुपार झाली. चुलतदीर सारे गोळा झाले. देव उठवायला जावं तसे सगळे मिळून त्याला आणायला निघाले. चांगली दहापंधरा माणसं गोळा झाली. खांडच्या खांड इनामपट्टीकडं निघाला. माणसं बांधला आहेत तंवरच गडी चवताळला! दगड अंगावर येऊ लागले. कोण पुढं जाणार? ज्याला त्याला आपला जीव प्यारा. दोन चार दगड अंगावर आले तशी सगळीच माघारी फिरली. गेलेले सगळे वस्तीवर आले. मग जनाईनं कुणाला सांगितलं नाही. गप चुलीपुढं बसून तिनं बुट्टीभर भाकऱ्या बडवल्या.भलं एवढं सांडग्याचं कोरड्यास करून घेतलं. सगळं भाकरीवर घातलं. गटळं बांधून डोक्यावर घेतलं आणि एक पाण्याची कासंडी हातात घेऊन ती एकटीच निघाली...आपण नाही जावं तर कोण जाणार? ठेवंल नाही तर मारंल—काय तरी करू द्या असं म्हणून ती इनामपट्टीत आली. लांबनं बघितलं...बाबा एकटाच बसून होता. भुतासारखा बसून राहिला होता. मनात आलं, एकटाच तरी कसला बसला असंल? काय म्हणून बसला असंल? रातीइरेचं काय भ्या वाटत नसंल बापड्याला? कुणाची सोबत का फिबत? कुणाची संगत नाही फिंगत नाही, कसा जीव तरी गमत असेल ह्यचा? असलं काय झालं असंल ह्यला? कसली लेहेर येत असंल? बांधाला उभं राहून तिनं जरा वेळ विचार केला. विचार तरी त्यात काय करायचा? आपल्या जल्मालाच पुजलंय असं ती म्हणाली. आणि जीव घट्ट करून पुढं झाली. डोळे झाकूनच पावलं उचलू लागली आणि भिर्रर्रकन एक दगड येऊन मांडीवर बसला. जनाई उभ्यानं खाली कोलमडली. दोन्ही हातांत मांडी दाबून

धरली आणि तोंडानं काही वाईटवंगाळ न बोलता, आतल्या आत कळ सोसत ती त्याला लांबूनच सांगू लागली,

"असं मारू नकोस. बापड्या, तुला जीवच घ्याचा असला तर एक दांडगा गुंड घेऊन एकदम डोस्क्यात घाल. पट्टशिरी परान तरी जाईल. पर इचार कर. मी गेल्यावर तुझी कोन कळकळ करनार न्हाई...कुत्रा इचारनार न्हाई."

येवढं बोलून ती उठली. एका हातात भाकरीचं गटळं आणि दुसऱ्या हातात पाण्याची कासंडी धरून लंगडी घालतच ती पुढं निघाली. जाता जाताच सांगू लागली, "जीव घेऊन मोकळा हो. मारून टाक. तुझ्याअगुदर मरान आलं तर सोनं होईल माझं! काय वाईट होईल? त्याचं काय भ्या वाटत न्हाई बाबा मला! तसं असतं तर हितं कशाला आलू असतो?"

असं म्हणत समोर जाऊन उभी राहिली आणि एकाएकी त्याचे पाय धरून म्हणाली, "आटीप लवकर. गळा दाब आणि जीव घेऊन मोकळा हो. मग बसून भाकरी खा. तुझ्या आगर्तीचं कोरड्यास करून आणलंय. तिथनं हितवर पाणी घेऊन आलोय. माझा परान घे आनि थंड मनानं बसून जेव. माझ्या हातची शेवटची भाकरी खा. त्यात माझं सऽऽगळं आलं."

खुळा दाल्ला बघत राहिला. नुसतं तोंडाकडं बघतच बसला. तीही खाली बसली. आणि बघत राहिली. हात पसरून म्हणाली, "असं करू नगासा. लोक धरून न्हेतील आनि खुळ्याच्या चावडीत घालतील. मग कुटं म्हणून बघायला येऊ तुम्हाला! कायमची ताटतूट होऊन बसंल. काय करायचं ते घरात करा. भाईर का असं?"

तो गप बसलेला बघून तिनं भाकरीच गटळं सोडलं. बाजूचं पाणी पुढं आणून ठेवले. तरी एक नाही—दोन नाही.

"का हो असं?"

भाकरी बघून फाडून खाल्ल्यागत करणारा माणूस! आणि तोंड गेल्यागत गप्पच का? माती खाऊ का काय खाऊ असं होऊन गेलं असंल आणि हा असा तोंड शिवल्यागत गपच कसा बसलाय? कोडं पडलं! जनाई येडबडून गेली. ही काय गत झाली म्हणून तोंडाकडं बघत राहिली. असंच तरी किती वेळ बसायचं म्हणून ती म्हणाली, "मग उठा, घराकडं तरी जाऊ या. पोरं पाखरागत वाट बघत बसली असतील."

आणि देवानं वाचा दिली. मान हालवून तो बोलला,"माझी जागा आता हितंच हाय!"

"असं का हो?"

"का न्हाई. मी बोलतोय खरं, पर मेलोय! मी काय जित्ता न्हाई, कुडीत परान न्हाई माझ्या."

"परान न्हाई?"

"व्हय. म्हारं सांग. गनगोतावळा सगळा बोलवून घे. बळग येऊन बघून जाऊ द्या."

घाबरी होऊन ती म्हणाली,"असलं काय बोलतासा हो हे? मला अगुदर माती द्या आनि मग तुम्ही मरायचं बघा म्हणं."

"न्हाई, जागा धरून बसलोय. हीच जागा हाय माझी. हितंच माती द्याची. आटोप लौकर, म्हारास्नी बोलावून आन. आता उशीर लावू नगो."

झरझर अंगावर काटा आला. थंडी वाजून आल्यागत झाली आणि कुड्कुडत ती बोलली, "उठा. मला आता बसायचं होईना झालंय. हे बघा अंगावर काटा कसा या लागलाय!"

"मला आता काय दिसतंय म्हणून दावतीस?"

थंडी वाजून आली आणि तिचं अंग सारं कापू लागलं. झटके आल्यागत हातपाय हलू लागले. ऊर भरून आल्यागत झाला. श्वास लागून धड बोलता येईना झालं. डोळे झाकून ती तिथंच मुरगाळली. आता अंगावर पांघरूण तरी काय घ्यावं? थंडी तरी सोसेना झाली. लाटलाट कंबार हालू लागली. जिवाच्या करारावर ती म्हणाली,

"थंडी सोसना हो. जरा कंबरंवर बसतासा का? आता काय करू...जरा कंबरंवरच बसा."

लांबनं बघतच तो म्हणाला,"मी कसा उठू? मला आता ही जागा सोडायची न्हाई."

अर्ध्या तासानं तिला हुशारी आली. मुरगळून पडलेली जनाई कशीबशी उठून बसली. सावकाश अंगाची माती झाडली. पदर नीट डोक्यावरनं घेतला आणि दाल्ल्याच्या तोंडाकडं बघितलं. त्यात काही फरक नव्हता.बसल्या जाग्यासनं एक गहूभर तो काही पुढं सरकला नव्हता. तोंडावर दुसरं कसलं चिन्ह नव्हतं. मनात आलं-दुसरा एखादा असता तर चटशिरी उठून त्यानं कंबर तरी धरली असती. डोक्याचा पटका काढून अंगावर घातला असता. नुस्ता बसूनच कसा राहिला? हे असलं ह्याला काय झालं असंल? आणि मला असं एकाएकी का व्हावं? चांगलं बोलता बोलता एकाएकी थंडी कशी वाजून आली? हे काय असंल? काय तरी असू द्या... आता हितं बसायचं नाही, म्हणून उठून उभी राहिली. खाली वाकून तिनं त्याचे पाय धरले आणि विनवणी करून बोलली, "पाया पडतो, बाबा ऊठ चल, घरला चल."

पाझर फुटला नाही. जमिनीत एक दगड रोवावा तसा तो बसून राहिला. नाइलाजानं जनाई एकटीच घरला आली. घोर लागून राहिला.

एकाला दोन रोज झाले. तीन रोज झाले. तो एकटाच रानात बसून राहिला. बोलवायला गेलं म्हणजे "म्हारं सांगा—" एवढं म्हणायचा! दुसरं काही बोलणं नाही. चालणं नाही...एकच भाषा! "म्हारं सांगा, गोतावळा गोळा करा आनि माती द्या!" सगळा भोग होऊन बसला! भाकरीही खाईनासा झाला. अन्नपाण्यावाचून हा काही आता जगत नाही असं झालं. जुलमानं जाऊन घेऊन यावं तर कुणाला छाती होईना झाली. सगळं अशुद्ध अन् अवघड होऊन बसलं. काळजी लागून राहिली आणि त्यातच उंडे पौर्णिमा आली आणि जोंधळा कापायला आला. भाऊबंदांनी कापणी सुरू केली. आपलंच तेवढं पीक ठेवावं तर त्याची राखण कोण करणार? मांग-गाड्यांनी रात्रीतनं कणसं खुडून नेली तर काय करायचं आणि सालभर मग काय खायचं? लोकांच्या बरोबरच

आपलाही जोंधळा कापण्याशिवाय गत्यंतर नव्हतं. पण तो कापला आणि हिकडं काय जिवाचा घोटाळा झाला तर मळणी कशी करायची? सगळंच अर्ध सोडून बसायची पाळी येईल. एक कोडंच पडलं. कापणी करावी तर एक घोर, न करावी तर एक घोर. बघू, काय तरी ठरवू, असं म्हणतच विळं चोळून घेतलं. खुरपी पाणी पाजवून आणली. तिन्ही पोरं जरा जरा मदतीला होतील ही आशा धरली आणि मध्येच काय व्हायला नको असं देवाजवळ मागून घेऊन कापणी करायची ठरवली.

आज जोंधळा कापायचा म्हणून जनाई येरवाळी उठली.भराभरा काम आवरू लागली. शेणघाण काढून झाली. दावण मारी झाडून स्वच्छ केली. जनावरांना पाणी दाखवलं. वैरण घातली. धारा काढल्या. लगबगा जाऊन धरलेली दोन रतिबं घालून आली. मग चगाळा गोळा करून धबाधबा शेणी थापल्या. शेणी लावून झाल्या. पाणी भरलं...कामाचं आटपत नव्हतं. एक संपलं की दुसरं उगवत होतं. जनाईचे हात डोंगर उपसत होते. काय करायचं? कुणाला सांगायचं? ज्याला सांगावं तो इनामपट्टीत जाऊन बसलाय! तिथं बसायचं ते खळ्यावर बसला असता तर राखण तरी झाली असती, आता एकटीनं किती टिकाणी मरावं? कापणी, खुडणी, मळणी कशी करावी? करायलाच पायजे...कसं होईल तसं करायचं! तोवर लेक जागी झाली. पासोडीत गुरगुटून निजलेली पोरंही उठू लागली. जनाई चुलीला बोळा देत होती तोवर थोरला पोरगा आनशा येऊन जवळ बसला. मधला कल्लूही आळस देत उभा राहिला. आणि धाकटा रावसाब पायाचा तिडा घालून खांबाला चिकटला. जवळ येऊन बसलेला आनशा म्हणाला,

"आई, भाकरी झाल्या का ग?"

जनाईला राग आला. त्याचा एक गचवटा घेऊन तिनं विचारलं, "देवानं काय मला चार हात दिल्यात व्हय रं? काय तुमच्या बानं हितं चुलीफुडं इंजान आणून बशीवलंय?"

एवढं बोलणं ऐकून पोरं जागी झाली. सगळ्यांनी भराभर तोंडं धुऊन घेतली. आणि न सांगतासवरता हातात विळा घेऊन आनशा म्हणाला.

"आए, आमी फुडं जाऊ?"

"फुडं जाऊन काय करता?"

"आमी कापायला लागतो की."

"आपली शीव बघून आरा धरशीला?"

"व्हय."

आनशा 'व्हय' म्हणाला आणि तिला हरूस झाला. दोनदातीनदा मान डोलवून ती बोलली, "जावा फुडं. काय होईल तेवढं कापा जावा. तवर मी भाकरी बांधून घेऊन येतो."

मायलेकी चुलीपुढं बसल्या आणि तिन्ही पोरं हातात विळे घेऊन सांगायला जवळ आली. त्यांना बघून जनाई उठली. पोरांच्या तोंडावरनं हात फिरवून म्हणाली, "जपून

कापा बरं का बाबानू. इळ्याला धार हाय. ध्यान देऊन ऽऽ कापा. काय गडबड करू नका."

"व्हय, व्हय—" म्हणून पाडी उधळली. कानात वारा शिरावा तशी वाकडी-तिकडी पळत सुटली. रौं रौं रौं जाऊ लागली...नीट जातील का काय करतील? एकमेकाला सांभाळून घेतील का भांडत बसतील? पोरं–पोरं रानात जाणार, काय झालंसवरलं तर काय करायचं? मदत व्हायची दीडदमडीची आणि काय तरी व्हारं होऊन बसलं, तर कसं निस्तरायचं?...कशाला लावून दिलं असं झालं! आता गडबडीनं भाकऱ्या कराव्यात आणि लौकर रानात जावं म्हणून जनाई येऊन पुन्हा चुलीपुढं बसली.

चिपाडांच्या चिमटीत विस्तू धरून लेक नुसती फुंकत बसली होती. घरभर सारा धूर झाला होता. जनाईनं रागानं विचारलं, "काय कराया लागलीयास?"

"थंडीनं पेटेना. मी तरी काय करू?"

"मर्दिनी, ती चिमणी घेऊन पालथी घाल त्यावर!"

असं म्हणून ती स्वतःच उठली. रॉकेल तेलाची चिमणी घेऊन जवळ आली. वरचं टोपण काढलं आणि चिमणी उलटी धरली. फर्रकन एक काडी ओढली. भाडकन् लालपिवळा जाळ झाला––आणि डोलत शेपटीवर उभा राहिला. लेक लांबनं ओरडली,

"अग आए, मागं तरी सर की ग."

तिथंच खाली बसत ती म्हणाली, "तवा आन आगुदर हिकडं."

घासलेला तवा चुलीवर ठेवला. जाळ दणाणत होता. तांबड्या, पिवळ्या, काळ्या जिभल्या तव्याचा बूड चाटत होत्या. चुलीत न मावणारा जाळ वळवळत होता. वायलातनं तोंड काढून बाहेर बघत होता. चिपाडं पेट घेत होती. चुंईसुंईऽऽ असा आवाज काढत मागच्या अंगानं धूर सोडत होती. जाळाचा दणका लागला आणि ओल्या पिठाचा गोळा हातात दामटू लागला.

आणि निम्म्या अर्ध्या भाकरी बडवून झाल्या असतील नसतील एवढ्यात पोरांचा आवाज कानावर आला. "अगबाई, काय झालं!" म्हणून जनाई हातातलं पीठ टाकून उठली. तोवर पोरं ओरडत आत आली. तोंडावर हात घेत आलेली पोरं बघून जनाईची ध्याईच फुटली! हेऽऽदेवा, काय झालं? का आरडत आला म्हणून विचारायला तोंडातनं शब्द उमटेना झाला. येडबडल्यागत होऊन गेलं आणि नुसती डोळ्यांनी बघत राहिली. पोरं अजून आरडत होती. उरी फुटल्यागत दिसत होती. वाऱ्यानं झाड हालावं तसं त्यांचं अंग लडबडत होतं. घामानं अंगावरची कापडं भिजून चिंब झाली होती. आणि थंडीनं गदगदल्यागत करून आनशा बोलला,"साप ग!"

"अरं भगवाना! कुठं रं बाळांनू?"

दातावर दात बडवत तो सांगू लागला,"आमच्या जुंधळ्यातच ग आए, धावत हुता. लई दांडगा हाय! जंगच्या जंग."

आणि असं म्हणून त्यानं तोंड पसरलं आणि दोन्ही हातांनी आईला मिठीच घातली. कल्लू आणि रावशाही ओरडू लागले. घाबरी झालेली जनाई विचारू लागली,"शिवला न्हाई न्हवं?"

"न्हाई."

"लांबनं बघितलं व्हय?"

"न्हाईग आए, एकदम समोर दिसला!"

"जवळच हुता?"

"व्हयग आए. माझ्याच फुडं आला हुता."

"बघितलं ते पळून आलासा, व्हय?"

"व्हय, इळंबी तिथंच पडल्यात की."

जनाई म्हणाली,"पडू द्यात बाबा. तुम्ही सुकरूप आलासा हेच लई झालं. उठा आता. अंगातला सदरा काडा. भिजून चिंब झाल्यात. पिळून वाळत टाका. आता काय घाबरू नगासा. उठा."

मग पोरांनी अंगातले सदरे काढून दोरीवर वाळत घातले. धागीला चुलीपुढं बसून अंग शेकून घेतलं. जरा ऊब आल्यागत झाली. पोटातला घाबरा कमी झाला. पोरं शुद्धीवर आल्यागत बोलू लागली. आळीपाळीनं वर्णन करून सांगू लागली.... तोच भाद्दर गाठ पडला होता! त्यात काही आता शंका उरली नव्हती. जनाईला विचार पडला, का असा गाठ पडत असंल? कोणत्या जन्माचा वैरी तर नसंल? दाल्ला एक असला! तो उठून रानात जाऊन बसलाय. पोरं तरी जरा मदत करू लागतील म्हटलं, तर त्यांनाही देव करू देईना झालाय! काय नशीब म्हणायचं हे! नशीब कसलं? दविंदर!... दुसरं काही सुचेना झालं. आरूनफिरून एकच विचार मनात घोळत राहिला. —असं जर होऊ लागलं तर कसं करायचं? जोंधळा कापायचा सोडून काय आता गप घरात बसायचं? कितीदा बसता येईल? गडी लावून करून घ्यावं, तर ते तरी काय फुकट होतंय? आणि किती ठिकाणी गडी घालावत मग? उद्या धार काढताना म्हशीच्या पायात आला...मग काय गडी लावून धार काढायची! अशानं तांब्या घेऊन जायाची पंचाईत होईल. त्याला गडी सांगून भागंल? हा काय वैताग होऊन बसला? आज जोंधळा कापायचा आणि काय म्हणून हे असलं गुण दाखवत असंल! आता कशी कापणी करायची आणि काय करायचं! ... काही सुचेना झालं. सारं येडताक होऊन बसलं. जनाईनं मग पोरांना तेवढं वाढलं. तिला तुकडा गिळेना झाला. हे काय नव्हं, असं म्हणाली आणि दोन भाकरी फडक्यात बांधून घेऊन ती उठली. एकटीच रानाकडे निघाली. लेकीनं आडवून विचारलं, "एकटी तर तू कशी जातीस ग?"

"जातो बाई तशीच!" असं म्हणून ती बाहेर पडली. लेकीनं पुन्हा म्हटलं, "थांब की ग आए. मी तरी संग येतो."

"कोन नगो बाई. उपजलो तवा कोन संग आलतं?" असं विचारून ती बोलली, "तुझं अजून व्हायचं जायचं. तू आपली घर राकत बस आनि लईच कळकळ असली तर दोपारनं एक च्याचं ऊन पाणी येवडं घेऊन ये. असला जीव धड तर तेवढा घोटीन."

येवढं बोलून ती लगालगा निघाली. आपली वाट धरून चालू लागली. कशाकशाला म्हणून भ्यायचं? बिनशुद्धी ती रानात येऊन उभी राहिली. एका कडेला उभी राहून न्याहाळू लागली...

हातातोंडाला आलेलं पीक रानात उभं होतं. वाळून पिवळा पडलेला जोंधळा एक पितांबर नेसल्यागत दिसत होता. खुरपं खेळवून खेळवून एकेक धाट जतन केलं होतं. पोरानं चांगलं बाळसं धरावं तसं मनगटागत दिसत होतं. शेरमापट्याचं एकेक कणीस!डोळे भरून जनाईनं सगळं रान बघितलं. नजर फिरत राहिली. चार पेंढ्या होतील येवढी कापलेली धाटं खाली भुईला पडली होती. बेवारशी प्रेतागत त्यांना कळा आली होती. ती तरी कशी गोड दिसणार? इथं एक तिथं एक, असे तीन ठिकाणी तीन विळे पडले होते. हे सारं बघितलं आणि उभं राहूनच रानाकडं बघत जनाई बोलू लागली,

"का बाबा, आमची पाठ घेतलीयास? कशापायी भ्या दावाय लागलाईस? आमच्या रानात वस्ती ऱ्हायलाईस तर आमची राखन करशील का भ्या दावशील? तूच राखन कराय पायजेस. कसं कसं चाललंय ते तू बघतोस नव्हं? कशा तऱ्हेनं दिवस कंठाय लागलोय, हे काय तुला म्हाईत न्हाई! बाबा लई जीव वैतागलाय माझा! वस्तीला हैस आमच्या. लई न्हाई थोडी तरी तुला कळकळ याय पायजे. कुनाचं पाठबळ हाय का सांग बघू आम्हाला? माझ्याशिवाय कोन फुडं होऊन करनार हाय का आमच्या घरात? मग बाईमानसाला इनाकारनी तरास देनं हे तुझं कर्तव्य न्हवं! माझ्या वाट्याला तू जाऊनेस. ह्याच्यापरास काय तुला मी आता ज्यास्त सांगत न्हाई. काय सांगत बसायचं हाय बाबा? तू काय मला परका न्हाईस, मी काय तुला परकं धरत न्हाई. जशी एक भावाला भण, तशी मी तुला हाय असं समज. आनि काय सांगू बापड्या तुला! तुझ्या भ्यानं कापनी केली न्हाई तर हे पीक ऱ्हाईल? कुनाचं कोनबी येऊन रातोरात लुटून न्हेतील बाबा! टाचा घासत मरायची पाळी ईल माझ्या पोरास्नी! माझ्या मालकाला अडिशिरीच्या भाकरी एका येळला फुरं पडत न्हाइत. कसं दिस कंठू मग? काय करून घालू त्याला? हे बघ, कापनी केल्याशिवाय काय मी हितनं माघारी जानार न्हाई! खुळ्या, गड्यास्नी द्यायला माझ्याजवळ पैसा न्हाई म्हणून सगळं घरनं कराय लागलोय. धाकटं जीव होऊन येवढी पोरं माझी मदत करून लागल्यात—आनि त्यास्नी भ्या दावून हुसकून लावलंस! मग काय म्हणायचं तुला? काय लई शानपना दाखवलास व्हय ह्यात? हे तुझं वागणं खऱ्याचं न्हवं. मी खऱ्याची हाय—मला भ्या न्हाई. तू मतूर इचार कर—हे पाप फेडायला लई जलम घ्यावं लागतील तुला! खुळ्या ऽऽ पोरं माझी उरी फुटल्यागत आरडत आली. काय झालं असलं माझ्या ध्याईचं! तुला इचार हाय कोनच्या गोष्टीचा? हे खरं न्हवं! असं करू ने. तुला अखीरचं सांगतो—पोरं पळून गेली तशी मी जानारी न्हवं! काय तऱ्हेनं मी जलम केलाय

आनि कशी टक्कर देत आलोय, ह्याचा जरा इचार कर. सात काळजाची हाय म्हणून टिकलोय आनि ह्या एका गुडग्याला इचारून आजवर संसार केलाय! दुसऱ्या कुनाला इचारनार? आनि मला भ्या दावतोस? कड लावल्याशिवाय मी काय हितनं हालणार न्हाई बघ! बाबा, घरात जेवायला बसलो; नरड्यातनं घास खाली उतरना झाला. त्या दोन भाकरी फडक्यात गुंडाळून घेऊन आलोय. सांगायचं ते तुला सऽऽगळं सांगितलंय. आता निवांत जरा झाडाखाली बसून भाकरी खातो, तंवर आपला कुठतरी गपगार निघून जा कसा. माझी भाकरी खाऊन झाली म्हंजे मी जुंधळा कापायला लागणार बघ! असं बसून कसं भागंल? दिवस बुडूस्तवर मला सगळं रान मोकळं कराय पायजे. हे बघ, आता शेवटचं तुला हात जोडतो——मी मरायलाच आलोय! काय करायचं हे तुझं तू ठरीव...खाऊ मी भाकरी आता?"

परवानगी घेतल्यागत करून जनाई तिथनं हलली. बांधाच्या एका झाडाखाली सावलीला येऊन बसली. फडक्यातली भाकरी काढून हातावर घेतली आणि रानाकडं बघत निवांत घास मोडू लागली. एक तिथं दोन घटका बसून तिनं सावचित्तानं जेवण केलं. दोन्ही भाकरी तेवढ्या पोटात घातल्या. संग आणलेलं तांब्याभर पाणी वर ढोसलं. डरकन दोन ढेकर आले आणि मग ती उठली. आडवा पदर बांधून रानात शिरली. हातात विळा घेतला आणि मनगटासारखी धाटं भराभरा खाली जमिनीला लोळण घेऊ लागली.

काही तरी निम्मं रान कापून झालं आणि दुपारी लेक चहा घेऊन रानात आली. लांब बांधालाच उभी राहून हळी देऊ लागली.

चहा आलेला बघून जनाई बांधाला आली. कामानं अंग सगळं अवघडलं होतं. पाठीला ओढ लागल्यागत झाली होती. कमरेचा पदर सोडून ती सप्पय खाली बसली. कपबशी आणि चहाचं भगुलं खाली ठेवत लेकीनं विचारलं,

"आई, तुला काय भ्या वाटलं न्हाई व्हय ग?"

"कशाला भ्या बाळगू बाई! सांगायचं ते त्याला सगळं सांगितलं की!"

"काय सांगितलंस?"

"दुसरं काय सांगायचं? एका गुडघ्याला इचारून आजवर जलम केलाय. आम्हांला दुसऱ्या कुनाचा आधार न्हाई–हेच की!"

असं म्हणून तिने एक सुस्कारा सोडला आणि भगुल्यातला चहा ओतून घेऊन कपबशी हातात घेतली. आणि अशी बशी तोंडाला लावणार, एवढ्यात विमान वाजत आलं! रौं रौं रौं करून आवाज उठला.

"अग आई, उठ उठ ग." असं म्हणून लेकीनं बोंब ठोकली आणि ती पळत सुटली. "साप—साप!" म्हणून ओरडत निघाली.

जनाईनं बसलेली जागा सोडली नाही. एका हातात कप आणि एका हातात बशी धरून ती बघत राहिली.

बाबा एका आऱ्यातनं पुढं येताना दिसत होता. वाळवाळवाळ अंग सारं हलत होतं. दोन्ही काकरीतली धाटं थरथर कापत होती. पोटाखाली जमीन रेटत तो समोर बांधाकडंच येत होता. रौं रौं रौं आवाज घुमत होता.

जनाईनं मग आपल्या उजव्या हातातला कप तेवढा खाली ठेवला आणि एक बोट उगारून ती त्याला बोलली, हे बरं न्हवं हंऽऽ! येवढं सगळं गाराणं ऐकून बी तुला कशी अक्कल आली न्हाई रं? आता जरा च्या प्यावा म्हनूनशान खाली टेकलोय आणि तू धावत या लागलाईस व्हय? काय करनार हैस बाबा भेटून? ये!"

आनि तो एकाएकी शेपटीवर उभा राहिला. फासकन भाकरीयेवढा फडी काढून डोलू लागला. थेट जनाईकडं बघतच उभा राहिला!

नजरानजर झाली आणि टक लावून बघत असलेली जनाई रागारागानं बोलली, "का एवढं बघाय लागलायस रं? कुणी बघितलं न्हवतं. तू घे बघून! आनि काय बेत हाय तेवढा सांग एकदा! लई डुलाय लागलाईस? कोन गानं म्हनतंय व्हय हितं? कशाचं गानं म्हनु बाबा! जल्माचं गानं झालंय माझ्या! ऐकलंस!"

आणि असं म्हणून एकवार तिनं पदरानं तोंडावरचा घाम पुसला आणि बशी तोंडाला लावली!

सोळा

# विदेही

**विजया राजाध्यक्ष**

ती खिडकीजवळ विमनस्क, एकटी उभी होती.

नुक्ती दिवेलागण झाली होती. सगळे उदास भासत होते. आभाळात काही तटस्थ नक्षत्रे, एक विचित्र रंगाचा बेडौल ढग, फिक्या अंधाराने माखलेली क्षितिजाची रेषा, दूरात पाण्याचा भास, रस्त्यावर चुळबुळणारी वाहने आणि माणसे, एखादे संकोचलेले, हळुवार झाड. सूक्ष्म सळसळ. मुकाट वाहणारा वारा. कुठेकुठे प्रकाशाची टिंबे. सगळे चिंतनमग्न, एकमेकांपासून विलग. वातावरणाच्या ओटीपोटात दडलेला कोवळ्या रात्रीचा हुंकार.

तो खोलीत आला.

चाहूल लागताच तिने वळून पाहिले.

"हे काय, अशी अंधारातच का उभी आहेस?"

"उगीचच."

नेहमीचेच उडवाउडवीचे उत्तर. त्याला वाटले, तिच्याजवळ जावे, तिला विचारावे....पण त्याचा काय उपयोग होता. ती काही सांगणार नाही, हे त्याला ठाऊक होते.

त्याने जरा शोधाशोध करून एक फाईल हातात घेतली आणि तो निघून गेला.

त्याने जाता जाता दिवा मात्र लावला होता.

त्या विसंगत उजेडाने ती अधिकच दडपून गेली.

तो पुन्हा आला. म्हणाला,"जेवायला किती वेळ आहे?"

"तयार आहे सगळं."

"वाढ तर मला. लवकर झोपणार आहे मी. उद्या लवकर उठायचं आहे. खूप काम पडलंय..."

"चला, पानं घेते मी."

तो निमूटपणे तिच्या मागोमाग गेला. पानावर बसून अन्न चिवडू लागला. मध्येच त्याने तिच्याकडे पाहिले. ती खाली मान घालून घास घेत होती...

जेवून झाले.

आता काय? –आता झोपणे.

तो अंथरुणावर पडला. काही वेळाने ती आली. त्याच्या शेजारी पाय पोटाशी घेऊन पडली. मधूनच ती आपल्या कमरेवरून हात फिरवत होती. मधूनच कष्टाने कुशीवर होण्याचा प्रयत्न करत होती. मधूनच एखादा हलका उसासा टाकत होती. त्याला सगळे कळत होते. वाटत होते, आपल्यामधील फक्त हे चार वितींचे अंतर...पण हे फक्त चार वितींचेच आहे का? ती खूप दूर आहे. एका अनोळखी प्रदेशात, कसे पोचावे तेथे? ते अशक्यच.

आठ दिवसांपूर्वीच नाही का?

ऐन मध्यरात्री जाग आली. डोळे उघडले. समोरच्या इमारतीतील एका खोलीत अजून दिवा जळत होता. त्या दिव्याचा उजेड तिच्या अंगावर पडला होता. तिचे डोळे मिटलेले होते, पण ती चुळबुळत होती. आतासारखीच.

"काय होतंय ग."

"काही नाही."

"मला सांगणार नाहीस?"

"खरंच काही नाही."

ती असे ओढून धरू लागली की तो तिला हलकेच जवळ घेत असे. मग तिचा हट्ट विरघळून जाई. आताही त्याने तेच केले. शब्दांचा उपयोग होईना म्हणून तिला आतुर स्पर्श केला. ती एकदम आखडली. दूर सरकली. जवळजवळ भेदरलेल्या आवाजात म्हणाली, "नको," तिचा तो स्वर ऐकून याला वाईटही वाटले आणि रागही आला.

"नको. बरं तर." तो तुटकपणे म्हणाला. मनातला राग बाहेर पडल्याखेरीज राहिला नाही, पण त्याला आश्चर्य वाटले नाही. या दोनतीन महिन्यांत अनेक वेळा असे झाले होते. त्याने जवळ यावे आणि तिने दूर सरकावे. सातवा महिना लागल्यापासूनच तो तिच्या डवरलेल्या देहाच्या मोहात पडे, आणि ती त्याला टाळू लागे. तिचे दूर, एकटे राहणे....रात्री कधी सूचकपणे, तर कधी स्पष्टपणे, त्याने जवळ येऊ नये असे सांगणे...कधी संध्याकाळपासूनच...असे का? गेल्या खेपेला ती सहावा महिना संपल्यावर लगेच माहेरी गेली. पण ती अशी खासच नव्हती. त्याच्या इतकीच उत्सुक होती. इतका उशिरा त्रास होत असेल का? पण समजायचे कसे? ती काही सांगायला तयार नव्हती. फक्त तिची चुळबूळ जाणवते. या कुशीवरून त्या कुशीवर. कष्ट, ताण. तोही मग ताणलेलाच राही. अधिक काही न बोलता झोपून जाई.

त्या मानाने दिवसा पुष्कळ हलके वाटावे. ती फार दूर नसायची. त्याच्याशी मधूनमधून बोलायची. कधी आजोळी पाठवलेल्या अजितच्या आठवणी, कधी ती हॉस्पिटलमध्ये गेल्यावर त्याने काय करावे यासंबंधीची एखादी सूचना, कधी त्याला धीर देणे, "दुपारी दुपारी काही व्हायला लागलं तर मी लगेच हॉस्पिटलमध्ये जाईन बरं का. जाण्यापूर्वी तुम्हांला फोन करीनच. पण तुम्ही तिकडे येण्याची घाई करू नका." तिचे हे मोकळे शब्द

ऐकून त्याला धीरही येई आणि हसूही येई. रात्रीच काय होते हिला? कधी भरून ठेवलेली बंद बॅग उघडून त्यात आणखी एखादी वस्तू टाकणे...

आठ दिवसांपूर्वीच तिने कपाटावर ठेवलेली ती बॅग खाली काढली.

त्याने विचारले, "हे काय?"

"भरून ठेवते. ऐन वेळी धावपळ नको. आणि धावपळ करायला आहे तरी कोण?"

हे ऐकून त्याला वाटले, आपले चुकलेच. तिला माहेरी पाठवायला हवे होते. पण तिने तेथेच राहण्याचा आग्रह धरला. तिची आईही म्हणाली, "आता तशी हरकत नाही म्हणा. पहिल्या खेपेलाच जरा काळजी असते. बाळंतपणही सोपं आहे तिचं. अजितला मात्र मी घेऊन जाते. म्हणजे तिला जरा विश्रांती मिळेल."

अजित गेला.

घरात ती दोघंच. कितीतरी दिवसांनी.

पण ती व्यग्र, अबोल असायची. दिवसा जरा कमी, इतकेच.

त्या बंद बॅगच्या आसपास वावरताना त्याला ती असहाय भासायची.

तो वरवर म्हणायचा, "वेळ आहे ग अजून. बरं, मी जातो, तू विश्रांती घे."

आणि गोंधळलेल्या पावलांनी बाहेर पडायचा.

घराबाहेर पडल्यावर जिवाला काळजी.

आणि घरी परतल्यावर मनाला ग्रासणारा तो जबरदस्त एकटेपणा.

ती दूरदूरच असायची. स्वतःतच गुंतलेली. त्याच्या प्रश्नांना तुटक उत्तरे किंवा नुसते हुंकार.

त्याच्या मनात हुंकारांचे जाळे, आणि मनावर तिच्या गर्भारपणाचा ताण.

हे सगळे नवीनच. गेल्या खेपेला ती सातव्या महिन्यातच माहेरी गेली. तेव्हा लग्न होऊन फक्त नऊ महिने झाले होते. सलग आणि उत्कट सहवास. पहिली रात्र आणि पहिल्या रात्रीसारख्याच आणखी अनेक रात्री. केव्हा केव्हा एखादी ओथंबलेली दुपारही. फुलवताना, फुलताना, विलीन होताना कुजबुजलेले अस्पष्ट संवाद, कधी रुसवा, समजावणी आणि त्यानंतरचा गहिरा शृंगार. कधी एखादे गाऱ्हाणे आणि त्यानंतरचे एक होणे. हे भोगता भोगता तिच्या पोटी गर्भाची चाहूल. उन्मत्त तो आणि हळुवार ती. काही दिवसांनी तोही हळुवार. रात्री तिला जवळ घेताना तो म्हणे,

"आता जपलं पाहिजे तुला!'

"अं हं."

"अं हं काय?"

ती त्याच्यापासून दूर राहिलीच नाही. माहेरी जाण्याच्या आदल्या रात्रीही. कधी बाळंतपणाच्या विचाराने भयभीत झाली नाही. वेडेवाकडे बोलली नाही. अजाण, स्वप्नाळू अंतर्बाह्य फुललेली. हा तिचा फुललेला देह त्याच्या मनात रुजला होता. त्याखेरीज सर्व काही तो विसरला होता. ती गेल्यानंतरही फक्त तिच्या देहाच्या आठवणी. पत्रांतूनही

तेच. दोनअडीच महिने कसे गेले कोण जाणे. मधूनमधून मनात विचार असायचा, तारीख जवळ आली... मुलगा होईल की मुलगी? या विचाराभोवती दुसरी कसलीही वलये नाहीत. जन्म घेणाऱ्या जीवाची मूर्ती डोळ्यांसमोर नाही. कधी असेही वाटे की, तो नेहमी असा तिच्या गर्भात लपलेलाच राहावा. त्यामुळे ती कशी ओथंबली आहे, भारावली आहे.

एका रविवारी तो खूप भटकला. बाहेर जेवला, सिनेमाला गेला, सुखाने घरी आला. तिचे पत्र कालच आले होते. ते पुन्हा एकदा वाचायचे आणि झोपायचे. तो तिचे पत्र हातात घेऊन पलंगावर पडणार, इतक्यात तार आली. तिला मुलगा झाला होता - सकाळीच. ते वाचून काय वाटले हेच त्याला समजेना. सकाळीच? म्हणजे कदाचित आपण झोपेत असतानाच? त्रास झाला असेल का? जवळ कोणी होते का? ती एकदा म्हणाली होती, "आत कोणाला सहसा येऊ देत नाहीत." त्याला प्रश्न पडला होता का? पण तो काही बोलला नव्हता. आत ती एकटीच होती का? तिने कसे सोसले असेल? सोसताना आपला विचार तिच्या मनात असेल का? त्याने ऐकले होते, काही बायका त्रागा करतात. आपल्या नवऱ्यांना...तसे काही? सुटकेच्या क्षणी, त्या चिमण्याला प्रथम पाहताना तिला काय वाटले असेल? आपली आठवण झाली असेल? सोसताना आणि सैलावताना तिचा देह कसा थरथरत असेल?

प्रश्नांचे काहूर, आणि ते संपताना मनात त्या देहाचीच असंख्य प्रतिबिंबे–तिच्या पत्रातून तिने त्याला सगळे कळवले. मध्यरात्रीच पोटात बारीकबारीक कसे दुखू लागले, पहाट होईपर्यंत आई कशी घाबरलेली होती, टॅक्सी मिळायला कसा त्रास झाला, डॉक्टरांचा 'संध्याकाळपर्यंत होईल' हा अंदाज कसा चुकला, कळा एकाएकी कशा वाढल्या... आणि शेवटचा अर्धातास तर... बाई ग!

पण म्हणजे काय? त्याला समजलेच नाही.

एक महिना होऊन गेल्यानंतर तो तिच्या माहेरी गेला तेव्हा त्याला अजित दिसला, त्याने तिला खोदूनखोदून विचारले. ती फक्त हसली. म्हणाली,

"काही तरीच काय विचारता?"

"इतर कोणाला विचारायला गेलो नाही मी. स्वतःच्या बायकोला विचारतो आहे."

"म्हणून काय झालं? सगळंच काय सांगता येतं?"

"आजपर्यंत सांगितलं नाहीस?"

"ते वेगळं. हे काय सांगणार? आणि सांगून तुम्हा पुरुषांना काय कळणार?"

ती दाद लागू देत नव्हती. त्याच दिवशी त्याला वाटले, ती आपल्यापासून जरा दूर गेली आहे. एरवी प्रसन्न आहे. मुक्तपणे सगळे देते आहे. अधिकच भरली आहे. तिची रुंदावलेली कंबर, आणि उठलेला वक्षभाग...गर्भारपणी भरलेली होतीच, पण हे भरलेपण काही वेगळेच आहे. तेव्हा पोट आणि स्तन एक होऊन गेले होते. मागून सपाट होती.

आता तिचा लग्नानंतरचा कोवळा, लहानखुरा वक्षभाग आठवला. गर्भारपणी तोच ---- उन्नत होत गेला, आणि आता सैलावला. पण दरम्यान काय घडले? कोण जाणे.

ती म्हणाली, "तुम्हा पुरुषांना काय कळणार?"

का कळू नये?

बीज अंकुरताना काय घडते हे त्याला कळूच नये?

या एकाच क्षणाभोवती असा हा घुमट का?

–पण हे विचारायचे कोणाला? ही बंद कवाडे खुली करणे कोणाच्या हातात आहे?

एक क्षणच हे प्रश्न त्याच्या मनात चमकून गेले, आणि तो स्तब्ध झाला. हळू हळू तिच्या उत्कंठ, तुडुंबलेल्या देहात हरवून गेला.

ती प्रसन्न होती. दातृत्वशील...कदाचित दूर....पण तो हे विसरूनही गेला..

म्हणून हे सगळे नवीनच. हे तिचे असहायपण, हे तिचे दूर राहणे. असे का? पहिल्या आठवणींनी ती धास्तावून गेली आहे का? पहिल्या वेळी अनभिज्ञ होती, म्हणून निर्भय होती. आता त्या यातनांतून पुन्हा एकदा जावे लागणार या विचारानेच तर अशी मिटून गेलेली नाही? असेलही. कारण पहिले पाचसहा महिने सगळे ठीक होते. सातव्या महिन्यातच ती अशी अबोल झाली. अजित आजोळी गेल्यावर विशेषच.

"अजितची आठवण येते का तुला?"

"हो."

"घेऊन येऊ त्याला?"

"नको. त्याची उगाच आबाळ होईल."

"तुझ्या आईला सांगू इथं राहायला."

"कशासाठी?"

"तू एकटी..."

"त्यात काय झालं? पहिली खेप थोडीच आहे घाबरून जायला?"

"पण कोणीतरी जवळ असलेलं बरं."

"तुम्ही आहात ना...."

–अशी उत्तरे. आकस? राग? पण कशाबद्दल?

तो विचार करूनकरून थकला. शेवटी तोही तिच्यासारखाच अबोल होत गेला. हे दुसरे मूल तिला नको होते का? ती तसे काही म्हणाल्याचे त्याला आठवत नव्हते. इतके मात्र खरे की, या वेळी नव्या जीवाची चाहूल लागल्यावर ती पहिल्याइतकी खुलली नव्हती. नव्हे, अस्वस्थ होती. एकदा 'डॉक्टकडे जाऊन येऊ का?' असेही तिने विचारले होते. ते कशासाठी? इकडे तिकडे हिंडे. बोलण्यात लक्ष नसे. पण एकदा असे काही होणार याची खात्री झाल्यावर ती वळणावर आली. आणि आता हे असे. समजायचे तरी काय? सुरुवातीला तो बुचकळ्यात पडला, बैचेन झाला, पण नंतर त्याला तिचा सूक्ष्म राग येऊ लागला. दुरावा वाढत गेला.

या दुराव्याचा निरास रात्रीही नाही.

तो नुसताच तडफडत राहिला.

तीन महिने होऊन गेले होते. ती एकदाही जवळ आली नव्हती. मध्यरात्री तो जागा व्हायचा, आणि तिच्या टपोरलेल्या देहाकडे अंधारात पाहत राहायचा. कधी चांदण्याचा तर कधी दिव्याचा उजेड. नागासारखा सळसळणारा, चमकणारा, तेजस्वी देह. काळेभोर केस, नितळ कांती, भिरभिरणारे डोळे, नाक सरळ नसले तरी गोल चेहऱ्याला शोभणारे, किंचित जाड ओठ, बारीक मान, गोंडस हात, निमुळती बोटे... किती पहावे. एक बाळंतपण झाले पण अजून तशीच डौलदार, उमललेली,... सौंदर्य उधळत असलेली. वर्षाव माझ्यावर.

हा देह माझा? मी भोगलेला?

ही सगळी वळणे माझ्या ओळखीची?

यातील सगळी स्थित्यंतरे मी पाहिलेली?

कसे पाहिले? कसे ओळखू लागलो?

संकोच कसा वाटला नाही? मला-आणि तिलाही?

चार वर्षांपूर्वी तिला प्रथम पाहिली. एक अनोळखी मुलगी. काही अंतरावर अवघडून बसलेली होती. डोळ्यांनी टिपला तिचा गौरवर्ण, गोल चेहरा, बोलणारे डोळे आणि जाड पण लाडिक ओठ.

ती आवडली. लग्न ठरले.

लग्न ठरल्यावर एकदा फिरायला गेलो. गर्दीपासून दूर. काय बोलावे हेच कळत नव्हते. मधूनच एखादा प्रश्न, मधूनच एखादे उत्तर. दोघांत काही नाते आहे हे पटावे तरी कसे? हे नाते मानून कसे वागावे? उमगेच ना. तिला काय वाटत होते. कोण जाणे. ती बावरलेलीच होती. संध्याकाळ, उतरणारा सूर्य, वारा, किचिंत अंतर राखून मूकपणे चालणारी ती. कसा धीर आला कोण जाणे. तिला जरा जवळ ओढले. तिच्या हातात हात गुंतवला. मांसल दंड. निमुळती, कोवळी बोटे, मऊ तळहात. धीर करून स्पर्श केला. आणि मग त्या स्पर्शानेच धीर दिला... संकोच विसरलो. तिला उराशी धरले आणि तिचे चुंबन घेतले. ओठाचा लुसलुशीतपणा, मिटलेल्या डोळ्यांच्या लांब, वळणदार पापण्या, किंचित उष्ण श्वास आणि छातीला जाणवलेले तिचे ऊर... मऊ, घट्ट, लहान पण घाटदार... अधिक वेळ असे राहावे... अधिकच भिडावे...पण ती दूर झाली.

पण नंतर मोकळेपणी बोलू लागली. कुटुंबातील माणसे, मैत्रिणी, स्वतः ... आपणही खुललो.

मग तिची चेष्टा, तिचे रागावणे, हे करू नका, ते करू नका, असे तिचे इशारे, हे सगळे काही वेळात!

मग भेटत राहिलो. कधी घरी, कधी बाहेर. किती बोलू आणि किती नको असे व्हायचे. घडलेली प्रत्येक गोष्ट एकमेकांना सांगावी असे वाटायचे. आणि बोलताबोलता

स्पर्शात हरवून जावे असेही वाटायचे... अधिक पाहावे, अधिक कळावे. लग्नापूर्वीच एकदा तिला पाठमोरी पाहिली. कमनीय पाठीची खोल पन्हळ. कमरेखालचा मांसल भाग अस्पष्टपणे दिसावा अशी नेसलेली साडी. अशी ती मागून समजली पण थोडी.

पहिल्या रात्री अशीच पाठमोरी उभी होती. खूप संकोचून. किती मनधरणी केली तेव्हा कुठे सामोरी झाली. आणि हळूहळू आडवी. आडवेपणी देहाला एक वेगळेच वळण. ऊर जरा खाली दबलेले....गोऱ्या, निमुळत्या मांड्या, अर्धे मिटलेले डोळे, गरम श्वास,.. हळुवार, गूढ आवाज. टचटचलेली, समर्थ. त्या उत्तररात्री किती खुलली होती. भाबडेपणाने सगळे काही सांगून टाकत होती तोवरची सगळी रहस्ये. इंग्रजी चौथीत असताना एक दिवस कशी भिऊन गेले। ... आणखी एकदा कॉलेजातल्या मुलाने...असा राग आला!... बोलत राहिली होती. शेवटी आपण म्हणालो, "एवढंच?"

"हो. आतापर्यंत कुणाला सांगितलं नव्हतं. तुमच्यापासून मात्र काही लपवून ठेवलं नाही. ठेवणार नाही."

खरेच, तिने काहीच लपवले नव्हते. जे लपवले होती तेही उकलले होते. आपण तिच्या विस्कटलेल्या केसांवरून हात फिरवत राहिलो...ती झोपली. शांत, विश्रब्ध...

...उठताना पातळ सारखे करणारी. पदर सावरणारी.

पदर काढणारी. पदर घेणारी...

मिटणारी, उघडणारी...

विजेसारखा चमकत राहिलेला, उघडझाप करीत राहिलेला तिचा देह. .

तीन महिने सरले मात्र, तिला कशी उभारी येत गेली! पुन्हा भरलेली, उत्सुक, गर्भारपणीच्या सगळ्या त्रासांबद्दल बिनासंकोच सांगायची–आधीच्याही. कोणी–आज अशा गळून गेल्यासारख्या का दिसता? असे विचारले, की आपल्याकडे पाहून गूढ हसायची.. आपल्याला सगळे ठाऊक, तिच्या देहाची सगळी स्थित्यंतरे, सगळी रहस्ये... चौथ्या महिन्यानंतर तिचे कोवळे ऊर अधिकाधिक पुष्ट होत गेले. पोट टपोरले–आणि नंतर ते उराला येऊन भिडले. पोटावरच्या एकदोन निळसर, उठून दिसणाऱ्या शिरा - एकदा त्या अंधारात दिसल्या होत्या... तीच विद्युल्लेखेचीच आठवण झाली होती. तो आकारणारा जीवही आत सळसळत असे... पोटाचा आकार बदले. रात्री विशेष, पण कधीकधी दिवसाही, इतर माणसे अवती भवती असताना. ती हळूच कण्हे. कोणी विचारी. 'काय झालं?' आणि पुन्हा ती आपल्याकडे पाहून हसे. आपल्याला सगळे ठाऊक. जड, भारावलेली चाल.

मध्यंतरी काय? कोण जाणे।

बाळंतपणानंतर जरा स्थूल झाली होती. उराचा आकार गेला होता. तिला कशाचीच क्षिती नव्हती. पोलक्याची उघडी राहणारी मधली बटणे, भिजून जाणारी छाती... कधी

कळा... अजितबद्दल तक्रारी... दगडासारखे घट्ट ऊर...त्रास व्हायचा. काय होते ते सांगायची.

पुन्हा मूळ आकाराला येऊ लागलेले शरीर. ऊर आक्रसलेले, पोट किंचित सुटलेले, वर्ण जरा कोळपलेला.

–नेहमीसारखीच सरळ, निष्पाप.

पण जरा बदलली का?

अजित मोठा होऊ लागल्यावर जरा अबोल झाली. प्रत्येक गोष्ट मोकळेपणाने सांगेना. एखादी मैत्रीण येऊन गेल्यानंतर त्या भेटीचा साग्रसंगीत वृत्तान्त देईना. एखादे पत्र आपल्याला न दाखवताच टाकून देई. काही होऊ लागले की त्याबद्दल पूर्वी सारखे लगेच सांगत नसे. कधी बाळंतपणाच्या वेळच्या गोष्टी निघत. ती म्हणे, 'नको ग बाई तो अनुभव पुन्हा'.

–पुन्हा तिला विचारण्याचा, जाणून घेण्याचा प्रयत्न करावा आणि पुन्हा तिने उडवाउडवी करावी...

–नक्कीच दुरावली होती.

आपल्या लक्षात कसे आले नाही?

त्या वेळी असे काय घडले?

काही घडले हे नक्कीच. देहावर त्या खुणा आहेत. पण काय?

हे मला का समजू नये?

सांगणे का नाकारले जाते?

आता पुन्हा तेच अद्भुत. पुन्हा ती रसरसू लागली आहे. हे सगळे मी पाहिलेले? भोगलेले?

पण सगळे पाहिलेले नाही. गेल्या खेपेला सातव्या महिन्यातच ती गेली असती तर तिने सगळे दाखवले असते. त्या वेळी आपल्यावर विश्वास होता. आता मुद्दाम दूर राहते. व्यग्र, हरवलेली.

याचेही कारण आपल्या न समजलेल्या रहस्यातच असेल का?

त्याला हे सगळे पहायचे होते. एकदा. फक्त एकदाच. कशी ओथंबली असेल. पोटावरच्या त्या निळ्या रेषा तरारल्या असतील का? आणि...आणि...

पण ती दूर होती.

मनानेही.

आणि देहानेही.

स्वतःतच गुंतलेली. कधी त्याच्याकडे पाठ करून झोपलेली. कधी झोपलेली नसूनही झोपल्याचे नाटक...कधी कण्हणे, चुळबुळणे, मध्यरात्री, पहाटे.. पुष्कळ वेळा ती जागी असल्याचे त्याला जाणवे. पण ती दूरच.

बोलणे नाहीच.

आणि त्यामुळेच अधिकाधिक पेटत चाललेला तो. रात्रीच्या वेळी मनात वादळा सारखी घोंघावणारी ती इच्छा. चार वितींचे अंतर. तिने ओढून धरले आहे. पण म्हणून ते आपल्याला काटता येऊ नये? कधी वाटे, तिच्या प्रतिकाराला न जुमानता...काय करू शकणार आहे ती? कदाचित तीही या आक्रमणाचीच वाट पाहत असेल... पण मग तिचा भेदरलेला शब्द आठवे, 'नको.' स्वतःचीच लाज वाटते. या खेपेलाच असे काय झाले आहे? शरीर असे अनावर का? गेल्या खेपेलाही तीन महिने दूर राहिलो. पण त्यावेळी ती अशी डोळ्यांसमोर नव्हती. माहेरी गेली होती. पहिली तृप्ती अंगावर होती. तिच्या बेहोषीत राहिलो. अस्वस्थ वाटायचे. पण आतासारखे...

एका रात्री तिला म्हटलेही, "का अशी हट्टाने वागते आहेस? सांग तरी. मला हे आता सहन होत नाही."

"काय सांगू? मला त्रास होतो..."

"पण नुसतं..."

"अंहं. काहीच नको."

राग आला. पण धीर झाला नाही.

इच्छा घोंघावत राहिली.

एक दिवस तो नेहमीसारखाच ऑफिसात गेला. जाताना मनात धास्ती होतीच. आजच काही होऊ लागणार नाही ना? तिच्याजवळ कोणीच नाही. ती एकटीच जाईल... मागल्या खेपेसारखाच त्रास होईल... की त्याहून अधिक? तिला तो सोसला नाही तर?... भलतेच काही नाही व्हायचे ना? या विचारासरशी तो धसकला. आणि तसाच मलूलपणे घरी परत आला.

"हे काय?" तिने विचारले.

"बरं वाटत नाही."

तो दिवसभर स्वस्थ पडून होता.

–पण आणखीही एक दिवस. तो ऑफिसात आपल्या खोलीत जाऊन बसला आणि पाठोपाठ सुनंदा नाडकर्णी आली. प्रसन्न, खळखळून बोलणारी. तिच्याशी बोलत राहावेसे वाटले. सन्मुख आणि पाठमोरी. रेखीव वळणे आणि चढउतार...

त्या दिवशी परत येताना शरीराचे वेगवेगळे घाट डोळ्यांना दिसत होते. काही पाहिलेले, काही न पाहूनही डोळ्यांपुढे तरळणारे.

कोणाचे निमुळते दंड...

कोणाची गोरी पावले.

कोणाची खूप बारीक कंबर.

–हे पाहताना काही वावगे वाटले नाही.

हे पाप?

का म्हणून?

ही अतृप्ती. याला जबाबदार तीच.

स्वतःच्या शरीराचा केवढा अभिमान! जणू काही तिलाच तेवढे शरीर आहे!

प्रत्येकाला शरीर आहे. प्रत्येक शरीरात रहस्य आहे. प्रत्येक रहस्य गूढ आहे, आणि प्रत्येक रहस्याला फट आहे. प्रत्येकाला रहस्य ठाऊक असते - निदान एका शरीराचे.

हे खरे का?

मग मीच असा त्या रहस्यापासून दूर का फेकला गेलो आहे?

त्या रहस्याभोवती एक गगनव्यापी घुमट. फट नाही एकही. चिरेबंदी भक्कम.

–या घुमटामुळे एका शरीराचे दुसऱ्या शरीराशी असलेले नातेच तुटते. दोघेही एकमेकांपासून दूर. मध्ये किती नव्हेत, कोस.

अशीच एक संध्याकाळ, ती म्हणाली,

"जेवायला येता ना?"

"इतक्या लवकर?"

"हं, जेवून घेऊ या."

–पण त्याच्या लक्षात आले नाही. तो तिच्या समोर बसला होता. निमूटपणे जेवत होता. त्याने पाणी पितापिता वर पाहिले, ती घास उचलत नव्हती.

"का ग?"

"बरं वाटत नाही." जरा केविलवाणा सूर.

"मग मला आधीच नाही का सांगायचं?" तो एकदम हळुवार झाला.

"म्हटलं, वाट पाहू. आता मात्र..."

"म्हणजे?"

"आता गेलं पाहिजे. म्हणून म्हटलं लवकर जेवून घेऊ. सगळं आवरलं की निघायचं."

"ते सगळं राहू दे. बाईला सांगीन मी. तू धडपड करू नको."

–त्याला काही सुचेना. तो स्वस्थ बसून राहिला.

तिने वेणी घातली. तोंड धुण्यासाठी ती बाथरूमध्ये गेली ती बराच वेळ बाहेर आली नाही. तो बेचैन झाला. नुसता येरझारा घालीत राहिला. ती बाहेर आल्यावर त्याला जरा बरे वाटले.. ती एक गडद रंगाची साडी नेसली. तिने पावडर लावली. काजळ घातले.. अगदी निघतानिघता देवापुढे दिवा लावला. डोळे मिटून, हात जोडून उभी राहिली. आणि देवापुढील कोयरीतील कुंकू कपाळावर लावून घेत म्हणाली, "चला."

तेजस्वी.

शांत, स्थिर.

–इतकी स्थिर कशी?

तो कापऱ्या आवाजात म्हणाला, 'तू हळूहळू ये. मी टॅक्सी थांबवतो."

टॅक्सी हॉस्पिटलच्या दारात. रात्रीची वेळ. शुकशुकाट. सगळे चलनवलन जवळजवळ थांबलेले. जनरल वॉर्डमधील दिवे मालवलेले. व्हरांड्यातून मिणमिणत्या प्रकाशात बुटांचा

आवाज करीत जाणारी नर्स. व्हरांड्याच्या टोकाला एक वळण, आणि डाव्या बाजूला स्पेशल रूमची रांग. जरा पुढे गेल्यावर सिस्टरची खोली, पलीकडे लेबर रूम, ऑपरेशन थिएटर. तो पाट्या पाहत होता. नर्सच्या मागून चालला होता. मधूनच, मागे वळून सावकाश येणाऱ्या तिला विचारत होता, "फार त्रास नाही ना होत?" तिचे उत्तर त्याच्यापर्यंत पोचत नव्हते. नर्सचेही लक्ष तिच्याकडेच अधिक होते. त्याच्या प्रश्नांना तुटक उत्तरे देताना नर्स तिला मात्र आपुलकीने म्हणत होती, "अगदी सावकाश या हं, मी सिस्टरला सांगते."

"डॉक्टर आहेत ना?" त्याने अधीरपणे विचारले.

"आहेत, पण वर आहेत."

"मग?"

"मग काय? सिस्टर तपासतील ना?"

"सिस्टर? मग आम्ही..." तो रागाने म्हणाला.

तिने त्याला हळूच दाबले. "हो हो. डॉक्टरांना कशाला उठवायचं इतक्यात? चला तुम्ही."

तो तिच्याकडे पाहातच राहिला.

ती नर्सकडे पाहून हसली, आणि नर्स तिच्याकडे पाहून.

हा काय कट आहे? पण ती वेळ भांडण्याची नव्हती.

सिस्टरच्या खोलीत आल्यावर ती खुर्चीवर डोळे मिटून, जरा रेलून, बसून राहिली.

"पडता का?" सिस्टरने चिंतेच्या सुरात विचारले.

तिने मानेनेच 'नको' म्हटले.

"दूध घेता का?"

"नको," ती डोळे उघडून म्हणाली.

"कधीपासून सुरू झाल्या कळा?"

"संध्याकाळपासून."

"ही दुसरी खेप ना?"

"हो."

"पहिल्या खेपेला.."

"सगळं नॉर्मलच होतं. फक्त जरा वेळ लागला होता इतकंच."

"कशा येताहेत कळा?"

"आतापर्यंत पोटातच होत्या, आता कंबरेतून."

"अंगावर–"

"हो...मघापासून–"

"मग चला तर आत."

तो हे सगळे कुतूहलाने ऐकत होता. ती उठली आणि सिस्टरच्या मागून जाऊ

लागली. त्याला म्हणाली, "तुम्ही थांबा हं. मी आलेच." तो लेबर रूमकडे जाणाऱ्या तिला पाहात होता. ती मध्येच थांबली व अस्फुटपणे म्हणाली, "आई..." नर्सने तिला सावरले. नर्स समजावणीच्या सुरात म्हणाली, "थांबा जरा. आणि घाबरू नका पाहू. सिस्टर तपासणार आहेत ना आता? चला...". त्याला हे पाहून तिच्याकडे धावावेसे वाटले, तिला जवळ घ्यावेसे वाटले, धीर द्यावासा वाटला. पण ती दूरदूर चालली होती. एका अज्ञात प्रदेशात जणू. त्याला तेथे प्रवेश नव्हता. ती आत गेली. तो एकटा उरला.

एकटा. एका निर्जन बेटावर. जगाशी असलेले सगळे संबंध तुटलेले. भोवती उत्तुंग उफाळणाऱ्या लाटा. गर्द अंधार.या बेटावर वाटा नाहीत. वाटा असण्याइतका मोठा हा प्रदेशच नाही. फक्त तो जेमतेम उभा आहे. काय दिसते? काही नाही. काय ऐकू येते? काही नाही. सगळे कोरे. संज्ञेला काही कामच नाही. किती भयाण आहे! काहीच समजू नये? सगळे असे साकळलेले असावे? ...लाटा येऊ लागल्या आहेत. अंधार अंगावर चालून येतो आहे.

एकटा कोंडलेला.

सोबतीला फक्त आठवणी आहेत.

पहिली रात्र. दुसरी रात्र. रंगलेली आणखी एक रात्र. न रंगलेली आणखी एक रात्र...मोकळे केस...किरमिजी रंगाची साडी....दांडीवर वाळत घातलेला ब्लाऊज... ढळलेला पदर, घट्ट ऊर...गोऱ्या मांड्या झाकलेली...उघडी...

स्त्रीदेहाचे भूत येथे फिरते आहे.

या देहानेच तर सगळे साकडे घातले आहे.

याला अंत नाही.

यात स्थित्यंतरे होत राहणार...हा आणखी देह निर्माण करत राहणार...

युगानुयुगांची बीजे पुंजीत समावून, त्यांना वेटोळे घालून बसलेला स्त्रीदेह.

—निर्माता.

—आणि त्या मस्तीत मला असा दूर फेकून देणारा.

तो डोळे मिटून सुन्नपणे बसला होता.

काळ्या, क्रूर अंधारात वीज लखलखावी तशी ती बाहेर येताना, त्याच्या दिशेने येताना दिसली.

तो खडबडून उठला.

"तपासलं?"

"हं."

"काय म्हणाली सिस्टर?"

"वेळ आहे अजून."

"किती?"

"ते कसं सांगणार? पण बहुतेक पहाटेपर्यंत."

–एवढ्यात नर्सही आली. ती म्हणाली, "तुम्ही सात नंबरमध्ये चला, बिछाना तयार केला आहे."

लहान खोली. दोन खाटा. एक ड्रेसिंग टेबल. तांब्याभांडे. खिडकीला व दाराला पडदे. नर्स म्हणाली, "इथं बटण आहे हं. काही लागलं तर बेल करा. मी आहेच पलीकडे. आणि शांत झोपा. सिस्टरनं गोळी दिली आहे ना आता? झोप लागेल तुम्हांला."

नर्स दाराकडे जाताजाता त्याला उद्देशून म्हणाली, "तुम्ही इथंच थांबताय ना?"

"चालेल ना? काय करू?" त्याला काही सुचेना.

"थांबा..हो, थांबणार आहेत ते." ती जरा क्षीण आवाजात म्हणाली. नर्स निघून गेली.

त्याने तिच्याकडे किंचित नवलाने पाहिले.

तिचा चेहरा आक्रसला होता. तिनं आपल्या हाताने खाटेची एक सळी घट्ट पकडून ठेवली होती. अंग जरा उचलले होते.

"काय ग?" तो घाबऱ्याघुबऱ्या विचारू लागला.

"काही नाही... खूप जोराची कळ आली."

"बेल करू?"

"नको... आता काही वेळ हे असंच होत राहणार."

–तो आणखी सुन्न झाला. कसे सहन होणार हिला? आपण जवळ आहोत. पण आपण काय करू शकणार आहोत? या वेदना तिच्या एकटीच्या आहेत. त्याला आपल्या दुबळेपणाची भयाण जाणीव झाली. तो तिच्याजवळ बसला आणि हळुवारपणे तिच्या केसांवरून हात फिरवू लागला.

"तुम्हांला उगीच त्रास."

"त्रास कसला? वेड्यासारखं काहीतरी बोलू नको."

"आईकडे गेले असते तर बरं झालं असतं. तुमच्यामागची ही कटकट टळली असती. ती आली असती बरोबर. गेल्या खेपेला बिचारी रात्रभर माझ्याजवळ बसून होती. जरासुद्धा हलू दिलं नाही मी तिला. आत गेल्यापासून..."

"शू! बोलायचं नाही. मी आहे. मीही तसाच बसून राहीन. मग तर झालं?"

"खरंच?"

"अगदी खरं."

–वेदना सोसतासोसता ती दुबळी होत होती. घरी म्हणायची, "मी एकटीसुद्धा जाईन. त्यात काय आहे? दुसरी खेप तर आहे."

ते अवसान कुठे गेले?

"किती वाजले?"

"साडेदहा."

"फक्त साडेदहाच? बाई ग! आणखी पाचसहा तास... मला खूप वेळ लागतो. तुम्ही किती वेळ बसणार असे? पडा ना तिथे..."

ती आणखी दुबळी.

आणि तो तर दुबळा होताच.

तिने त्याचा हात घट्ट पकडून ठेवला होता. मधूनच ती तो सोडत होती, खाटेची मागची सळी पकडत होती. मधूनच तिचे अंग ताठ होत होते....पुन्हा सैलावत होते. मध्येच डोळे मिटत होती. कपाळावर आठ्या पडत होत्या..मध्येच डोळे उघडत होती. त्याला म्हणत होती, "तुम्ही पडा ना. किती वेळ बसणार तुम्ही? आता मला झोप येणारसं दिसतंय...तुम्हीही झोपा."

त्याला कळत होते की हे सगळं खोटे आहे. तरीही तो तिच्या आग्रहासाठी दुसऱ्या खाटेवर पडला. लक्ष तिच्याकडे होते. तिच्या ताठरणाऱ्या आणि सैलावणाऱ्या अंगाकडे.

एकटा. एका निर्जन बेटावर.

आणि सोबतीला गतजन्मीच्या आठवणी...

हे त्या वेळी घडले होते...पुन्हापुन्हा घडले होते. आहे.

एक देह निर्माण झाला.. एक देह वाढला. एका देहाने सुख दिले..एका देहाने दु:ख दिले, एका देहाने गूढ ठेवले, गूढ जपले, ते उकलले नाही.... म्हणून एका देहानेच सोसले. एक देह युगानुयुगे सोसत आला...

वेदना अनादी.

म्हणून हा देहही अनादी.

हा दुभंगतो--आणि सांधतो.

मृत्यूच्या सहवासात राहतो–आणि अधिकच जीवन-समृद्ध होतो.

या चमत्काराच्या नुसत्या जाणिवेनेही मी रोमांचित होतो.

या सगळ्यात मी कुठे आहे?

मी असा दूर का?

"जरा बेल करता का?" काळ्या, क्रूर अंधारातून शब्द आले. तो ताडकन उठला. बेल दाबतादाबता म्हणाला,

"फार त्रास होऊ लागला का ग?"

"हं...आता फार वेळ लागायचा नाही असं दिसतंय."

"कशावरून?"

त्याही स्थितीत ती हसली–आणि पुन्हा आक्रसली.

जरा वेळाने घामाघूम होत म्हणाली,

"मला खूप भीती वाटते आहे हो."

"घाबरू नकोस, मी आहे ना? आता नर्स येईल."

नर्स आलीच, तिने नर्सला हलक्या आवाजात काहीतरी सांगितले. नर्स म्हणाली, "मग चलाच, चालत याल ना? की स्ट्रेचरवरून..."

"नको नको."

तिचा आवाज भेदरला होता. ती थरथर कापत होती. घामाघूम झाली होती. असह्यपणे नर्सच्या खांद्यावर रेलली होती... हळूहळू पावले टाकीत होती.

आता ही जाणार? आणि आपण येथेच?

तो झटक्यात म्हणाला, "मी येऊ तुझ्याबरोबर?"

तिने फक्त नर्सकडे पाहिले.

नर्स म्हणाली, "आमची काहीच हरकत नाही."

आणि तो तिच्या दुसऱ्या दंडाला धरून हळूहळू तिच्याबरोबर चालू लागला.

लेबर रूम. एक अरुंद, पातळ गादी असलेली खाट. पायाशी स्टूल. आत येताच तिने त्याचा हात सोडला, आणि ती नर्सच्या मदतीने त्या खाटेवर आडवी झाली, पाय पोटाशी...शरीर आक्रसलेले. मध्येच विव्हळणे. नर्सचे 'स्वस्थ पडा' असे समजावणे. दुसरीही नर्स तिथे आली होती. सिस्टर बाजूला उभी होतीच. ती मध्ये सिस्टरचा हात धरीत होती. तिच्याकडे असहाय्यपणे पाहात होती.

तो चक्रावला होता. जरा अंतरावर निमूटपणे उभा होता.

दृष्टी भ्रमू लागली होती. कान बधिर झाले होते.

मध्येच देह उचलणारे कोणी एक... "असं काय करता? अशानं आणखी त्रास होईल हं." कोणाचे तरी शब्द.

"आई! सहन नाही होत, सिस्टर!" आर्त आक्रंदन.

...पुन्हा सामसूम.

पुन्हा आई...

चिळकांड्या...

नर्सेसची धावपळ...

तो भानावर आला, जरा पुढे सरकला.

"अजून हव्या तितक्या जोरानं कळा येत नाही आहेत, म्हणून वेळ लागतो आहे." सिस्टर.

"डॉक्टरना बोलवायचं का?"

"छे, काही जरुरी नाही. सगळं साधं आहे. डोकंसुद्धा दिसायला लागलं आहे. आता फक्त दोनतीन कळांत. त्या मात्र भराभरा यायला हव्यात.

तो पुन्हा मागे सरकला. श्वास रोखून तिच्या पायाशी उभा राहिला.

एक घुमट मिटलेली कवाडे. घुमटाभोवती एका देहाचा सक्त पहारा. हा देह किती विलोभनीय. प्रत्येक वळणावर गुंतवून ठेवणारा. एका वळणाशी आत ओढून घेणारा आणि पुन्हा बाहेर फेकणारा. घुमट दूरच. कधी या देहाच्या धुक्यात पुसून गेलेला. कधी

या देहाच्या लखलखाटात हरवून गेलेला. एक देह. दुसऱ्या देहाला प्रसवणारा. स्वरात स्वर, शब्दात शब्द, रंगात रंग. हा देहच खरा. हा देह म्हणजेच शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध. या एका देहात किती रस, किती गंध. या एका देहाचे किती वेगवेगळे स्पर्श. या एका देहाची किती वेगवेगळी रूपे. एक कोवळे. दुसरे उमललेले. एक डवरलेले. दुसरे आक्रसलेले. हा देह भोगणे हाच आयुष्याचा अर्थ, आणि तो भोगताना इंद्रिये अपुरी पडतात. सगळे सामर्थ्य पणाला लावून हा भोग सर्वात्मकपणे घेताना त्याच घुमटाची आठवणच विसरते. या भोगातच आनंद. या भोगातच पुरुषदेहाचा संकोच- आणि दूर होणे. त्या घुमटापासून दूर. खूप दूर, जणू त्या घुमटाशी त्याचा कसला संबंधच नाही.

पण एखादा हट्टी क्षण येतो–आणि तो घुमटच नजरेसमोर तळपू लागतो..

का आपण दूर?

का हा पहारा?

..पण हा पहारा आता बेसावध झाला आहे. अर्धा देह स्वतःशी झगडतो आहे, अर्धा देह नाहीसा झाला आहे...ती झोपल्यावर पलंग कसा भरून जावा...आणि ही खाट रिकामीच वाटते आहे.

"आई..." पुन्हा आकांत.

कोणाचा? खाटेवर तर कोणीच नाही...आहे, एक पुसट आकृती आहे.. बेसावध.

आणि त्या आकांताबरोबर एक कवाड किलकिले झाले आहे. घुमट किंचित हलला आहे...अजून हेलावतो आहे.

किलकिले कवाड. आतून डोकावणारे वर्तुळाकार रहस्य, मख्मली... वर फेसाइतकी हलकी, सुकुमार लव...

"ते कुठे आहेत?"

"तुम्हांला बोलावताहेत त्या." सिस्टरच्या शब्दांनी तो भानावर येतो. हलक पावलांनी तिच्याजवळ येऊन म्हणतो, "काय ग?" तिचे डोळे मिटलेले. ती फक्त विचारते,

"आहात ना?"

"आहे, इथंच आहे."

"किती सोसायचं हो... ताकद संपत आली."

–मध्येच सिस्टर ती साखळी तोडते, "बोलू नका म्हटलं ना. गप्प राहा. अगदी गप्प."

पुन्हा तो दूर. तिच्या पायाशी.

"आई..."

एक मोठी लाट. फेस पाण्यात भिजून गेलेला. वर्तुळ आणखी मोठे...

"आता झालंच...फार तर दोनतीन मिनिटं..." सिस्टरचा निःश्वास.

घुमट चक्राकार फिरू लागला आहे. वेगाने. आणखी वेगाने. चक्रे, वर्तुळ.. त्यातले फेस...लाटा. काही लाटा लाल, काही लाटा शुभ्र. या लाटांचे डोळ्यांवर उडणारे तुषार..

भिजलेले डोळे पुसतापुसता हे काय दिसू लागले। ...पांगलेल्या ढगांआडचे सूर्यबिंब.. शेवाळाखालचे स्वच्छ पाणी...असंख्य रूपे...रंग...असंख्य सूर्य...लखलखाट, आकाश नाही, दिशा नाहीत, अध नाही, ऊर्ध्व नाही. सृष्टीही नाही. सगळे आकार - निराकार - या क्षणी दुसऱ्या कोणत्याही सृजनाला बंदीच आहे. आधी त्या कमळातील भ्रमराला बाहेर येऊ द्या.

फेसासारखी हलकी, भ्रमरासारखी काळी लव...पुन्हा लखलखाट. चक्राकार.

मृत्यू, प्रलय, अरण्ये, ज्वाला, विजा, भुते, तुटलेले अंतराळ लोंढे. वळवळणारे सर्प, सगळे गिळंकृत करणाऱ्या, लपलपणाऱ्या जिभा, ग्रास, घोट, संहार...घुमट, फिरतोच आहे...आणि फिरता फिरता त्याच्यासकट अंतरिक्षच नाहीसे झाले आहे.

फक्त तो भ्रमर.

आई.........

ही त्याचीच हाक. तिच्या मुखाने तो बोलतो आहे. सगळीकडे पाणीच पाणी. फक्त भ्रमर चळवळतो आहे, आणि त्या चळवळीने कमळ डोलते आहे. किती हळुवार चळवळ...कमळाला न भेदताच जणू बाहेर येणे, लयीत. ती लय पकडून कमळ गुणगुणते आहे, आई...आई...आई...

"सिस्टर, घशाला शोष पडला आहे. थोडं पाणी..."

"देते हं. आणि आता मी जाऊ का? दुसरी केस आली आहे..."

"नको सिस्टर. तुम्ही एवढ्यात कुठं जायचं नाही..."

"बरं आणि आता घाबरू नका पाहू. अगदी थोडक्यावर आलंय."

"आई..."

कमळ गुणगुणते आहे, आई...आई...आई...

मध्येच गडगडाट, मध्येच ही गुणगुण.

मध्येच बंद, मध्येच खुले.

मध्येच विजा, मध्येच अंधार.

मध्येच डोळे मिटलेले, मध्येच विस्फारलेले.

डोळ्यांसमोर ती केसासारखी हलकी लव..

—आणि क्षणार्धात तो जीव एक उसळी घेऊन बाहेर आला. ट्यांहा....कोवळा शब्द.

"मुलगा!" सिस्टर म्हणाली.

त्याला भरून आले...काही आठवेना...काही दिसेना...काही जाणवेना.. मी कुठे आहे?

ती तरी कुठे होती? खाटेवर कुणी नव्हतेच.

तरी त्याने हळुवारपणे विचारले, "फार त्रास झाला?" आणि उत्तर आले, "अं हं, उलट तुम्हांलाच."

—आणि तो तृप्तपणे तिच्यापासून दूर झाला. तिच्यातच राहून.

सतरा

# प्लॅस्टिकचं विश्व

**कमल देसाई**

देवगडच्या दुसऱ्या अंगाला माणसाचा हात न फिरलेला समुद्र अस्ताव्यस्त पसरला आहे. गावचे लोक सांगतात की हा सागर शापला आहे विश्वामित्रानं. इथे समुद्रस्नान करीत नाहीत. बरं होत नाही कोणाचं. एकदा कामतांची मुक्ता झपाटल्यासारखी पोहून आली आणि अगदी कोवळ्या वयातच गेली ती! तेव्हापासून तर वयात आलेल्या मुलींना इकडे नुसतं फिरकूही देत नाहीत. म्हातारा विठू हरितात्यांना दटावतो,"तुझ्या लेकीला ताकीद दे. सदान्‌कदा त्या समुद्रावर काय नडलेलं असतं तिचं? झपाटलं—बिपाटलं एखाद्या वेळी.." हरितात्या काहीच बोलत नाहीत. त्यांना उमजतं. कामतांच्या घराण्यातल्या मुलींना शापच आहे तो. सावित्री अक्कांचा मात्र धीर सुटतो. "मुक्तावन्संच्या वेळेपासून मी तरी बाई धसकाच घेतला आहे त्या मेल्या समुद्राचा. तू जात जाऊ नकोस अशी वेळी अवेळी."

इश्श. आईचं आपलं काहीतरीच असतं. इथे भीती—भग्नता नाहीच मुळी. उलट उदंड चैतन्य शापाच्या अनिवार्यतेने आणखीच ऋजू झालं आहे. स्फुरत राहिलं आहे. तो एवढासा कण मुठीत मिळाला तर—तिच्या डोळ्यांना केवळ निळं गंभीर हलतं पाणी आणि मऊसूत गुलाबी पुळण भिडते. समुद्राचा खोल नाद प्राणांत भरून घुमतो. आणि ओला खारा वास—वारा भिरभिरून झपाटतो. सकाळ-संध्याकाळ किरणांच्या नाजूक रुपेरी तारेनं गुंफलेलं तलम अंजिरी वस्त्र साऱ्या निळाईवर हळुवार पसरतं. मग पहाटतं, सांजावतं ते तिच्या मनी नवलाईनं जागं होतं. आईला कुठं हे काय माहीत आहे!

तरी आता पाच—सात वर्षे झाली असावीत, 'शिवाजी, अबदुल्ला आणि अबदुल्ला' या फर्मची चार मजली प्लॅस्टिकची इमारत या इथे उघडली त्याला. अवचित एखादा गर्द गुलबशी लांबोळा फुगा तरंगत तरंगत अलगद खाली उतरावा तसे आधुनिक स्थापत्य—कलेतले ते अद्‌भुत कौतुक उभं आहे. वीजवादळाला, आगीधुगीला न जुमानणारं विसाव्या शतकातले हे उद्दाम आव्हान एवढाही रंग न हालता ते असंच राहणार आहे म्हणे!

"खरंच असं असतं का? हे असंच टिकणार आहे?" गायत्री गंभीर झाली आहे. कसंही करून तिला ते समजून घेतलंच पाहिजे. रमेश इंजिनिअर आहे. कदाचित त्याला सांगता येईल.

"हट्...हीच तर गंमत आहे त्यातली. आम्ही कोणी असं सांगितलं असतं तर तुम्ही विश्वास नसता ठेवला. परंतु तो अमेरिकन साहेब आहे ना! बसता आरत्या ओवाळीत. त्यानं कितीही चुकीचं सांगितलं तरी त्याचंच तीर्थ घेणार तुम्ही. हे असले लोक आहेत तोपर्यंत आमच्या कामाचं चीज कोण करतंय! कुठल्याही इंजिनियरला इतक्या दूरच्या भविष्यकाळातलं सांगता येत नाही. त्यानं सांगण्याचं धाडस करू नये. अगं,जगाच्या कौतुकाचा विषय असलेला मनोरासुद्धा आता कललेला दिसला आहे—त्याचा अँगल बदलला आहे. मग?"

बोलताना तो आपल्या थोराड पंजाने कपाळावरची झुलपे मागे सारीत होता. आणि तसे करताना सारे शरीरसुद्धा हलकेच झुलत होते मजेशीर. त्याचा चष्मा सोनेरी काडीचा, रुबाबदार. पण त्याच्या ढांगाळ्या पायाने तो एकदम विनोदी दिसतो. लहानपणी काय छान होता! एवढे देखणे मूल तिने कधी पाहिलेच नव्हते.पण आता तो एखाद्या द्राक्षाच्या फताड्या पानासारखा ओबडधोबड दिसतो. किती गंभीरपणाने, आत्मविश्वासाने बोलतो आहे! पण त्याला मनोऱ्याचे नाव आठवतच नाही आहे. त्याच्या मते गायत्री बुद्धीने बिलकूल बेताची!

"पण तुझा एवढा राग का त्या इमारतीवर? भारतातले हे पहिले अद्भुत. सारे लोक मुद्दाम वाट वाकडी करून बघायला येतात. आणि बांधली आहे अप्रतिम यात शंकाच नाही. आपल्याला प्लॅस्टिक वापरायला अजून युगंच जायला हवीत."

खरंच आहे. कशासाठी एवढा राग? रोज तिथे काम करते ती. पण शिरताना असं वाटतं की जाऊच नये. इमारतीच्या शेजारी ऑफिसातल्या लोकांच्यासाठी दामूकाकांना काही तरी उद्योग हवा म्हणून कँटिनचा पत्रा ठोकला आहे. भटारखाना सरळ आकाशाखालती मिरवतो. कावळे, घारी कधी भाजी उचलतात, कधी बादलीत चोच बुडवतात. कुत्र्यांचा आता सराव झाला आहे म्हणा. धाकल्या इकडे तिकडे न बघता भजी उपशीत असतो. आणि दामूकाका वेळभर अलल्डुरमधल्या राक्षसपार्टीसारखे कँटीन नाचून सोडतात. त्या पत्र्याच्या आश्रयाला डुकरांचा भरघोस संसार सदैव फळतो. एखादे डुक्कर मग केकाटत चीत्कारत नेमकं येतं आणि मोटारीखाली चिरडतं. चिकट रक्ताची धार. दूरचा समुद्र स्वच्छ पुसला जातो आणि घारी गिधाडे गोळा होतात. लोक उचलून का नेत नाहीत लवकर? खूपदा अशी मग कोरडी ओकारीच येते. कधी तरी म्हणे देवगड मोठे व्यापारी गाव होणार आहे. कॉर्पोरेशन होईल, ड्रेनेज येईल, रस्ते होतील—गाव कसे स्वच्छ होईल. सावित्रीअक्काला घेऊन ती एकदा पौराणिक सिनेमाला गेली होती. न्यूज रीलमध्ये हेच तर दाखवलं होतं –सावित्रीअक्काला पडद्यावर आपले देवगड पाहून आनंदाचे उधाण आलं. "अग, हे सुरावंतीचे देऊळ नव्हे? आणि तो समुद्र—बघू दे मला नीट"—तिने डोळे टिपले. चष्मा पुसून पुन्हा लावला. "—खरंच हीच की ती फर्म. काय बाई तरी गाव मोठं झालं! आम्ही लहान होतो तेव्हा कसलं काय आणि कसलं काय! बघता बघता सुधारलं," सावित्रीअक्का पुनः पुन्हा डोळे टिपीत होती. गायत्री मूढपणाने ऐकत होती.

कुणालाच कसं ते कँटीन, ती डुकरं बोचत नाहीत? निदान...जणू ते असंच असायचं. असं असायचं आहे. इतरांच्या डोळ्यांना तो विपरीतपणाच वाटत नाही. एखाद्या दानशूर माणसानं अथांग करुणेनं प्रेरित होऊन कबुतरांसाठी ऐटबाज, रंगीबेरंगी दारादारांचे खुराडे बांधले आहे. दाणे फेकायचे आणि जवळच्या थाळीत, तहान लागली तर पाखरांसाठी पाणी!

"हे या थोर कर्मवीर अण्णासाहेबांचं कर्तृत्व बरं! खरा माणूस. एकदा का काम हाती घेतलं म्हणजे स्वस्थ म्हणून नाही बसायचा. ऊन नाही, तहान नाही; पाऊस नाही, पाणी नाही; रात्र नाही, अपरात्र नाही. काही म्हटलं नाही. सारखा गावासाठी झिजला. सुरावंतीच्या देवळाचा सभामंडप असो की शाळेच्या इमारतीचं काम असो. हॉस्पिटल तरी हवंच होतं ना! निधी जमविताना फार बोलणी ऐकून घ्यावी लागली. पण कर्मवीर अण्णा? खरा कर्मवीर तो! सारं चणे खावे लोखंडासारखं झेललं. हा - आता वाटतं त्यांनाही, वर्तमानपत्रांत नाव व्हावं. सारखं लोकांनी चांगलं म्हणावं. गळ्यात हार घालावेत–असते एखाद्याची सवय–मनुष्यस्वभाव आहे तो. असेना का? पण आज काम तरी तोच करतो आहे ना? इतर कोणी पुढे आले नाहीत. अण्णाला मी काही कमी का सांगतो, 'तू कुठं समारंभात बोलू नको' म्हणून? आपलं हसू होतं. हसतात ती ऑफिसांतली सूटवाली मंडळी! आणि हे त्यांना माहीत नाही?पण ते म्हणतात, 'हसोत बापडी. कर्मण्येवाधिकारस्ते. आपण आपलं काम करावं. ज्ञानेश्वरमाउलीनं तर यापेक्षा दुसरं काय सांगितलं आहे? आम्हाला या शिवराजाच्या भूमीत देवगडचं खरंखुरं नंदनवन करावयाचं.' आणि देवगडचं भाग्य म्हणून असला पुण्यपुरुष लाभला—नव्हे–म्हणजे इतर गावांत असतील असे—असायचेच. असू देत. पण मी देवगडचं खरं आहे ते सांगतो."

कर्मवीरांचं कुठलेही कर्म असो, भारतभूषण चंडिकाप्रसाद त्यांच्या खांद्याला खांदा भिडवून त्यात पडतात. मधूनच प्रसंग येतात. कर्मवीरांच्याबद्दल चंडिकाप्रसाद हेच तयार करून ठेवलेलं उगाळतात. असल्या कशात डोक्याला शीण देत नाहीत–हाडाचा शेतकरी. माती कसता कसता इमला उठवला. तीन मुलींची लग्ने केली–मंत्र्याशी सोयरीक. खाली नाही. त्यांच्या प्रतिष्ठेला सवय नाही. धाकटा मुलगा मध्यप्रदेशात तंत्रज्ञ आहे. आणि थोरला डॉक्टर झाला आहे. असा हा खरा देशभक्त, स्वामिनिष्ठ, कर्मवीरांचा शब्द खाली पडू देत नाही.

'शिवाजी, अबदुल्ला आणि अबदुल्ला' हे नाव पाहून खवळला होता. अबदुल्ला चांगलाच. त्याचं लिहिणं–वाचणं बिलकूल बेताचं. महाकळकट. आपली एवढीशी मोमीन टोपी घालून तो आपल्या प्रोव्हिजन स्टोअरच्या गादीवर बसला, की एकदम भूतकाळातल्या न समजणाऱ्या इजिप्तमध्ये गेल्यासारखं वाटतं. मृताचा वास भरून राहतो. एक क्षणभर कोणती भाषा वापरावी ते उमगत नाही. त्याचा 'प्रोव्हिजन स्टोअर' म्हणजे मात्र अरबी भाषेतील एखाद्या चमत्कारिक गोष्टीसारखा, त्याच्याशी काही संबंध नसलेला. एकदा सभेला आला होता अबदुल्ला. पाहुण्यासाठी ठेवलेल्या गाद्यांच्या खुर्चीवर त्याला कुणीतरी

सन्मानाने बसवलं होतं. पण सबंध समारंभभर तो अगदी अस्वस्थ होता. अवघड जागी कष्ट झाल्यासारखा खुर्चीतल्या खुर्चीत उठत होता, बसत होता—चैन नाही त्याच्या जिवाला. गायत्रीला तर हसूच येते. त्याचा आजोबा मोडके डबेपत्रे दुरुस्त करणारा फेरीवाला. दुपार भरास आली की आपल्या आवाजाची किरटी नक्षी उन्हावर कोरीत तो दार-दार धुंडाळायचा. पण एक दिवस ऐंशी हजाराची लॉटरी फुटते त्याच्या नंबराला. दैव असं झनानत सामोरी येते आणि तो करंटा एकाएकी गप्पगारच होतो. त्याची मुले मात्र नेकीची निघाली. पैसा कसा उधळायचा हेही समजले नाही त्यांना. महाराष्ट्रातच जन्म गेला म्हणून असेल कदाचित.

"हे 'शिवाजी' कशाला आधी घालायचं? अबदुल्ला हे नाव त्याच्यापेक्षा लांब, मोठं दिसतं, बोलायलाही कठीण आहे. तेव्हा तेच आधी ठेवा. म्हणजे नामी होईल. बघा—बघा की लिहून! 'अबदुल्ला, अबदुल्ला आणि शिवाजी, काय खरं की नाही?"

हंसराजशेटला भीती वाटते. तो हळूच म.म.बाबूकाका जोशींकडे पाहतो. वाटलंच त्याला. तो ऐतिहासिक पुरुष कसा खदिरांगारासारखा फुलतो आहे—संताप नुसता ओतू जातो. बाबूकाका संस्कृतिमंडळाचे अध्यक्ष, अश्लीलतावाद समितीचे प्रमुख चिटणीस, समाजशास्त्रज्ञ—इतिहास संशोधक आणि पुराणवस्तु संग्रहालयाचे क्युरेटर—देवगडचे दुसरे राजवाडे. एकदम नाजूक जागीच स्पर्श झाला तेव्हा बाबूकाका टीपदार आवाजात गर्जू लागले: "काय? गोब्राह्मण प्रतिपालक क्षत्रिय कुलावतंस राजाधिराज महाराज शिवाजीराजे यांच्याबद्दल हे उद्‌गार? ज्यांनी दिल्लीपतीला कुर्निसात करण्याचं नाकारलं, आसिंधू—सिंधूपर्यंत आपल्या गनिमी काव्यानं दरारा निर्माण केला, सतीचं वाण घेऊन स्वराज्याचा मंत्र उद्‌घोषित केला, आणि महाराष्ट्रधर्म अनिसावधपणानं, साक्षेपानं संवर्धला, त्या शंभूच्या अवताराचा असा उपमर्द? त्याची जीभ मुळासकट हसडून काढतो—येऊ दे तर खरा पुढं, त्याला हत्तीच्या पायाखाली देतो. नाही तर—नाही तर—भिंतीत चिणून टाकतो—"

"ऐतिहासिक नाटकातला पार्ट बोलतात का हे? नव्हे—म्हणजे मागं पाहा—एकदा असलं आरडाओरडा करणारं नाटक आम्ही पाहिलं होतं—आम्हाला काही कळलं नाही त्यातलं. काय पाहा त्याचं नाव—" न समजून त्याचा बापुडवाणा चेहरा आणखीच बापुडवाणा झाला होता.

"त्याच्याकडे लक्ष देऊ नका. तो माथ्याने थोडा भडक आहे...."

"मी माथ्यानं भडक आणि तू रे सैल कासोट्यावाल्या? थांब, तुझं टाळकंच सडकतो चांगलं—म्हणजे समजेल कोण भडक माथ्याचं ते—"

"बाबूकाका, शांत व्हा. असे आपणच भांडत सुटलो तर देवगडचं नंदनवन कसं होईल? मोठी माणसं आपण. जरा समजुतीनं वागायचं की लहान मुलांसारखं हमरीतुमरीवर यायचं?"

"मी लहान मुलासारखा भांडतो? मी—मीच तेवढा भांडतो आणि हा हरामखोर लेकाचा. मला भडक माथ्याचा म्हणतो ते गेलंच कुठे गाढवाच्या गांडीत—तुमच्यासारख्या

असभ्य लोकांत माझ्यासारख्यानं मिसळू नये. मला लाज नाही. उकिरात तोंड खुपसलं मी–जिथं तिथं सारी घाण. आणि ही मंडळी भारतीय संस्कृतीचा उद्धार करणार! करा, करा, म्हणावं–हवे ते दिवे लावा–हा बाबूकाका पुन्हा पाऊल टाकणार नाही. मी बाणेदार आहे म्हणावं!" पाय आपटीत बाबूकाका निघून जातात. अबदुल्ला बिचारा अगदीच एवढासा होऊन थरथरत होता. ते जातात आणि सर्वांनाच मोकळे वाटते. हंसराज अबदुल्लाला नीट बसवतात.

"तिकडे नका लक्ष देऊ. मी सांगतो तुम्हांला जरा दमानं घ्या. हे नाव असंच असू दे. आणि पुढच्या निवडणुकीत आम्ही तुम्हाला उभं करणार आहोत. मंत्रिमंडळात तुमची खुर्ची राखून ठेवलीच आहे असं समजा. हंसराजशेटचा शब्द म्हणजे सगळं काही आलं— काय? जमलं ना?"

"मग काही आमचं म्हणणं नाही. पण ते तेवढं लक्षात ठेवा नीट म्हणजे झालं."

"छे! छे! ते कसा विसरेन? तुम्ही अगदी निर्धास्त राहा. नवी गाडी घ्याच."

आता तांबड्यालाल गाडीतून कर्मवीर अमेरिकन तंत्रज्ञाला घेऊन येतात. धूळभरल्या रस्त्यांतून येताना तो कावला—कातावला होता. सारखा नाकाशी रुमाल धरीत होता. असल्या धुळीत आणि शरीराची राख करणाऱ्या या अणकुचीदार डोळे मिटवणाऱ्या प्रकाशात जगतात कशी ही माणसे?

गाडी थांबते तशी सगळी मुले गोळा होतात. शेपटी हालवीत कुत्रंसुद्धा येतं. हळूच ताईंचा गोपीचंद मोटारीवरून हात फिरवतो. धुळीची बोटं तोंडात घालतो. मधू धिटाईनं पुढे सरकून हॉर्न वाजवतो. सर्कशीतल्या विदूषकाकडं बघावं तसं त्या अमेरिकन माणसाकडे मुले बघत राहतात.

"कसा दिसतो लाल लाल बराफी गोळ्यासारखा! नाही? मोठा मजेशीर वास येतो त्याला—पाहिलंस?" मधू गोपीचंदाच्या कानात गुपित ओततो.

"सरा रे पोरांनो, बाजूला. जा बघू आपापल्या घरी. इथं काय गुब्बू गुब्बू नंदीबैल आहे होय एवढी गर्दी करायला? की डोंबाऱ्याचा खेळ मांडलाय?"

त्या अमेरिकन माणसाला हे मुळीच आवडत नाही. दातओठ खात तो अवघ्या शरीराने जळफळतो. "रास्कल! एकेकांना शूट करायला हवं—" तो पुटपुटतो.

भांडण झाल्यापासून बाबूकाका अस्वस्थ होते. पण आज त्यांना एक नवीन संधी मिळाली आहे. अमेरिकेत शिकत असलेल्या त्यांच्या मुलाचं पत्र घेऊन विजयी मुद्रेनं ते सुरावंतीच्या सभामंडपात सभा घेतात.

"तुमचा हा तंत्रज्ञ माणूस मोठा गोड, सरळ वाटतो तुम्हाला. पण साप आहे तो. त्यानं गुपचूप लेख पाठविला आहे तिथल्या वर्तमानपत्रात. माझ्या मुलानं वाचला आणि मला लिहून कळवलं आहे." बाषूकाका 'आजचा माणूस' झाले आहेत–"पाहा मी वाचतो: 'इंडियन माणसं अजून डुकरासारखी आहेत. त्यांना फार वास येतो. संडास कसा वापरावयाचा आणि वापरावयाचाच असतो हे त्यांच्या गावीही नाही. ते आपल्या कोटाच्या

खिशात झुरळे, उंदीर घेऊन फिरतात. आणि पिठलं नावाचा प्रसाद आवडीने खातात.' 'Pitle' असे पिठल्याचं अमेरिकन स्पेलिंग केलं आहे. तेही त्याने विनोदानं लिहिलं आहे. असो. हा आपला अवमान."

"कसा जातो बघतो परत अमेरिकेला. त्याची तंगडी नाही मोडली तर नावाचा मल्ल पहिलवानच नाही. आमच्या देशाला नावं ठेवणं म्हणजे काय हे जरा कळू दे त्याला."

"हो ना. श्रीरामचंद्रासारखे एकपत्नी, एकबाणी, एकवचनी थोर नरवीर ज्या भरत भूमीत मातांनी प्रसविले—जिच्या हाती पाळण्याची दोरी ती काय जगाचा उद्धार केल्याशिवाय राहील?"

"नव्हे,आपण या माणसाचा एकदम खूनच करू." कोणी तरी सभेत उठून बरळतं.

हरितात्या आता मात्र घाबरतात. ते एरवी सदैव तटस्थ. पण आता भलतंच वळण लागत होतं. ते उठले.

"आपण एका तंत्रज्ञाला नवीन इमारत बांधायला आणलं आहे. आपल्यालाही शिकायचं आहे म्हणून. परक्या देशातला माणूस. काम झालं की पाठवून द्या. नाही ते विचार मनात आणू नका. आपल्या हातात कायदा घेऊ नका. फार झालं तर त्यांनाही वर्तमानपत्रात खुळं म्हणा म्हणजे झालं!"

"मोठा आला आहे रानडे कुठचा! असली भित्री माणसं जिथं तिथं घाण करतात."

पण कर्मवीरांना हरितात्यांचं म्हणणं पटतं. मनातल्या मनात हरितात्यांचा कर्मवीरांना नेहमीच दरारा वाटत आला आहे. कसा भुतासारखा सदा मानगूट धरतो. बाटलीत भरून समुद्रात बुडविला पाहिजे.

"तुमचा शब्द खाली पडू द्यायचा नाही म्हणूनच आम्ही गप्प बसतो. तुम्ही सांगताय म्हणून. नाही तर या हरितात्याला तेव्हाच गुंडाळला असता. तुम्ही त्याला असं भिता का? असा तो कोण?" एरवी चंडीदास चिडून बोलत नाहीत. पण हरितात्यांना बघितलं की चंडीदास घुमू लागतात.

हरितात्या काही मागत नाहीत. कसली अपेक्षा ठेवीत नाहीत. हा गुण काही नाकारता नाही यावयाचा. एवढेच आपल्याला कधी जमत नाही–कुठे तरी कर्मवीरांना ते अगदी नीट माहीत आहे. म्हणून ...म्हणून...पण आपण हरितात्यांशी भांडत आहोत की अमेरिकन माणसांवर आपला राग आहे? सारे विचित्रच! सार्वजनिक कामे केलेला अनुभवी, पिकलेला पुरुष थोडा वेळ कळवळतो.

दिवस...दिवस पुढे उलगडत जातो. एकसंधपणे तो अमेरिकन साहेब धुळीला सरावतो. कर्मवीरांनी त्याला मराठी शिकवण्याचा चंग बांधला आहे. "बाकी कर्मवीर, तुम्ही इंग्लंडात गेलात तरी सर्वांना झकास मराठी शिकवाल!" आणि एक दिवस तो अमेरिकन साहेब सभामंडपात 'भारतीय संस्कृतीचं पुराणत्व' या विषयावर चांगले दीड तास इंग्रजीतून भाषण करतो. कर्मवीरांना भलताच आदर वाटतो. त्यांचा देह कणकण वितळू

लागतो. किती लवकर संस्कृती आत्मसात केली! हुषारच माणसं. म्हणूनच ती एवढी पुढे गेली—सगळंच इंग्रजी समजताना जड जातं आहे. पण बरं वाटतं. आंदळल्यासारखं, भाषा घुंगरासारखी कानात रुणझुणते...मग नुसता आवाज. कर्मवीर तंद्रीत बुडतात.

आता मंडळी विसरली आहेत. पण फार काही दिवस झाले नाहीत त्या गोष्टीला. तंगडी मोडायची होती याच साहेबाची. जमल्यास खूनसुद्धा. तोच पहिलवान निवांत पेंगतो आहे. पण बसलाच कोपऱ्यात.

हंसराजशेटनं भारावलेल्या अंतःकरणाने त्याचे आभार मानले. "इतक्या थोड्या अवधीत एखाद्या परकीयानं आमची सनातन संस्कृती पूर्णपणे आत्मसात करावी हे आम्हाला अभिमानास्पद, त्यांना गौरवास्पद आणि संस्कृतीला भूषणावह आहे. त्यांच्यासारखी विद्येची आवड आपल्यात आली पाहिजे, तर आपला देश सुधारेल. त्यांनी 'कुंकू आणि नऊवारी साडी' यावर उद्‌बोधक लेख लिहिला आहे. मला तो त्यांनी वाचून दाखवला. थक्कच झालो. काय व्यासंग, काय उद्योग! मला विचारून ते सर्व करीत असतात. मी म्हणतो,'अहो मला काय विचारता? मी लहान माणूस!' पण नाही. माझ्या सल्ल्याशिवाय त्यांचं चालतच नाही ना!' 'तुम्ही भारतीय माणसे गुपचूप विद्वान असता,' असं मला गौरवून माझे पाय धरले बरं त्यांनी! खाजगी गोष्टीही मला ते जिव्हाळ्यानं सांगतात. मीही मित्रत्वाच्या नात्याने त्यांना सर्व सांगतो. अलीकडे आम्ही एकत्रच जेवण घेतो. माझ्या पत्नीची रसोई त्यांना पसंत आहे. थोर माणूस असाच असतो. आता ते महाभारतावर व गीतेवर विस्तृत टीकात्मक ग्रंथ लिहिणार आहेत. मी त्यांना मदत करतोच आहे. आपल्या कामाचा व्याप सांभाळून असा छंद चालवणं सोपं नाही. असं व्हावयाला हवंच. नाहीतर आपली ओळख त्यांना व्हावयाची कशी? जगाचा उद्धार आपल्याच संस्कृतीने होणार असल्याने या गोष्टींना उत्तेजन द्यावयाला हवे. असो—"

"बाकी तुमचं आजचं भाषण म्हणजे तोडच नसलेलं. काय बारकावे टिपलेत हो तुम्ही! आमच्या सुद्धा नजरेतून निसटलेले तुम्हाला कसे दिसले? तुमची अभ्यासाची तऱ्हा उत्तम आहे. शिकली पाहिजे. पण काही म्हणा साहेब–तुम्ही एकदा आमचे मोदक खाऊन बघाच. फार नामी चव. कामतांची सावित्रीअक्का झकास करते." बाबूकाका चहापानाच्या वेळी बिस्किटे संपवताना त्यांना खुलवतात.

आणि मल्लू पहिलवान त्याच्या कपाळभर गुलाल लावून त्याचे कपडे खराब करतो. "आज फड जिंकलात, राव" म्हणून त्याला खांद्यावर घोसाळत सारा देवगड फिरवतो, लेझीम–डफाच्या तालात. साहेबाला तो पेट्रोमॅक्सचे एवढे भयाण शिंतोडे उडलेला अंधार, गुलाल-घामाचा वास आणि जल्लोष कासावीस करतो. अंग ठणकत असतं. डोळे थकून मिटत असतात. पण तो आपल्या प्रेयसीला पत्र लिहितो—"माझ्या प्रियतम पाकोळी : लाख-लाख चुंबनं. झोपेत माझीच स्वप्नं पाहतेस ना? इथले लोक एकदम इडियट. मी तासभर काय वाटेल ते इंग्रजी बोललो आणि त्यांना वाटलं, मी त्यांच्या संस्कृतीवर बोलतो आहे. मॅडच दिसतात–स्वीट ड्रीम्स, स्वीट." पत्रावर ओठ टेकतो. झोपेत तो फार अस्वस्थपणे चाळवतो. पहिलवानानं त्याला चांगलंच तिंबवलं आहे.

सकाळी बाबूकाका तरातरा हरितात्यांकडे जातात. चहा घेतात. "इथून, तिथून सारा भ्रष्टाचार! तुला हे चालतं. तू मूग गिळलेस. मी फटकळ माणूस. अन्याय नाही सहन करायचा. सभामंडपात एका अविंधाला आणावयाचं, त्याच्या यावनी भाषेनं तो मंडप विटाळावयाचा हे केवढं पाप! आणि त्या परक्या, आजच्या कोवळ्या पोराला काय समजतं आपल्या धर्मातलं?"

हरितात्या नुसते हसतात. बोलत नाहीत. कालच्या सभेला ते गेलेच नव्हते. आणि त्यांना कुठं एवढं इंग्रजी समजतं!

"तू स्वतःला एकनाथ-रामदास समजतोस. तुझ्या मुलाला फर्मचा मॅनेजर नेमलं तर तू काय नको म्हणणार आहेस? आणि तुला काय नको आहे? तुझ्या निरपेक्षतेचं थोतांड माझ्यापुढं नको. संन्यास घेतल्याचा बुरखा पांघरतोस! आणि माझा मुलगा काय मॅनेजर व्हायला योग्य नाही? चांगला अमेरिकेत शिकतो आहे."

"माझा मुलगा अमेरिकेला जाऊन आलेला नाही. त्याच्या नशिबात असेल ते तो भोगील. मी त्याची चिंता करीत नाही. मला काळजी वाटते ती गायत्रीची." हरितात्या एकदम गप्प बसतात. बाबूकाका निघून गेल्याचंही त्यांना समजत नाही.

दिल्लीहून आणताहेत म्हणे मॅनेजर. सरकारच देणार आहे फर्मचं नीट सारं जमेपर्यंत उसना हात. कुठला जुना आय.सी.एस. आहे. असेल. पण देवगड काय हुषार लोकांविना ओस पडलं होतं? परका इथं येतो हा जुलूमच झाला! कर्मवीर आणि चंडीदासांना ती भिकारडी मॅनेजरशिप हवी असेल कशाला? त्यांचे डोळे केंद्रमंडळातल्या खुर्चीवर लागलेले. मुलगा मंत्री झाला की समाधानाने डोळे मिटायचे. चोर साले. एकेकाला भर चौकात उलटं टांगून चाबकानं फोडलं पाहिजे. त्या डबड्या अबदुल्लाला मॅनेजर म्हणजे काय तेच कळत नाही. सुर्खा आहे बिचारा. आणि शेटसाहेब फिल्मी दुनियेतले. आम्ही फाटकी माणसे जीव टाकतो त्या जागेसाठी. त्या होणाऱ्या मॅनेजरना त्यांनी एक निनावी पत्र पाठविलं होतं.—"इथल्या लोकांना तुमचं येणं मुळीच पसंत नाही. देवगडच्या लोकांतलं शहाणपण काही अगदीच खलास झालं नाही असं परक्याच्या तोंडाकडे पाहायला. लोक बोलतात, 'याद राख म्हणावं. इथं आलास तर आमच्याशी गाठ आहे.' मला, का कुणास ठाऊक, तुमच्याबद्दल फार आपुलकी वाटते. माझ्या मुलासारखेच की! देवगडचे लोक महाभयानक क्रूर. मी तुम्हाला हिताचा सल्ला देतो. तुम्ही इकडे येण्याचा विचार सोडून द्या. विषाची परीक्षा पाहू नये माणसानं. जग काही ओस पडलं नाही शिवाय. याउप्पर तुमची मर्जी.— तुमचा एक हितचिंतक."

कर्मवीरांना कळलं असावं हे! काल अगदी स्वच्छच सांगितलं त्यांनी. "हे बघ बाबू, तुझं सारखं धरणं धरून बसणं मला बघवत नाही. संस्थेतल्या कुणालाच तुझ्या मुलाला मॅनेजरशिप देण्याची कल्पना पसंत नाही. हो, तुला आपलं स्वच्छच सांगतो. उगाच आडपडदा कशाला? तुला परवडलं तर आमच्याबरोबर काम कर नाहीतर चालू लाग." काय राहिलं यात आपलं?––आपल्या मुलानंही आपल्याच तोंडात शेण घातलं. असल्या

बापाची लाज वाटली त्याला. "कसले संशोधक तुम्ही? जीवनाचे, विद्वत्तेचे नुसते विडंबन. लाज, लाज आणलीत—तोंड बघू नयेसं वाटतं. बाप नव्हे तुम्ही. वैरी आहात वैरी तुम्ही—इत:पर मी तुम्हाला मेलो असंच समजा." तो आता कधी घरी परतायचा नाही. फार जीव होता पण त्याचा आपल्यावर. "आमचे बाबा सांगतात, मग कसं खोटं असेल ते? ते खूप मोठे आहेत. अगदी खूप—आभाळाएवढे—" तो एकदा शाळेतल्या मास्तरांशी भांडताना अभिमानाने तणतणला होता. "तुम्हीच चांगला करता हो बाबा आकाशकंदील—आपलाच सर्वांत चांगला असतो." मऊ असायचं त्याचं अंग—वज्रीने चोळताना गुदगुल्या होतात म्हणून सर्व न्हाणीभर नाचायचा! सर्वच हरवलं आता. आपल्याला तरी काय करायचं होतं? पण असेच फराफरा आंधळेपणानं ओरबडले जातो आपण.

रस्त्यात कडकलक्ष्मीचं ढोलकं वाजतं. आपले कपाट उघडून तिने नुकताच संसार मांडला आहे. आसूड वाजतो आणि बाबूकाका एकदम जागे होतात. त्यांना समजत नाही पण ते धावत सुटतात. आसूड खेचून घेत ते आपल्या अंगावर ओढून घेतात. आसूड नुसता त्यांच्या अंगाभोवती गुंडाळतो. वेटाळतो.

तिच्या तांबरलेल्या डोळ्यांत करुणा दिसते. 'आसूड ओढायला सुद्धा सवय, अभ्यास असावा लागतो बाबा! उगाच नाही साधत. पण तुला का हे भिकार चाळे सुचतात? त्यातली वेदना आम्हालाच ठाऊक. पुन्हा असं करू नकोस.' वेटोळे सोडवताना कडकलक्ष्मी हळूच बोलते.

फजीत होऊन बाबूकाका घरी येतात. कधीकाळी त्यांनी एका पेशवेकालीन दप्तराचे मोठे सुंदर संपादन केलं होतं. पण ही नुसती आठवणच आहे आता. एकाकी घरात त्यांना फार अस्वस्थ वाटतं. बाबूकाकांनी पार्वतीला फार छळलं. फार गरम भात पानात वाढला तर चालत नसे त्यांना—कितीतरी वेळा तेच गरम भाताचे गोळे तिच्या अंगावर फेकले आहेत त्यांनी. असं वाटतं की आता ती सुद्धा आपला सूड घेत असेल. साऱ्या बाजूंनी अंगावर घर कोसळत तर नाही? आणि ही पाल सारखी कुचकुचते—त्यांना घरांत बसवत नाही. ते उठतात आणि देवळात जातात.

मल्लू पायरीवर एका बाजूला बसलेला त्यांना दिसतो. त्यांना फार बरं वाटतं - माणूस आहे, इथे भीती नाही आता. मल्लू त्यांना खुलवतो. आणि बाबूकाका रंगात येतात. "मी असा बाणेदार, मी काही कुणाकडे भीक नाही मागायचा माझ्या मुलाकरिता. त्याच्या नशिबात असेल ते तो भोगील. मी काय हरितात्या आहे कर्मवीरांच्या घरी धरणं धरून बसायला?"

देवळांत पावलं वाजतात. हरितात्याच तर!

"ऐकलं का रे त्यानं आपलं बोलणं?"

"नाही हो, म्हाताऱ्याला कमी ऐकू येतं आहे अलीकडे." पण मल्लू हसत असतो.

"तू हसतो आहेस. मला समजतं, पण मी काय डरतो असं वाटलं की काय तुला? ऐकेना! खरं ते बोललो. मला काय त्याच्या बापाची भीती?"

पण एकाएकी बाबूकाका आपल्या तोंडात मारून घेतात. "घे,घे. खाल्लंस ना पुन्हा शेण! तुझा जन्मच उकिरात तोंड खुपसण्याचा, तुला कसली लाज नाही." आणि बाबूकाका साफ मोडतात. मल्लू त्यांना घरी पोचवितो.

इमारतीचं बांधकाम संपतं. श्रीफल, शाल, रुपेरी करंड्यातून मानपत्र दिलं जातं. हंसराजशेट त्याला सांताक्रूझच्या विमानतळापर्यंत पोचवतात.

"तुमच्या सहवासातले दिवस मी विसरणार नाही. तुम्हाला सुद्धा आठवतील. पुन्हा असलं काम काढलं तर आम्ही तुम्हालाच बोलावू. यालच म्हणा तुम्ही. तसा आता तुमच्यावर आमचा हक्कच आहे, काय? खरं ना?"

"वा! हे काय बोलणं झालं?" पण त्या लबाड साहेबाने केव्हाच मनाशी ठरवले आहे. पुन्हा म्हणून इकडे फिरकायचं नाही. नुसत्या आठवणीनंही अंग शहारेल! त्याला वाटलं होते, इथे पांढरे हत्ती असतील. शिकार करायला मिळेल. पण सगळं खोटं.

हंसराजला त्याच्या मनाचा पत्ता लागत नाही. विमान सुटतं. आणि हंसराज मुंबईहून परतताना आपल्या मोटारीत मॅनेजरला घालूनच आणतो. वाटेत मात्र आपल्या शेजारी बसलेल्या त्या सूटवाल्या उमद्या माणसाला तो सरळ विसरतो. त्याच्या डोक्यात एकच आहे. त्या अमेरिकन साहेबावर एक दिलचस्प रंगीत फिल्म ठोकायची आहे. फिल्मी दुनियेत असे कधी झाले नाही; होणे नाही. सिलोनचा व्यापारी विभाग त्याच्या कानात किंचाळतो. "हंसराज फिल्मचं रंगीत चित्र : 'एक परदेसी मेरा दिल ले गया'!" त्या मेघराजानं त्याला गेल्या साली फसवलं. पण आता तो कच्चा राहिला नाही. एक गोरा-तांबडा साहेब येतो आणि देवगडच्या भोळ्या शालीन पोरीवर प्रेम करतो. देवळात चोरून भेटतो. शेवट काय करावा? ती पोरगी गाणं म्हणता म्हणता मरते आणि भूत होऊन त्याच्याकडे जाते की तोच इकडे येतो आणि पक्का भारतीय होतो--नाही तर आपले दोघेही मरतात अशी ट्रॅजिडी...

"देवगड मोठं सुबक, शानदार दिसतं आहे."

तो दचकतो. खरंच. मॅनेजर आहेत त्याच्या शेजारी त्या फर्मचे–अं? हो—आता त्याला समजतं –

"तर वा! आमचं गाव म्हणजे मिठ्ठास. उन्हाळा थोडा तापदायक—पण पावसाळा–हिवाळा इतके रंगीन—" अजून सिनेमातच आहे तो. "पाहालच तुम्ही आता. शारदीय पौर्णिमेच्या दिवशी गावच्या सुरावंतीचा उत्सव असतो. ग्रामदेवता आहे ती इथली! तिची आख्यायिका ऐकण्यासारखी." कदाचित त्याला नव्या चित्रासाठी उपयोगता येईलसुद्धा—

मोटारीला गचका बसतो. मॅनेजर हंसराजच्या अंगावर आदळतात. हंसराजला सवय आहे. पण मॅनेजर डोके चोळतात.

"अजून रस्ते झाले नाहीत वाटतं."

"हे आलोच की आपण! देवगडचा प्रत्येक पाहुणा हरितात्याकडे उतरावयाचा असा शिरस्ता आहे गावचा. तिथं तुम्हाला सोडतो आणि मी निघतोच. दोन दिवसांच्या प्रवासाने मी अगदीच अंबून गेलो आहे. अंघोळ करून पडतो म्हणतो जरा—"

"ठीक आहे."

"अहो, पाहुणे आलेले दिसतात बरं का! गायत्री, सांग बरं आत!"

कधी नव्हे इतकी सावित्रीअक्का धांदलते. म्हातारे कुतूहल गर्दीगर्दीने तिला गुदगुल्या करते. न राहवून ती बाहेर डोकावते.

"इश्श, आई!" गायत्री खुदकन हसते.

सावित्रीअक्का रागावते.

"एवढं हसायला काय झालं तुला? होयच नाही तर मग! त्या एवढ्या नव्या अद्भुत ऑफिसात येणारा मॅनेजर असतो तरी कसा ते बघायला नको वाटतं? गायत्री, पोरसवदा दिसतोय. आणि कसे रेटणार एवढं थोरलं काम! होईल त्याच्या हातून? आपल्या दादा एवढाच असेल नाही? फार तर एक दोन वर्षांनी मोठा—एकेकजण असतात नशीबवान. दुसरं काय?"

आणि सावित्रीअक्काला पुरते समजायच्या आधीच गायत्री त्या अद्भुत नगरीत रोज कामाला जाऊ लागली होती.

"तुम्ही आमच्या रिसर्च सेक्शनकडे का नाही येत? तुम्हांला आवडेल असंच आहे ते काम." मॅनेजरनी तिला विचारलं होतं.

"मी? मला नाही बाई जमायचं ऑफिसचं काम. छे बाई! शिवाय मला ती इमारत नाही आवडत. तिनं माझा समुद्र सारा बिघडवून टाकला आहे. गोल जिन्यावरून चढताना मला मळमळतं."

"लवंग ठेवीत चला तुम्ही पर्समध्ये नाही तर आवळकाठी ठेवा जवळ थोडीशी. माझी पत्नी फक्कड आवळकाठी बनवते. ती पुरवील तुम्हांला. थोडे दिवसांनी आपोआप सारं जाईल आणि तुम्हाला आवडायला लागेल."

बरेच दिसतात की! असे नव्हते वाटले. त्यांच्या देहाला कशी लाजवट किनार भासते. पुरुषाला अशी शोभत नसावी. कुणास ठाऊक म्हणा! हरितात्यांशी बोलताना ते सारखा 'स्टॅच्युट' हा शब्द वापरत होते. पुळणीतला रंगीत शिंपला टिपावा तसा तो शब्द ती हळूच कुरवाळते. मोठा मिजासखोर रुबाबदार दिसतो अं! उच्चारला की आपण कोणी तरी फार कळणारे आहोत असे वाटायला लागते—शब्दांना असा देह असतो—तिच्या डोळ्यांपुढे हलकेच बुद्धाचा प्रचंड पुतळा सरकतो. ती आपला एवढासा हात त्या विशाल मूर्तीवर दाबते. डोळ्याला पण अगदी असंच वाटलं होतं. मग अवघ्या अंगालाच डोळे फुटतात— पण ऑफिसातले काम नाही नीटसं समजत. उगीच कशाला दुसऱ्याला फसवायचे?

"अहो, पण तुम्ही गेल्यावर तो जो कोणी येईल तो अगदीच ढिम्म मणिगोटा असेल तर? त्यापेक्षा आपण काय वाईट? पुष्कळ बरे आहोत आपण. चोर असतात ही सगळी

मंडळी. तुम्हांला काही कळत नाही. आणि तेच बरं आहे म्हणा. पण म्हणूनच आमचं थोडं ऐकत चला—"

पाटील गंभीर झाले की इतके गमतीदार दिसतात! त्यांच्या हॅटवर एक पीस आहे. खरंखुरं इंग्लंडात बायका अशा हॅट्स वापरतात अशी तिची समजूत होती.

हे व्ही.डी.के. असे सदा काय घाईत असतात? इतकं काम असतं प्रसिद्धी आणि जाहिरात विभागात? बरे झाले बाई ती तसल्या विभागात नाही. पण तो म्हणजे तो वाटतच नाही पाहा! नुसते नवीन नवीन सूट्स. गालांवर एक गरगरीत वाटोळे, ताजे ताजे, सुहास्यवदन काश्मिरी सफरचंद. त्यांच्याबरोबर ती रिसेप्शनीस्ट दवणे बोलू लागली म्हणजे प्लॅस्टिकच्या विश्वातली प्लॅस्टिकची माणसे दिसतात. गजमल मिलच्या प्रदर्शनात तिनेच साड्यांचे निरनिराळे पालव दाखवले होते. फार अवघड असते, सारखे असे पुतळ्यासारखे डावा हात पंख्यासारखा पसरून उभे राहायचे म्हणजे. आपण फिरतो असे तर लोकांना वाटता कामा नये. जणू स्टेज फिरते–आणि चेहऱ्यावरचा स्नायू जरासुद्धा हलू द्यायचा नाही. तिने आरशापुढे तासन् तास अभ्यास केला होता. फनी. सौंदर्यस्पर्धेत तिला तिसरे बक्षिस मिळाले होते—प्लॅस्टिकचा पुतळा–तेव्हापासून ती तशीच आहे. मधून मधून ॲबस्ट्रॅक्ट पोएट्री करते. बाळूताई शारंगपाणी यांनी रेडिओवरच्या भाषणात काव्यातील या नव्या प्रवाहावर अत्यंत समतोल विचार मांडले. म्हणाल्या की, ॲबस्ट्रॅक्ट पोएट्री ही मोदकाच्या उकडीसारखी आहे. साधली तर मोदक सुरेख होतो. फसली की मोदक बनतच नाही. तेव्हा हे असं आहे. सदा कसे प्रियदर्शनीय पाहिजे माणसाने. कसल्याशा समारंभाच्या वेळी चंडीदास तिच्या जवळून हालेचनात. "हा भारतभूषण जळूसारखाच चिकटलाय की! जरा दुसऱ्याला चान्स दे म्हणावं!" हंसराज हलकेच पुटपुटतात. पाहावे त्या अमेरिकन माणसाच्या सिनेमात हिला नाचवता आले तर...छान आहे कापसाच्या सशासारखी—तशी फारशी अवघड नाही. सुलभ आहे माल.

मॅनेजरना मात्र गायत्री दिवसेंदिवस त्रासदायक होऊ लागली आहे. ती बावळट आहे की शहाणी? तिचं एकच म्हणणं, 'ती डुकरं तिथून हलवली पाहिजेत. आणि कँटिनकरता नवी इमारत का नाही बांधत फर्म?' तिला इतका कसला त्रास होतो? चमत्कारिकच आहे! माधव शिंदेने एकदा त्यांना सांगितले होते, "हा असला मटनाचा रस्सा केला ना –की मला गायत्रीची आठवण येतेच. आम्हांला वाटलं ती फार बावळट आहे. तिला बनवायचं. पैज लागली. मी तिला जेवायला बोलावलं. किती तरी वेळ मी तिला रस्सा खाण्याचा आग्रह करत होतो आणि ती नुसती ओठ मिटून बसून होती. शेवटी वैतागून मी म्हटलं, 'मला माहीत आहे, तुला भीती वाटते–मटन खाण्याची सवय लागेल आणि आपण त्याच्या आहारी जाऊ!' घ्या की महाराज! सगळं पातेलं पुढे ओढलं तिनं आणि पातेलंभर रस्सा पिऊन टाकला तिनं—संपेपर्यंत माझ्यावर रोखलेली नजर तिनं हलवली नव्हती.—'गायत्री, माफ कर मला, पुन्हा नाही चेष्टा करणार—पण असं पिऊ नकोस'—आमची आई फार जहाल करते रस्सा, आम्हाला तो खाववत नाही. तिची

अवस्था झाली नुसती. डॉक्टरना आणावं लागलं, फार घाबरलो होतो मी! अशा मुली असतात?"

—माधव शिंदेपुढून जणू अजूनही ते सारे सरकत होते—नाही, माणसं इथे समजणारच नाहीत की काय कोण जाणे?

दुपार आता चांगलीच पिकली आहे. त्वष्ट्रानं सूर्याला चाकावर घासलं आहे. समुद्र खूप उंच होत त्या निळ्या आभेला अंगावर घेतो. मग लाटा लाटांतून उन्हाचं कलाबूत वर–खाली इंद्रधनूत झिळमिळतं. समुद्राची खारी गाज संथ मंद लयीत पुळणीत झुरमुरते. गायत्रीच्या पावलावर खुर्चीत बसल्या–बसल्याही ओला खारटपणा तटतटतो.

"तो मेला विश्वामित्र सदा कसा कोपलेला. याला शाप–शापाशिवाय भाषा नाही–कसला मेला मुनी!"

'अगं आई, हळू बोल ना! विश्वामित्राला ऐकू जायचं आणि तुझ्याबरोबर आम्हालाही शापायचा तो."

दादा आईला बिलगतो––'मेला' हा शब्द आई छान म्हणते. तसा नाही कुणाला म्हणता यायचा–गोष्ट सांगताना तिचा आवाज कसा समुद्रासारखा खोल. मुळी अंजिरी शेला पांघरून समुद्र दिसायला लागतो ना समोर! ती आणखीच आईजवळ सरकते.

"सुरावंती, आकाश–धरेची लाडकी लेक. लावण्यवती. आकाशाचं निळं सौंदर्य आणि पृथ्वीचा गंध घेऊन ती जन्माला आली. मोठ्या लाडाकोडात वाढली–काय नाही हट्ट पुरविले तिचे प्रजेनं? तळहाताच्या फोडासारखं जपलं—आणि पित्यानं तिला चौदा विद्या—चौसष्ट कलांत निपुण केलं. आता लग्न करायचं—मग अंजिरी शेला पांघरून सागर येतो––कुणाला आवडणार नाही अनुरूप जोडा?–पण त्या विश्वामित्राला कुणाचं कधी बरं बघवलं आहे का? आधी जाऊन शापेल—तसंच इथंही झाले—हा प्रसन्न सागरतीर पाहिला आणि मुनिवर्यांना पसंत पडली जागा तपस्येला. बीजमंत्राला ह्याच्याइतकं स्थळ नसेल–किंबहुना विश्वमित्रासाठीच तर नसेल ते? पण ध्यानमग्न होताहोताच मग्नता भंग पावते. कोणी तरी हसत आहे. 'कोण मला हसतं? तुम्ही?' रागानं लाल होत तो शापतो, 'माझ्या मग्नतेत असा व्यत्यय? तुमचं मिलन कदापि होणार नाही.'

'मुनिवर्य शांत व्हा.आपल्याला आम्ही पाहिलंही नाही. पाहिलं असतं तर खचित आम्ही त्रास दिला नसता.'

'पवित्र कर्मानं बद्ध होऊन मी ध्यानमग्न होत असताना तुम्ही हसलात. आणि वर उद्दामपणानं हे समर्थन?'

आता सागरही चिडतो. 'आमचा काही अपराध नसताना आम्हाला तुम्ही शापलंत. तुमचंही कार्य कधी सिद्धीस जाणार नाही. तुमच्या उफराट्या सृष्टीत कधी न्यायधर्म नांदणारच नाही. सारे जीव –जंतू आंधळेपणानं आपसात भांडून मरतील. त्यांना कधी मुक्ती नाही मिळायची—'

'असं काय बोलतोस सागरा! पायावर लोळण घेऊन उःशाप मागायचा आपण. वडीलधाऱ्यांचा असा उपमर्द करू नकोस!'

'काही नको एवढं. या विश्वामित्राचं उगीच स्तोम माजवलं आहे—त्याच्या वाणीचं सामर्थ्य फार काळ नाही टिकायचं. तू वाट पहा. आपण शाप भोगूनच तरू!'

"आणि बरं का? शरदाची पौर्णिमा आली की सागर उचंबळून येतो. कसा कुणास ठाऊक, सुरावंतीचा गाभारा पाण्यानं भरून जातो."

आई इतकी रंगते गोष्ट सांगताना. मग नुसता नाद...नाद....

"कुठल्या गाढवानं तुमची नेमणूक केली आहे कुणास ठाऊक. तुम्ही कधी कशात लक्ष घातलं आहेत काय? मी असतो तर तुम्हाला कधी घेतलं नसतं. आणि घेतलंच असतं तर टिकवून नसतं धरलं." तिला एक क्षणभर वाटते, विश्वामित्रच आला आहे. तिचं शरीर वास घेतं. जागं होतं. असिस्टंट मॅनेजर बोलतात. ती आईच्या कथेत अर्धवट झाकलेलीच. "अहो, या वयात कसं उत्साही असलं पाहिजे. मी बघा." ती बघते: काचा मारलेले शुभ्र तलम धोतर, निळा कोट आणि कॉलरवर एवढसं बटन होलचं गुलाबाचं फूल. खिशात हिन्याचे अत्तर शिंपडलेला नाजूक त्रिकोणी घडीचा रुमाल—"ह्यांना नाही हो खपायचं एवढंसं कुठे त्यांच्या पोषाखात बिघडलेलं. मला मेलं सदा तैनातीत राहावं लागतं–हे ऑफिसला गेले म्हणजे मग सुचतं काम." काकू गोड तक्रारतात. "डोक्यावरच्या चार केसांना असं नये बाई स्वस्तिक चोपडू—कसेतरीच वाटते"—"चार चार दिवस फिरतीवर जातो, पण परत आलो की इथं नाक्यावर उतरतो तो लगोलग ऑफिसातच. आणि कँटिनचं मी काही खात नाही. वन् शुड् बी व्हिजिलंट हो—अगदी न दमता सहापर्यंत काम करतो–हे आमचे मॅनेजर शामळू आहेत म्हणून. मी त्यांच्या जागी असतो तर कशी हडसून खडसून शिस्त लावली असती. दहा मिनिटं उशिरा आलास! चले जाव! आज तुझी रजा. चाबूक घेऊनच उभारलो असतो दारात—एकेकाला दटावीत. असा दरारा पाहिजेच–प्रत्येक व्यक्तीनं टाय घातलाच पाहिजे–फर्मची डिग्निटी राह्यला नको? मी आल्यावर एखादा कारकून उभा राहिला नाही तर कानफटात लगावून उठता केला असता- नाही तर यांची शिस्त! किती सैल कारभार–कर्मवीरांना पटत नाही. घ्या. माझं काय जातं? तुमच्याच फर्मचं वाटोळं होईल. फर्मचं हित. सर्व चिंता तिच्याकरता नाहीतर मला काय करायची मॅनेजरशिप! टाटांनी मला बोलावलं असूनही मी गेलो नाही. कारण मी आगरकर तत्त्वज्ञान मानणारा माणूस–या गावच्या उद्‌बोधनाकरता मी स्वतः वाहून घेतलं आहे. आलो की घड्याळात दहा वाजतात. अशी शिस्त लावून घेतली आहे मी!"

"तिला नको असलं काही सांगू दे तो! कंटाळा किती येतो असलं ऐकण्याचा - कशासाठी तुम्ही असं मला सांगता आहात?" ती अस्वस्थ होते–मघाशी किती छान होतं! आईचा आवाज होता–हा कोण पण?

नुसतं प्रामाणिक असून चालत नाही; प्रामाणिक दिसावं लागतं. नुसतं चांगलं असून भागत नाही, आपण चांगले आहोत असे ओरडून सांगावं लागतं–

हिंदी सिनेमातला नवा येशू गरगर फिरणाऱ्या पृथ्वीच्या गोलावर स्थिर उभा राहून आश्वासक हात पसरून नव्या आज्ञा उद्घोषित करतो आहे. जिथे खिडक्या नसतील तिथे एका बाजूला या आज्ञा आणि शेजारी शिवाजीचे कॅलेंडर असं तो सारखे बोलणार का? नको नको--

ती एकदम स्मशानात जाते. जळणाऱ्या प्रेताची राख अंगाला फासून कपालकुंडला या प्लॅस्टिकच्या माणसाचं रक्त घटाघटा पिते. मग तिला गदगदून हुंदक्यांचं हसू फुटतं–घुबडासारखं—

तिचं अंग शहारतं. कोरड्या हुन्दक्यांनी गदगदतं. अवचित तिला वाटतं, तिच्यासकट ती इमारत कापरासारखी जळते आहे!

"खालती कोणी तरी इमारत बघायला पाहुणे आले वाटते. बहुधा बाई असावी." रेकॉर्ड क्लार्क सोहनीला मोटारींत फार रस आहे. मोठ्या प्रशस्त रस्त्यावरून आपण ऐटबाजपणे मोटार चालवावी असं एक त्याचं स्वप्न.

"कशावरून?"

"अरे मोटार वाजली ना! आणि ती काही देवगडातल्या कुणाची नव्हे. माझे कान तीक्ष्ण आहेत भलतेच या बाबतीत.मला देवगडातल्या सर्व मोटारींचा आवाज बिन बघता सहज ओळखता येतो. हे काहीच नाही. अरे, मागे मी मुंबईला असताना रंग आणि नंबरसुद्धा अचूक ओळखत असे, ह्यूजेस रोडवरच्या मोटारीचा. ती रेषाच आहे माझ्या हातावर. आता सांगू तुला? टायर इतके मऊसूत दाबले गेले आहे की ती स्त्रीच्या शिवाय असा मऊपणा घेणारच नाही. आणि वळणसुद्धा थोडं लवचीक."

आणि खरेच खाली एक स्त्री आली होती. गुरुसिंग रखवालदाराजवळ बसून शंकर तंबाखू चोळीत होता. "च्या बायली, कसली वांझोटी नोकरी—त्यात काय चव का ढव–मागं मस्त माजलेल्या वळूवाणी हिंडत होतो गावभर—आता ह्यो गडी अगदीच मोटलं वळून असला भिकार पोशाख अडकवून कचकड्याच्या बोळकांडीतून फायली नेत, उगाच खाली वाकून फिरतो—बाची बिमारी मलाच का गिळंना म्हणतोय मी! सुटलं म्हणजे–"

ती स्त्री इकडे तिकडे फिरते. "कोणी नाही का इथं?"

"दिसत नाही न्हवं तुम्हास्नी?" काय आहे पण–पट्ठे बापूरावाच्या लावणीतून सरळ ठुमकत आलीय जणू!

ती ओशाळते, "हो, पण मला इमारत पाहायची होती."

"मग पघा की! आणि मी कवा नको म्हटलं? मस मोप लोक येतात, बघून जातात. तथं तुमी एक. बसा तथं बाकावर. येतील साहेब इतक्यामंदी."

"जरा सभ्यपणानं नाही वाटतं बोलता येत? ही काय गुंडासारखी भाषा?"

"हां. तोंड सांभाळून बोला बघा. कुणाला गुंड म्हणता? आणि यात काय असभ्यासारखं बोललो? सरळ सांगितलं न्हवं तथं बाकड्यावर बसा म्हून! ह्यांत बी वाकडं दिसलं! बाई म्हून गय करतो. नाही तर मुस्काडातच हाणली असती."

ती घाबरते–निमूट बाकावर बसते. कुणीकडून इमारत बघायला आलो! भयंकरच दिसतं सारं. आणि सारखं भिंतीवर थुंकतो आहे. काही हेच नाही या लोकांना—

"तू साहेबांना सांगून ये शंकर, कँटिनमध्ये असतील." गुरुसिंग त्याला सांगतो.

"मी नाय बा जायचा. त्यो साहेब गेलाय त्या फटाकड्या दवनेबाईबरोबर— बोलावलं की चिडतो. तुला पाहिजे तर जा तू."

"हे आले बघा साहेब." तोंड पुसत घाईनं येणाऱ्या व्ही.डी.के. कडे पाहते.

"माफ करा हं. जरा उशीर झाला चहा पिऊन येताना," सफरचंद हसण्याने फाकते. "चला, मी दाखविती इमारत."

"हे लोक असे काय जिथे तिथे थुंकतात? एवढी इमारत खराब नाही का व्हायची?"

"नाही. पुसून काढतात ते मग ओल्या फडक्याने. मग पुन्हा अधिक स्वच्छ होते ती. हेच तिचं तंत्र आहे."

तिला वाटते, तो चेष्टा करतो आहे. पण तो भलताच गंभीर दिसला.

जगाचे भान नसलेल्या शंकर कुलकर्णीला आपल्या खोलीत कोणी आल्याचे कळत नाही. लुटूपुटीच्या राक्षसाशी लढाई करण्यात तो अगदी घामाघूम झाला होता.

"इतके कसे कामात रंगलेत हे?"

"कामात नाही रंगला, कोडं सोडवतो आहे तो!" तिला हसू येते. जमिनीवर, भिंतीवर ठिपक्यांची नक्षी सांडलेली पाहून ती विचारते, "मॉडर्न आर्ट का ही?" तिच्या चेहऱ्यावर अजाण भाव.

शंकर कुलकर्णी आजूबाजूला पाहतो. एकदम त्याला बोध होतो. "हे शिंतोडे म्हणता होय? अशी असते मॉडर्न आर्ट? मला माहीत नाही म्हणून विचारतो. पण ही मॉडर्न आर्ट नव्हे. हा माझ्या पेनचा प्रताप. अहो, इथून तिथून सर्व व्यापारी चक्क फसवितात. काही चाडच नाही. आणि लाज वाटत नाही हो त्यांना. सरळ 'कसं बनवलं' म्हणून हसतात बघा. म्हटलं, पेन जरा चांगलं घ्यावं, म्हणून दहा रुपये खर्च करून आणलं. काय वर्णन केले म्हणता घेताना त्या सिंधी माणसानं—जणू हेच एक पेन. अगदी हबंग साला. घरी आणून पाहतो तर बोरू की हो निघाला! हळहळलो. कपाळावर हात मारून घेतला. वाटेल ते बोललो. पण काही नाही. पेन गळतंच आहे. हे पाहा माझे हात. शाईने घरी जाईपर्यंत बरबटून जातात. बाजारात कुठला जिन्नस म्हणून चांगला खात्रीचा मिळत नाही. साधं पूड तिखट आणलं तर बघा तो लाकडाचा रंगवलेला भुसा निघाला. दाण्यांवर साले पाणी शिंपडतात. वजन भरावं म्हणून–हे तर सोडाच. पण औषधं खोटी विकावीत? लोकांच्या जीवनाशी असं खेळायचं! या सगळ्या व्यापाऱ्यांना एक एक असा, ड्रमच्या भव्य आवाजात भर चौकात फाशी द्यावं आणि ओले शेंगदाणे खात आपण साऱ्यांनी टाळ्या पिटत खदखदा हसावं. तुम्ही घाबरलात ना? मलासुद्धा पूर्वी या कल्पनेचं भय वाटायचं, पण आता मला गिलोटिनचा कटकट आवाजच अधिक बरा वाटतो."

गेल्या वाटतं बाई निघून! असलं कुणाला ऐकावंसं वाटेल! पण छान वास रेंगाळत होता खोलीत. यमुनेची आठवण करून देणारा. कशी लिलीच्या फुलासारखी! धुणं पिळणं तर हात लाल व्हायचे! आणि पावले गुलाबाच्या पाकळीसारखी कशी मऊ मऊ स्वच्छ. नायलॉनचं पातळ नेसलं असतं तिनं तर त्या देवळातल्या सुरावंतीसारखी दिसली असती–दुधाचं स्नान घालताना ती कशी दिसते! लग्न मोडलं म्हणून विहिरीत जीव दिला तिने. कसा तिला धीर झाला? इतरांना बहिणी तरी असतात पण आपल्याला तेही सुख नाही. नुसते डोळ्यानं मृत्यू पाहिले. काळे–भयाण. कधी दारावर मुहूर्ताचा नारळ असलेले शकुनाचं तोरण लटकलं नाही की कधी सनईच्या सुरानं, मृत्यूच्या सावलीने सदैव आकसलेलं आपलं घर जरा वेगळं होऊन भारावलं नाही. खरंच. शपथ. घर म्हणजे काय ते कळलेच नाही. लग्न करायला सवडच झाली नाही आयुष्यात. गेलं सबंध वर्ष कर्मवीरांचा पुतण्या सारखा टांगला होता त्याच्या डोकीवर. जगावरून ओवाळून टाकलेले हलकट कार्ट-–पण सारखी मॅनेजरच्या पाठीमागे भुणभूण–- "उडवा त्या कुलकर्ण्याला. काही बिघडत नाही असल्या बावळटांना उडवलं तर–" शंकरला हे समजतं. तो उभा कोसळतो. "आई आताच कुठं धड लुगडी अंगभर नेसती आहे मॅनेजरसाहेब. माझ्या आईसाठी मला काढून टाकू नका. पेजेला महाग होणं हे फार भयंकर असतं–" असं–असं लागू नये करायला. मग कसली, कसली म्हणून रयाच राहत नाही...केवढा तरी वेळ रात्रीचा तो जागाच राहातो. समुद्राचा आवाज त्याला अस्पष्टपणे ऐकू येतो. त्याला वाटतं, जवळ कुठे तरी लाटा येताहेत... अर्ध्याउघड्या झोपेत त्याला कळतं. कँटिनच्या आश्रयाच्या त्या डुकरांना पकडायला कोणीतरी न दिसणारे आले आहेत. —त्यांच्या आंधळ्या जडमूढ शरीरालासुद्धा कसं कळतं कोण जाणे संकट–पण फार आर्त करून चित्कारतात. ऐकवत नाही. आणि गायत्री सारखी मॅनेजरना सांगत सुटते आहे "तुम्ही ती डुकरं आधी दूर न्यायला सांगा—आधी न्या ती!" किती मोठ्याने कर्कश ओरडते आहे ती! कमालच आहे तिची.

आता तो फक्त शब्दकोडी सोडवत असतो. त्याचं उत्तर कधीच बरोबर येत नाही.

अलीकडे कर्मवीरांना ब्लडप्रेशरचा त्रास होतो. डॉक्टरांनी त्यांना स्वस्थ विश्रांती घ्यावयाला सांगितली आहे. "पण लोककल्याणाचा मार्ग ज्यांचा, त्यांना विश्रांती एकदाच!"

"केव्हा?"

"मेल्यावर!" डॉक्टर एकदम आदरावून जातात.

चंडीदास तर अगदी हबकून गेला आहे.

"माझा थोरला चांगलाच भानगडीत अडकला आहे. त्यानं म्हणे चुकीचं इंजेक्शन दिलं आणि रोगी दगावला. हा काही त्याचा पहिलाच अपराध नव्हे. चारपाचदा झालं आहे असं. शिवाय रोग्याशी, परिचारिकेशी तो फार उद्धटपणे वागतो. त्याला डॉक्टरीतलं काही कळत नाही अशा त्याच्याबद्दल तक्रारी आहेत. तो आणि त्याच्याबरोबर मीही

गळ्यापर्यंत बुडलो आहे. चाळीस पन्नास हजाराला तरी खार लागणार. आणि मी तर असा खंक. काय करायचं?"

"तुझ्या मुलाची नाही तरी नेहमीचीच रड. आणि मी नको म्हणत होतो तुला डॉक्टरीकडे धाडू म्हणून. कुठल्यातरी होतकरू मुलाचा हक्क काढून घेऊन त्याला दिली सवलत. आता भोग आपल्या कर्माची फळं. मी तरी काय करू?"

"असं घडलं खरं. आता तू काय वाटेल ते बोललास तरी ऐकून घेतलं पाहिजे मला. पण यातून मार्ग काढ."

"पण इतकी रक्कम मी तरी कुठून आणू एकदम? हां...पण एक करता येईल. फर्मचा वाढदिवस येतो आहे पुढल्या सहामाहीत. इमारत झाल्यापासून वाढदिवस साजरा केलेला नाही. फर्मच्या नोकरवर्गाकडून एक महिन्याचा पगार घेऊन निधी जमवू. तू तुमची रक्कम उचल. कसं? मी सांगतो तसं मॅनेजरला–"

"तो मॅनेजर ऐकेल का? तो तर मला डोळ्यापुढे येऊ देत नाही."

"सांगून तरी पाहू."

मॅनेजरला बोलावणं जातं. मॅनेजर येतो.

"या. कसं काय? ठीक चाललं आहे ना फर्मचं सारं?"

मॅनेजरला संशय येतो.

"काही काम होतं?"

"हं...म्हणजे अगदी तसंच नाही म्हणा काही! पण म्हटलं एकदा तुमच्याही कानावर घालावं. कार्यकारिणीच्या खाजगी बैठकीत असं दिसलं की आता फर्मचं सगळं नीट चाललं आहे. एकदा तिचा वाढदिवस करावा–थोडा मोठ्या प्रमाणावर. इमारत बांधल्यापासून सुने गेले आहेत दिवस. कार्यकारिणीची इच्छा. तेव्हा म्हटलं करा - हौसमौज होऊ दे त्यांची––मी अध्यक्ष म्हणून एक सूचना मांडतो, की वाढदिवसाकरता निधी जमवायचा तो फर्मच्या नोकरवर्गातून एक महिन्याचा पगार सक्तीने कापावा–"

चारचौघांत आपल्याला कोणीतरी नग्न केल्यासारखा मॅनेजर शरमतो.

"असं बोलवतं कसं तुम्हाला? माझ्या सहकाऱ्यांच्यावर अशी सक्ती मला आवडणार नाही.त्यांनी खुशीनं देणं वेगळं–तुम्ही निधी जमवा. पण या गलिच्छ मार्गानं नव्हे–वाढदिवस साजरा करताना त्यांनाही आनंद वाटला पाहिजे.—इतरत्र बोनस देतात."

"पण संस्थेकरता नोकरवर्गाने त्याग करू नये काय? आम्ही त्याग केला आहे.आमचं जीवन त्याकरता वाहिलं आहे. एवढीशी झीज नोकरवर्गानं सोसली तर बिघडलं कुठे? आणि सार्वजनिक काम करणाऱ्या व्यक्तीचा तिच्या नोकरावर नैतिक अधिकार काहीच नाही?"

"मी सरकारी माणूस आहे.माझ्यावर चुकीच्या कर्तव्याचं दडपण आणण्याचा प्रयत्न करू नका."

आतापर्यंत चंडीदास नुसता ऐकत असतो. पण आता त्याचा धीर सुटतो. या मॅनेजरचा गळा दाबू का?

"अरे जारे सरकारी माणूसवाल्या! सरकारी माणूस, सरकारी माणूस काय लावलं आहे मघापासून? मी तुला तिकडूनही हुकूम द्यायला लावीन–मग तरी झक्कत करशीलच ना! तुझी मिजास-तसा तू वठणीवर यावयाचा नाहीस. कसा ऐकत नाहीस तेही बघतो. दिल्लीला जाऊन धरणं धरून बसतोच ना."

चंडीदास इतका खवळतो का पण? नवलच आहे!

"मी तुमच्याशी बोलत नाही आहे. ती योग्यता अजून मला यावयाची आहे. आणि कर्मवीर, या माणसाला आधी घालवून द्या. तरच मी बोलेन–नाही तर मी चालल्लो."

आता कर्मवीर अस्वस्थ होतात. चंडीदासाला शांत करीत ते मॅनेजरचा निरोपच घेतात.

"बरे तर. पुन्हा केव्हा तरी बोलू. तुम्हीही विचार करा. तुम्हाला चमत्कारिक वाटेल. पण मी म्हणतो हे खरंच आहे असं विचारांती पटेलच तुम्हाला. शिवाय..." पण बोलणं मधेच सोडतात कर्मवीर.

"त्याला थोडं रकमेचं बोट लावा. सरळ येईल म्हणजे."

कर्मवीरांच्या मनात हे अगदीच आलं नाही असं नाही. पण त्यात काही अर्थ नाही. चालायचं नाही इथं काही—

चंडीदासाला नेहमीच याचं आश्चर्य वाटत आलं आहे. असं का बरं? अण्णाचा जीव त्याच्या मुलांत सुद्धा एवढा अडकला नसेल. पण नको तिथं कोमल असून कसं चालेल. माणसं मेली तरी जग नाही ओस पडत. गेला उडत. सगळी फर्म ओस पडली तरी दुसरी आणीन–माणसांना काय तोटा–उदंडच उदंड...

"नव्हे मी सांगतो–ऐकतोस का? तू एक आपला योग्य हुषार माणूस पहा फर्मकरता. मी दिल्लीला जातो. त्याला तिकडून परत बोलावायला भाग पाडतो. जाऊ दे गेला तर—"

मॅनेजर सारखा या खोलीतून त्या खोलीत येरझारतो. काही न बोलता.

"आज फर्ममधून इतक्या लवकर कसे आलात? आणि काय हवंय काय तुम्हाला? असं काय करताय? बाहेरच्या माणसांशी ढीगभर बोलाल पण बायको––मुलं बघितली की जशी तिडीक उठते मस्तकात!"

"अगं! दिल्लीला एकदा डोकं दुखलं तेव्हा तिथल्या डॉक्टरांनी गोळ्या दिल्या होत्या. कुठे आहेत त्या? त्यांनी बरं वाटतं. शोधून दे बघू!"

"आता दिल्लीची गोळी कुठे शोधू बाई!"

फर्ममध्ये त्याला पुष्कळ काही उलगडतं–म्हणून चंडीदास भडकला तर! पेचात पकडायचाच एक प्रकार. चंडीदासानं काहीही करावं. तो आपल्या सहकाऱ्यांवर अन्याय

होऊ देणार नाही. त्याला बरं वाटतं. त्याचे डोळे मिटतात. चंडीदास दिल्लीला गेल्याचं त्याला कळत नाही.

बजेट सेक्शनचा प्रमुख दासगुप्ता रसगुल्ल्यासारखा आज सुखावला आहे. फर्मच्या फिरत्या खिडक्याखिडक्यांतून गुपित डोकावते--झाकून झाकून--मॅनेजर चालला परत दिल्लीला. नाही तरी किती वर्षे एक खुर्ची अडवायची! इतरांना काही नको वाटतं चान्स— आता दासगुप्ता सर्वांत जुना, अनुभवी--कामही चोख. त्याचाच हक्क–

पर्सनल असिस्टंट किडमिड्यांना काय कळत नाही दासगुप्ताच्या मनाची काळी हालचाल! त्यांना तशी थोडीशी सिद्धी आहे. लेका मला बनवतोस काय? सारी हमालीची कामे केली म्हणजे काही लायक ठरत नाही मॅनेजरशिपला!—त्याला कसं पाहिजे—नॅक हवी ॲडमिनिस्ट्रेशनची. याची इंग्रजीच्या नावाने तर बोंबच! तुझी जागा धाब्याच्या वळचणीखाली–

"वाईट झालं हं पण. असा माणूस मिळायचा नाही पुन्हा."

"बरोबर आहे. पण आता कोण येईल हो? असिस्टंट मॅनेजर? रिसर्च विभागाच्या कानविंद्यांना सुद्धा चान्स आहे म्हणा! असे ऐकतो की गजमल मिलचा मॅनेजरच घेऊन येणार आहेत कर्मवीर!"

"अरे तो? शिवलीलामृतातल्या अध्यायात नाही का ते नरकाचं वर्णन? त्यातल्या उकळत्या कढईत किती वेळा त्याला बुडवून काढलं तरी तो तसाच ओंगळ राहील— आपण मग सोडूनच जाऊ— काही अर्थ नाही. मग बाबूकाका जोशींचा मुलगा काय वाईट?"

"नाही. बाबूकाकाला देवगड विसरलं आहे. भुतासारखं जगतो तो त्या घरात. त्याचा मुलगा अमेरिकेत स्थायिक झाला आहे म्हणे!"

किडमिड्यांना मात्र चैन नाही पडत. ते उठतात आणि कानविंद्यांच्याकडे जातात. पुष्कळ काही पाहिलेल्या माणसासारखा तो अबोध, दूर असतो नेहमी. एकटाच बुद्धिबळं खेळतो. किडमिड्यांना पाहून तो थक्कच होतो.

"का हो?"

"मॅनेजर जाताहेत आणि आम्ही ऐकतो, तुम्हाला विचारणार आहेत कर्मवीर. म्हटलं, तुम्हाला काही कल्पना आहे का बघावं!"

कानविंदे चिडतो. "मला 'फूल' करण्याचा विचार दिसतो तुमचा. नाही. मला कोणी विचारलं नाही. विचारणार नाहीत हे न समजण्याइतका मी खुळा नाही. अहो, आम्ही काही सगेसोयरे की गोताचे त्यांच्या? उगाच काय काही तरी! किती झालं तरी आपण परकी माणसे आहोत. त्यांना आपल्याबद्दल मुळीच विश्वास नाही. मी जर्मनीत राहिलो नाही तो असल्या भिकारड्या मॅनेजरशिपसाठी. कोण शिणवेल स्वतःला–? आणि शहाणे असाल तर माझं आपलं सांगणं. हा विचारच मनात आणू नका."

"नाही. पण समजा तुम्हाला असिस्टंट मॅनेजर केलं तर—"

"सांगितलं ना मी मघाच? मला कशात इंटरेस्ट नाही म्हणून. पुनः पुन्हा काय तेच ते विचारता? मला त्यांनी काही विचारलं नाही. विचारल्यावर ती देईन त्यांना उत्तर—उगाच काय?"

लेकाचा आव आणतो आहे इसापनीतीतल्या शहाण्या दिवाभीताचा. माहीत आहे म्हणावं जर्मनीतनं का परत आलाय ते. मला सांगतो आहे. आपल्या अंगात पाणी नाही–

"पण विचारलं तर नाही म्हणू नका. दासगुप्ता चिडला आहे तुमच्यावर. म्हणतो आहे, 'तुम्ही कसे होता ते बघतोच की! मी इथला जुना अनुभवी'– आणि ऐकलं की दासगुप्ता नेहरू शर्ट जाकीट घालून भेटूनसुद्धा आले कर्मवीरांना–जायच्यापूर्वी आपल्या मित्राचं कल्याण व्हावं म्हणून मॅनेजरच त्यांना घेऊन गेले होते म्हणे! मला काही फारशी आशा नाही. ते मला माहीत आहेच की! पण कसे असतात पाताळयंत्री लोक ते तुम्हाला सांगितलं—तुमची वृत्ती मला फार आवडली."

दासगुप्ताही आता पुरता कैफात झिंगतो. "हा साला किडमिड्या माझी वाटेल ती बदनामी करत हिंडतो. टाळकंच सडकतो त्याचं. मला नेलं काय कर्मवीरांच्याकडे मॅनेजरनी आणि हे ह्यानं पाहिलं? छान शक्कल लढवतो आहे. सरळ माग म्हणावं. त्यात काही भीती आहे? जागा झाली की रीतसर अर्ज करायला कोणीच अडवत नाही. पण राजमार्ग नको. मी नाही हपापलो मॅनेजरशिपसाठी."

असली काय ही माणसं? आणि हे इतकं सर्व असं... असं समजतं कसं सर्वांना? दोन दिवसांनी गायत्री किडमिड्यांना दासगुप्ताबरोबर चहा पिताना बघते. तिला वाटलं होतं की आता दोघे एकमेकांचे आयुष्यभर तोंड नाही पाहणार.

असिस्टंट मॅनेजर या सर्वांना हसतात. मूर्ख कुठचे – त्यांना काकू सजवतात – नेहमीसारखं. भल्या पहाटेच. मग ते चांगला गच्च गुलाब–निशिगंधाचा हार घेऊन कर्मवीरांच्याकडे जातात.

"आज आपला वाढदिवस. म्हटलं खुद्द जाऊन शुभ चिंतावं–आणि पहिलं आपण असावं दर्शन घेण्यात. आपणासारख्या पुण्यपुरुषाचं आमच्यासारख्या लहानांनी कसलं शुभ चिंतायचं म्हणा! फुलांनी का फुलांची पूजा करावयाची असते? पण पुण्य पायांचं दर्शन घ्यावं. त्यागानं प्रेरित होऊन आपल्यासारखंच कार्य माझ्याही हातून घडावं, या शुभ कामनेनं प्रेरित होऊन आपल्या आशीर्वादासाठी आलो आहे. आपलं एखादं चरित्र लिहावं असंही मनात येतं." हार घालून असिस्टंट मॅनेजर आपलं भाषण संपवतात.

"छान छान—फार बरं वाटलं. आजकालच्या पोरांना आमच्यासारख्यांबद्दल आदर नसतो. नुसती चेष्टा करतात. असं कोणी भेटलं म्हणजे हुरूप येतो कामाला. नाही तर कामाचं चीज झालं असं वाटत नाही—पण ते त्यागाचं काही म्हणालात ना ते आपल्याला आवडलं. अहो, त्यागाचीच आज आवश्कता आहे देशाला. आणि तरुणांनी सिद्ध झालं पाहिजे. प्रभु रामचंद्रांनी सुद्धा त्याग केला सीतामाईचा. — घ्या, घ्या कॉफी–मी जरा बरा

नाही. पथ्य संभाळलं पाहिजे–हे एवढं काम आहे ना–मरायला कुठं अजून सवड झाली आहे?—तर काय म्हणत होतो पाहा? हं. परवा मी मॅनेजरांना म्हटलं की फर्मचा वाढदिवस साजरा करू. निधीकरता फर्मच्या नोकरवर्गाकडून एक महिन्याचा पगार घेऊ. आता तुम्ही सांगा, एवढाही त्याग करू नये का नोकरवर्गाने संस्थेकरिता?"

"अवश्य. अवश्य. का नाही करावा? त्यांनी करावाच असं मी तरी म्हणेन आणि मी मॅनेजर असतो तर तसं तुम्हाला आश्वासनही दिलं असतं. अहो सगळी फर्म मी तयार करतो. माझ्यावर सोपवा. बघा मी कसं काम करतो ते."

"आम्ही तरी दुसरं काय म्हणतो?काम करणारी शिस्तप्रिय माणसंच आम्हाला हवीत. तुम्हाला जमत असेल तर आम्ही तुमच्याशी लेखी करार करू. तुम्ही देता आहात का लिहून? पाहा–"

"तुम्ही सांगाल ते का नाही करणार मी? तुम्ही आज्ञा करावीत आणि मी ती निमूट पाळावी असंच नाही का आपलं नातं? खरं म्हणाल तर मला पूर्वीपासूनच ही अव्यवस्था आवडत नव्हती. तुम्हाला हे आवडतं कसं, खपतं कसं हेच मला कळत नव्हतं. पण तुम्हाला समजली म्हणायची माझी योग्यता!"

पण यावर कर्मवीर काहीच बोलत नाहीत. अस्वस्थ होतात. "बरं, मग उठू या आपण!" कर्मवीर उठून आतच जातात. असिस्टंट मॅनेजरकडे न बघता.

ओशाळून तो निघून जातो.

आणि मग पुन्हा एकदा फर्म उलटी सुलटी फिरते. रातोरात मॅनेजरला दिल्लीला परत बोलावल्याची तार येते. त्याला अवधीही मिळत नाही. घाईगर्दीनं असिस्टंट मॅनेजरला चार्ज देऊन तो विमानाने दिल्लीत दाखल होतो. दिल्लीत चंडीदासच त्याचे स्वागत करतो. "आता आमच्या फर्मचं कसं होईल हीच काळजी लागली आहे बघा!–तुमची बदली मागं घ्यावी या करताच मी इथं आलो होतो. किती सांगितलं मी–पण त्यांना आवश्यकताच आहे तुमची. त्यांच्यापुढे आमचा काय इलाज. कर्मवीरसुद्धा हळहळले फार. आम्ही फार गमावलं—फार गमावलं—"

मॅनेजर बोलत नाही. पण त्याला मनोमनी कळलं आहे—चंडीदासानं हातोहात फसवलं. तो पराभूत आहे. अगदी चितपट कुस्ती जिंकली या तिरपगड्या डोक्यानं.

आणि चार दिवसांनी सर्वांना कळविण्यात येतं. फर्मच्या वाढदिवसानिमित्त एक महिन्याचा पगार काढून घेण्यात आला आहे. सर्व नोकरवर्गाचा. नोटीस विभागाविभागांतून फिरते. त्यातल्या गावंढळ इंग्रजीची पांडित्यपूर्ण चेष्टा होते. तरी सर्वच मंडळी जिभेने सडेतोड, न्यायप्रिय. कोणी कशाला डरत नाही.

कानविंदे नोटीस पाहून संतापतो. बूट वाजवीत घरी निघून जातो. कोणी म्हणतात, त्यानं राजीनामा दिला. कोणी सांगतात, तो असिस्टंट मॅनेजर म्हणून पुन्हा येणार आहे. कर्मवीरांनी फुंकर घातली आहे.

त्याची चेष्टा करून मंडळी कँटिनमध्ये चहा पितात. वडे खातात.

"आपण सारे, अगदी सारे क्लीब आहोत." कोणीतरी फार वैतागाने तडकतो. मग विझतो. सर्व कँटिनभर मरणाची स्तब्धता पसरते.

"काय होतं ग गायत्री तुला? बघितलंत का, पोरगी मघापासून तडफडते आहे. अंगारा तरी कुठला लावायचा म्हणते मी!"

हरितात्या हळूच गायत्रीजवळ बसतात. तिच्या अंगावर नीट पांघरूण घालतात. तात्या इतके छान आहेत. ते असे पांघरूण घालतात, अंगावरनं हात फिरवतात, तोंडाने छान स्तोत्र म्हणतात. मग झोपेत ती विरघळते.

"उद्यापासून ऑफिसात जाणं बंद बरं का! आपल्याजोगती नव्हे ती जागा. मी कळवतो कर्मवीरांना–आता स्वस्थ झोपायचं—" हरितात्या तिला थोपटत राहतात.

मंद्र सप्तकात रात्रीची सागराची गाज तिला हलकेच भारून टाकते–एकदम तिला दिसतं. प्लॅस्टिकची इमारत आपली भुरभूर जळत आहे. तिचा समुद्र स्वच्छ झाला आहे.

अठरा

# राधी

**जी. ए. कुलकर्णी**

महादेव गल्ली ही वितभर रुंद, चिंधीसारखी गल्ली होती. घरे अमोरासमोर इतकी जवळ होती की, समोरच्या गोदूबाईने आईकडे कढीलिंब-कोथिंबीर मागितली की तिने दिलेली जुडी मी पायरीवरच राहून तिच्या सोप्यावर फेकत असे. आणि शेजारचे मेहेंदळे व त्यांच्यासमोरील जोशी यांच्या घरातील माणसांनी तर आळीपाळीनेच आपले अंगण सारवून रांगोळी घालण्याचे ठरवून घेतले होते. गल्ली जेथे थोडीशी वळते, तेथे मांजरडोळ्यांची शांती राहत असे. तेथेच कचऱ्याचे कुंड होते व म्युनिसिपालिटीचा रॉकेलचा दिवा होता. दररोज संध्याकाळी म्हातारा धोंडू हातात तेलाची बाटली व खांद्यावर दोरीचा फास टाकून येत असे. दिव्याच्या खांब्याच्या आडव्या लोखंडी सळईला फास अडकवून त्यात एक पाय ठेवून तो वर चढे व थोडे तेल ओतून दिवा लावून निघून जाई. पण पंधरा मिनिटे—अर्धा तास दिवा जळे न जळे. मग कधी बस्तवाडचा हणमा अगर जनीचा मस्णू वर चढून तेल काढून घेत असे, व तेवढ्यावर त्यांची रात्र भागे. जाणारेयेणारे लोक हे बघत, एखाददुसरी सौम्य शिवी देत. पण गणेशवाडीभटाने हे पाहिले तर मात्र कधी एका शिवीवर भागत नसे. सकाळी नुसते "काय उठलात का भटजी?" असे विचारताच एक शिवी हाणूनच बोलणारा, जेवण झाले हे सांगताना जेवणाच्या आईमायला रस्त्यावर ओढणारा तो माणूस, असल्या प्रसंगी फक्त एका शिवीचे आचमन करून गप्प राहणार? पण हणमा, मस्णू निर्ढावलेले हसू चेहऱ्यावर ओढत व धूम ठोकत. पण गोपाळभटाची राधी खोचण खोचून खांबावर चढलेली असली की मात्र सगळ्यांची तोंडे लिपल्यासारखी बंद पडत. ती फक्त रॉकेलच घरी नेत असे, असे नाही. ती सरळ दिवाच उचली. ती वर चढली असता उतरेपर्यंत कुणालातरी—अगदी गणेशवाडीभटाला देखील—धरायला सांगे आणि मग तो दिमाखाने मिरवत घराकडे नेऊन, पुन्हा सकाळी तो काचेच्या पेटीत आणून ठेवी. अंधारलेल्या गल्लीत फाटक्या पदराचा आडोसा करून राधी दिवा घेऊन जात आहे, हीच तर राधीविषयी माझी पहिली आठवण होती.

राधी गल्लीच्या टोकाला एका खोलीत राहत असे. वास्तविक ती खोली अशी नव्हतीच. बाजूला गाडगीळांचा वाडा होता व त्याला लागूनच त्यांनी आपली गाडी ठेवण्यासाठी गाडीखाना बांधला होता. गाडगीळ वारल्यानंतर गाडीचे बैल विकले गेले व

गाडी मात्र तशीच धूळ खात पडली. तेथेच एक तट्टी, जुने पत्रे मारून आबांनी राधीला एक खोली करून दिली होती. त्या खोलीला त्यामुळे खरी भिंत एकच होती. पण राधीने तिला एक मोठे भोक पाडून त्यात वाशाच्या पाचसात काठ्या अडकवल्या व प्रकाशवाऱ्यासाठी खिडकी करून घेतली होती. ती माझ्या आईपेक्षा सातआठ वर्षांनीच लहान होती. पण गल्लीत मात्र अगदी लहानापर्यंत तिला सगळेजण राधीच म्हणत, आणि तेही नुसतेच राधी नव्हे, तर गोपाळभटाची राधी म्हणत. खरे म्हणजे गल्लीत शकुनालाही दुसरी राधी नव्हती. पण तिच्याबरोबर गोपाळभटाचे नाव हटकून येत असे. आणि गंमत अशी की, त्या गोपाळभटाला आबांखेरीज कुणी पाहिले होते की नाही, कुणास ठाऊक! आबा त्याच्याविषयी कधीतरी आईला सांगत. त्यांनी आपले गाव सोडले त्या वेळी निव्वळ त्यांच्या शब्दासाठी राधीला घेऊन तोही बाहेर पडला होता. पण नंतर त्याचे डोके बिघडले व त्याला दूर कुठल्यातरी हॉस्पिटलमध्ये ठेवले होते. आबाच कधीतरी अधूनमधून जात व त्याला पाहून येत.

गोपाळभटाची राधी गल्लीतून चालली की बायका आपल्या पोरांना उगाचच आत ढकलत. चुलीवर दूध उतू जात आहे का, परसातल्या दाराला कडी लावली आहे का, हे बघून यायला सांगत, कारण राधीची नजर वाईट होती. अण्णाबुवांचा बाबू दररोज आठशे नमस्कार घालत असे आणि तो दिसायला कसा लाल, गोळीबंद माणूस होता. तो एकदा जेवायला बसला असताना वाडगाभर फुले द्यायला राधी त्या घरात गेली. तेव्हापासून त्याचे मनच जेवणावरून उडाले. तो खंगत गेला, आणि आता तर त्याला कोपऱ्यापर्यंत जातानाही धाप लागत असे व श्वास घरघरीत होई. रविवार–बुधवारी तर हटकून चारपाच मुलांच्या पाठीवर बिब्बा उठे. मग त्या आया गोपाळभटाच्या राधीचे नाव प्रत्यक्ष न घेता तिचा उद्धार करू लागत; तिचे मढे का एकदा गल्लीबाहेर जात नाही म्हणून तळतळाटाने विचारत. एकदा आम्ही गणपतीच्या मंत्रपुष्पासाठी हौदभर दूध आणले होते. त्यात बदाम, बेदाणे-केशर घालून चांगले दाट आटवले व त्या पिवळ्या वासाने सारे घर भरून गेले. त्या वेळी मंत्र एकदाचे संपण्याची वाट पहात आम्ही दुधाभोवतीच अधीरपणे टपून राहिलो होतो. त्याच वेळी नेमकी देवाला नमस्कार करण्यासाठी राधी आली. आईचा चेहरा खर्रकन उतरला व तिने कपाळावर हात मारून घेतला.

"बरे का कृष्णाबाई, मलाही कपभर दूध ठेवा हं!" जाताजाता राधी म्हणाली.

वास्तविक राधी आमच्या घरी बऱ्याच वेळा येत असे. सवाष्ण जेवायला सांगायची असली की आई हटकून दुसऱ्या कुणा बाईला सांगे, व मग आबा जाऊन राधीला बोलावून आणत. पण आता मात्र आई तिच्या शब्दांनी हबकूनच गेली. नंतर अर्ध्या तासात सारे दूध विरजून पिवळ्या दह्यासारखे होऊन बसले. "सटवी कुठली! मढं काढलं तिचं!" मंत्र ओरडणाऱ्या ब्राह्मणापेक्षाही मोठा आवाज काढत आई म्हणाली होती. मग आबांनी घाईघाईने खुंटीवरील अस्ताव्यस्त रुमाल तसाच डोक्यावर थापटला, घरोघरी

जाऊन मिळेल तेवढे दूध गोळा केले व ब्राह्मणांपुरते काम भागवले. आम्ही मात्र राधीला शिव्या देत तसेच झोपलो.

"पण कदाचित बदाम कडू निघाला असेल." आबा आईला समजावत म्हणाले, "असं कधी नजरेनं दूध बिघडतं होय?"

"असल्या तुमच्या लाडांनीच ती शेफारून बसली आहे. तुमचा हात आवरून घ्या नि बघा! तिला कुणी कुत्रं विचारणार नाही. म्हणे नजरेनं कुठं दूध नास्तं की काय!" आई कडाडत म्हणाली, "तिची नजर कशी अगदी फुलासारखी आहे. तिने सुपातल्या तांदळाकडं नुसतं पाहिलं की त्यांचा अगदी कसा साखरभात होऊन बसतो बरं!"

आबांनी हळूच माझ्याकडे पाहिले आणि आपले हसू दाबून टाकले. पण ते काही बोलले नाहीत.

पण खुद्द आबादेखील एक दिवशी हादरले. पाच वाजता हटकून घरी परतणारी आमची गाय, त्या दिवशी सहा वाजले, सात वाजले तरी परतली नाही. आठ वाजता बंड्या गुराखी आला आणि रडव्या चेहऱ्याने सांगू लागला; गाय चरतचरत टेकडीपलीकडे गेली. त्याने खूप शोध केला. आजूबाजूच्या खेड्यांत विचारले, पण गाईचा पत्ता लागला नाही. त्या रात्री घरात कुणालाच झोप आली नाही. आबा तर गुडघे उंच करून पाठ वाकवून बसले होते, आणि बराच वेळ कंदिलाचा दांडा उंच करत विड्या पेटवत होते. आईने महादेवाला अभिषेक मागून घेतला. उजाडताच चहाही न घेता आबा रुमाल बांधून बाहेर पडले, ते बक्कळ रात्री आले. त्यांनी आणखी दोनचार खेडी धुंडाळली. कोंडवाडे बघितले, पण गाय गेली ती काही मिळाली नाही. आदल्याच दिवशी संध्याकाळी गाईची शेपटी तोंडावरून फिरवत राधीने म्हटले होते,—"गाय असावी तर अशी! कधी काळी जमलं तर मी पण एक गाय बाळगणार आहे." त्या वेळीही आई चिडलीच होती. पण चार दिवसांनंतरही गाईविषयी काही कळले नाही, तेव्हा आई कमरेवर हात ठेवत आबांसमोर उभी राहिली नि म्हणाली, "आता जर गोपाळभटाची राधी या घरात आली, तर तिच्या झिंज्या धरून मी बाहेर घालवीन तिला! गाईला पायावर घातलं चेटकीच्या. आता आणखी काही व्हायला नको!"

इतर वेळी आबा तिला समजवायचा प्रयत्न करत, पण आता मात्र ते खाली मान घालून गप्प बसले. त्यांनी घरी साठवलेले गवत अण्णाबुवाला देऊन टाकले व गोठ्याला कायमचे कुलूप लावले.

तसाच जर प्रसंग पडला असता, तर खरोखरच राधीच्या तशा झिंज्या ओढायला आईने कमी केले नसते. कारण साऱ्या गल्लीत गणेशवाडीभट सोडला तर तिला कुणाचीच भीती वाटत नसे. आणि त्याला तर सगळेच वचकून असत. आई तर माघारी त्याला दैत्यभट म्हणे. हा उंचच्या उंच काळा, दांडगट ब्राह्मण, नेहमी धोतर-उपरण्यात हिंडे. मी तरी त्याला कधी सदरा घातलेले किंवा त्याने आपल्या जाड खरखरीत शेंडीला गाठ मारलेली पाहिली नव्हती. पण आबा नेहमी दबलेल्या आवाजात म्हणत, "हा ब्राह्मण

चांगला दशग्रंथी आहे. त्यानं काशीला चौदा वर्ष काढली आहेत." कुठलातरी एक प्रोफेसर म्हणे दर वर्षी दोन महिने त्याच्याकडे येत असे, व लहान पोराप्रमाणे चटईवर बसून शिकून जात असे. पण त्याचे कागददेखील एकदा गणेशवाडीभटाने रस्त्यावर फेकून दिले होते. नेहमी आमंत्रणांची वर्दी असलेले श्रीपादभट, दत्तंभट, त्याच्यासमोरून जाताना तोंड चुकवून जात, व तोही त्यांना दीडदमडीभट म्हणे. पण गणेशवाडीभट तोंडाने अगदी फाटका होता आणि त्याला कधी कुणी श्राद्धपक्षाखेरीज बोलावत नसे. तो म्हणे सत्यनारायणाची पूजा सांगतानादेखील दोनचार ठिकाणी शिव्या उच्चारल्याखेरीज पुढेच जात नसे. आबांकडे येणारे पुष्कळ मित्र त्याच्या बोलण्याच्या वाह्यात गोष्टी सांगत आणि खूप हसत. त्याला स्वतःचे घर होते. कुठल्यातरी खेड्यातून पाच पोती भात येत असे व गाडगीळांच्या दत्तदेवळाची पूजा होती म्हणून त्याचे चालत असे. आणि ती दत्ताची पूजादेखील त्याच्या लहरीप्रमाणे चाले. कधी पाऊस ओतत असतानाही भिजत जाऊन तो सहा वाजता पूजा आटपून परत येई, तर कधी भर उन्हात दुपारी दोन वाजेपर्यंत दत्ताच्या अंगावर पाणी पडत नसे. एकदा दत्तजयंतीला मी, आबा आणि आई देवळात जाऊन त्याच्या येण्याची वाट पाहात बसलो. देवळात इतर दहाबारा माणसेही होती. आठ वाजले, नऊ वाजले, तरी गणेशवाडीभटाचा पत्ता नाही. आम्ही कंटाळून घरी आलो व आमची जेवणे आटोपली. पण दत्तजन्माखेरीज जेवायचे नसलेली ती माणसे ताटकळत बसली. संध्याकाळी मी चार वाजता नारळ फोडून आणायला गेलो, तर ती माणसे अद्याप तेथेच होती व गणेशवाडीभटाला लाखोली वहात होती. तो आला तो पाच वाजता. तर तो गेला होता कुठे? शेजारच्या खेड्यात जत्रा होती, तिथे गाय आणायला तो गेला होता. गाय घेतली नाहीच, पण तेथील कुस्त्यांची दंगल पाहिल्यावर त्याला तारुण्याची आठवण झाली. धोतराचा काचा मारून तो तयार झाला आणि एक तास मातीत हुंदडून आला. त्या लोकांनी कौतुकाने त्याला हातभर लाल फडके दिले होते ते चांगले भिजवून त्याने पूजेच्या वेळी हात पुसण्यासाठी आणले होते.

"भटजी, दत्तजन्म करण्याची वेळ आहे की काय आहे?" भुकेने तळमळत असलेल्या परशाने धीटपणे म्हटले.

"अरे जा रे जा फुसकीच्या! मला आलाय विचारायला!" गणेशवाडीभट खवळून म्हणाला, "दत्तरामाचा जन्म अमुक वेळी झाला, अशी त्यांच्या आयांनी काय येऊन तुमच्या कानात कुजबुज केली होती काय रे भडव्यांनो? दत्त जन्मतही नाही, संपतही नाही. संपतो तो दिवस. तुम्हाला लेको खादीला उशीर झाला, म्हणून तुमची ही ओरड! जा आता घरी, आणि पिंडाएवढे गोळे गिळून पडा मढ्यासारखे! म्हणे ही वेळ की काय!"

मध्यंतरी मला बरे नव्हते, भूक लागत नसे. मग काळे डॉक्टरांनी सांगितले की याला दोनचार अंडी तळून द्या म्हणून. अंड्याचे नाव ऐकताच आबा तर बसल्या ठिकाणीच भेदरले. एक तर आई घरात अंडी कशी काय आणू देणार हा प्रश्नच होता. कोंबडीचे

चित्र स्वैपाकघरात आले, तर म्युनिसिपालिटीचा दिवा लावणाऱ्या धोंडूला देखील पकडून आंघोळ घालणारी ती बाई होती. शिवाय खरे म्हणजे अंडी कुठे मिळतात हेच आबांना माहीत नव्हते. आबा दोन दिवस गप्पच राहिले. मग एक दिवस गणेशवाडीभटाने दारातून आजूबाजूच्या चार घरांना ऐकू जाईल अशा आवाजात विचारले, "आब्या, अंडी आणलीस का रे?"

'श्‌श्‌' करत त्याला गप्प बसवण्यासाठी हाताने खूण करत खजील चेहेऱ्याने आबा बाहेर आले, व त्याच्यासमोर सर्द होऊन उभे राहिले. दोन घरांतील माणसे बाहेर आली व आबांना प्रथमच पाहत असल्याप्रमाणे रोखून पाहून परत आत गेली. आई तर मटकन खाली बसली.

"अंडी! पोराला अंडी घालायच्या आधी मी काशीला निघून जाईन!" तिने निक्षून सांगितले.

"वा! चला तर! परवाच शिंचा चांगला मुहूर्त आहे." गणेशवाडीभट मोठ्या उत्साहाने म्हणाला, " मी तुमची चांगली व्यवस्था करून देईन. ते काम माझ्याकडं लागलं! माझ्या पुष्कळ ओळखी आहेत तिथं. नाहीतरी म्हातारपणी हे काम चांगलं! गंगेत स्नान करावं, विश्वनाथाचं दर्शन घ्यावं. मग इकडंही फारशी अडचण राहणार नाही. तो शेंबडा डॉक्टर अंडी दे म्हणतो ना पोराला, देऊन टाकू पाचपन्नास! काय म्हणतोस आब्या?"

आबांची तर विशेष पंचाईत झाली. त्यांना काय बोलायचे हे समजेना. आई मात्र हादरली. 'काशीला निघून जाते' म्हणताच यापूर्वी कुणी असे ताबडतोब तयारीला लागले नव्हते. ती चिडली, ती पुटपुटली, ती आबांवरच उगाच काहीतरी खेकसली. पण तिला खरा राग आला होता तो तिला म्हातारी म्हटल्याबद्दल. मागे एकदा आबांनी तिला थट्टेने तसे म्हटले होते, तर दोन दिवस ती त्यांच्याशी भांडत होती. शेवटी आबांनी हात जोडून म्हटले होते, "चुकलो बाई, जगदंबे! जगदंबा कधी म्हातारी होत नाही." त्यामुळे भांडण आणखी दोन दिवस वाढले होते.

"मी काही झालं तरी या घरात अंडी शिजू-तळू देणार नाही. माणसाला काही धर्म आहे की नाही?" ती म्हणाली.

"वा वा! धर्म नाही असं कसं होईल?" आपला अजस्र काळा हात हलवत गणेशवाडीभट म्हणाला, "बस्तवाडच्या रमेनं धर्माकरता काय केलं माहीत आहे ना?"

आई खाली मान घालून आत गेली. आबादेखील थोडा वेळ गप्प बसले. बस्तवाडच्या रमेचे लग्न झाले व एक वर्षात तिचा नवरा मेला. तिच्या घरच्या लोकांनी तिचे हातपाय बांधून तिला सोवळी केले होते व दुसऱ्या दिवशी तिने विहिरीत उडी घेतली होती.

"तुमचं ठीक आहे भटजी. निखारे खाऊन राहता तुम्ही." आबा खिन्नपणे म्हणाले, "आता पंधरा दिवस मला घरी वनवास आहे."

"तेच बरं तुला! नाहीतरी तू मुळातच डरपोक माणूस आहेस." गणेशवाडीभट समाधानाने म्हणाला.

आबांना अंडी कुठे मिळतात हे माहीत नव्हते, व कुणालातरी राजरोसपणे सांगायचे धैर्य नव्हते. शेवटी अंडी आणली ती देखील गणेशवाडीभटानेच. आणि तीही कशी? तर पूजेहून येताना एका ताम्हनात फोडलेला नारळ, दोनचार फुले, पळी-पंचपात्र व यांच्या जोडीला तीन शुभ्र अंडी!

"अहो भटजी, पूजेच्या ताम्हनात तुम्ही अंडी आणता, लोक काय म्हणतील?" आबा थोडे रागावून म्हणाले. गणेशवाडीभटाने ताम्हन कट्ट्यावर ठेवले, आबांकडे एखाद्या खुळ्या कुत्र्याकडे पाहावे तसे पाहून घेतले व तो ओरडून म्हणाला "आब्या!—आब्या! याद राख हं! मला अक्कल शिकवशील तर हाडं सैल करून देईन बघ एक दिवस! हाडं आहेत की नाही कुणास ठाऊक म्हणा! पण असा यमासारखा एक दणका देईन, की कापडानं जमिनीवरचा तुझा डाग तेवढा पुसावा लागेल बघ! लोकांची भीती तुला! परसात तांब्या घेऊन जाताना चोरी करायला निघाल्यासारखा लपूनछपून जातोस तू बेट्या! आणि मला शिकवायला आलाय! फुलं, नारळ, देवानं उत्पन्न केली, आणि अंडी मात्र कुणी उपटसुंभाने तयार केली होय?"

मग आबांनी परसात अगदी दूर, लाकडे ठेवायच्या खोलीत शेगडी पेटवली व एक दिवसाआड एक अशी मला अंडी तळून दिली. तळलेली अंडी अगदी सपक लागतात.

चार घरे सोडून राहत असलेला बाळू संध्याकाळी पायरीवर वाचत बसला की मीही मोठ्याने वाचत पायरीवर बसे. मी एकदा असाच वाचत होतो,–'मग एक समय उच्छाद करून शत्रूचे सारे सैन्य धावून आले...' वाचताना मी आपल्याच नादात होतो. त्यामुळे अगदी जवळच कुणीतरी 'आणखी एकदा वाच!' असे ओरडले तेव्हा मी टुणकन् उडालोच. मी समोर पाहिले, तर उंचच्या उंच झाडाप्रमाणे गणेशवाडीभट उभा होता व आमच्याकडे शिप्तरासारखे डोळे करून पाहत होता.

"वाच एकदा आणखी डोळे उघडून!" तो पुन्हा गरजला.

मी बिचकत पुन्हा वाचू लागलो. "मग एक समय उच्छाद करून शत्रूचे सारे सैन्य–"

गणेशवाडीभटाने घरात डोके घातले आणि थेट परसापर्यंत ऐकू जाईल अशा गडगडाटाची हाक दिली,—"आब्याऽ!"

आबा नुकतेच कचेरीतून येऊन कपभर चहा घेत बसले होते. घरी आल्यावर तेही सदरा घालत नसत. खांद्यावर जानवे सावरत ते बाहेर आले व उंबऱ्यापाशी थांबले.

गणेशवाडीभट मला म्हणाला, " ही मराठी भाषा, या तुझ्या आबाने चहा पिता पिता कणीक मळून ठेवावी तशी खाजगी मळून ठेवली होय रे तुझ्यासाठी? तू त्याचा दिवटा चिरंजीव. वापर ती वाटेल तशी! तुझी मुंज नाही, तुझ्या उच्चाराला संस्कार नाहीत! वाच डोळे वापरून. डोळे जर वापरावयाचे नाहीत, तर ते असतात कशाला? मग बटाट्यालाही डोळे असतात की! म्हण स्पष्ट–एकसमयावच्छेदेकरून!"

मी त्या शब्दातील एकेक अक्षर वाचून पाहिले. खरेच तो शब्द 'एकसमयावच्छेदेकरून' असा होता. आता असला कसला आडदांड शब्द पुस्तकात एखाद्या झुरळाप्रमाणे येऊन

बसेल अशी कुणाला कल्पना तरी असेल? उच्छाद हा शब्द मी आईकडून पुष्कळदा ऐकला होता. पण हा अजस्र शब्द मात्र गणेशवाडीभटाने खिळा ठोकून आठवणीत बसवला. तो गेल्यावर ताबडतोब मी पुस्तक पिशवीत कोंबले. बाळू तर केव्हाच पसार झाला होता. पण त्या दिवसापासून पायरीवर बसून वाचायला मात्र मला फारसा उत्साह वाटेना!

पण गणेशवाडीभट होता म्हणून तर राधीला त्या गल्लीत जगता येत होते. कधी तरी दुकानात जाऊन चहाची पूड, गूळ आणता येत होता. शिवाय तो तिच्यासाठी कधीतरी जेवायची आमंत्रणे आणत असे. दत्ताला आलेला प्रसाद तिच्याकडे पाठवी. विशेषतः तिच्याशी राजरोसपणे धिटाईने रस्त्यात बोलत उभा राही.

आमची शाळा महादेवाच्या देवळात भरे. परत येताना मी, मराठ्यांचा बाळू, गोखल्यांची शांती मिळून येत असू. पण एक दिवशी मी माझ्या नव्या वहाणा शाळेतच विसरलो. त्या आणायला परत गेलो. तोपर्यंत शांती आणि बाळू पुढे गेली होती. वहाणा आबांनी आजच आणल्या होत्या व त्या चकचकीत दिसत होत्या. मी त्याना लागलेली धूळ हातोप्याने पुसली. पण तळव्याला लागलेली माती जाईना. तेव्हा मी सदऱ्याचा ओटा उलटा करून ती पुसून काढली. पण त्यावेळी जवळच कुणीतरी हसले, म्हणून मी चमकून पाहिले. प्रथम मला कोण ते समजेना. पण मग आवाज आला,–"अरे, मी राधी रे!"

राधी खिडकीतून पहात मला बोलावत होती. तिच्या कपाळावर अस्ताव्यस्त पसरलेले कुंकू लाल कापडाच्या चिंधीसारखे दिसत होते व खिडकीच्या काठ्या तोंडावर ओरबडल्याप्रमाणे वाटत होत्या. मी थोडा घाबरलो होतो. कारण मी तिच्याकडे गेलो होता हे घरी जर आईला समजले, तर हाडांची पूड होईल. पण मला राधीच्या त्या एवढ्याशा खोलीविषयी फार उत्सुकता होती. ही जादूटोणा करणारी, मुलांना बिब्बा घालणारी, वाईट नजरेची बाई कशी राहते हे मला पाहायचे होते. आता रस्त्यावर कोणी नव्हते. मी धावत आत वळलो व दाराआड उभा राहिलो.

"तू इथं आलेला समजलं तर आई तुला चांगला ठोक देईल. होय की नाही?" ती मनमोकळेपणाने हसत म्हणाली.

मी मानेनेच होय म्हटले.

"पण तू तरी अशी कशाला नजर लावत हिंडतेस?" मी असे विचारताच तर ती हसत खालीच बसली.

"तू तरी खुळचटच आहेस!" ती म्हणाली, "अरे, माणसाच्या डोळ्यांनी कधी दूध नासतेय्? गाई हरवतात? तुझ्या आईनंच मागं एकदा म्हटलं होतं, 'राधी, जोडवी धुतलीस वाटतं आज?' आणि त्याच दिवशी माझं एक जोडवं कुठं हरवलं देव जाणे? म्हणजे मला तुझ्या आईची नजर लागली होय रे पोरा?"

हे खरेच कधी माझ्या ध्यानात आले नव्हते. बाळूने एकदा पांढरी शुभ्र दौत घेतली होती. मला तसली एक दौत फार दिवसांपासून हवी होती. मी त्याला म्हटले होते, "चैन आहे बुवा तुझी. दुधी दौत आहे तुला!' त्याच वेळी समोरून एक गाय येत होती. म्हणून

शांती एकदम बाजूला सरकली. त्या धक्क्याने दौत खाली पडली आणि तिचा चकणाचूर झाला. विशेषतः शाई बाळूच्या पायांवर पडून ते अगदी वहाणा घातल्यासारखे दिसू लागले, हे पाहून तर मला आणि शांतीला हसू आवरेना. परंतु त्या दौतीला माझी नजर लागली असावी, असे मात्र मला कधी वाटले नव्हते...

पण आता राधीचे बोलणे ऐकून मला एकदम मोकळे वाटू लागले व मी एका जुन्या खोक्यावर बसलो. आत खोलीत कोंदट ओकेओके होते. चुलीजवळच्या भिंतीचा भाग धुराने काळवंडला होता. एका मोठ्या कोनाड्यात थोडी भांडी होती व बाजूला कसला हे न ओळखण्याजोगा एक फोटो होता. चुलीजवळ काळसर झालेले अल्मीनचे पातेले होते व त्यावरील झाकणात मूठभर शेंगदाणे होते. आई नेहमी सांगत असे, त्या चहाचे ते पातेले असावे. राधी सकाळी एकदा पातेलेभर चहा उकळून ठेवी व त्यातून अर्धा-पाव कप ती संध्याकाळपर्यंत पीत असे. जमिनीवर एक गोणपाट अंथरलेले होते व उशाला जुनेऱ्याचे मुटकुळे होते. खोलीकडे पाहिले की एकंदरीने एखाद्या जुनेऱ्याचीच आठवण होत असे.

राधीने इकडेतिकडे पाहिले व हात उडवत म्हटले, "मी तुला चहा दिला असता, पण तो आहे गुळाचा!" ती थोडी शरमल्यासारखी झाली. पण लगेच तिचा आवाज पुन्हा उत्साही झाला, "थांब. मी तुला दोन आमसोले देते. त्यात मिठाचा खडा ठेवून ती तोंडात धरली की, इतकं छान लागतं म्हणतोस!"

तेव्हापासून आमच्या घरी आमसोलाचा खप वाढला. 'आमसोऽल फणसपोळीऽऽ' असे ओरडत हिंडणारा वेंगुर्ल्याचा तो उंच कोकणा आमच्या घरी आत महिन्यातून दोनदा गाठोडी उतरू लागला. बाळू—शांती आता हटकून मला बोलावून न्यायला घरी येऊ लागली, आणि शाळेत मी शेजारी येऊन बसावे म्हणून चारपाच पोरे तर दररोज मला इकडून तिकडे ओढू लागली. पण हे फार दिवस टिकले नाही. एकदा मी कपडे धुवायला टाकले, तेव्हा आईला खिशात आमसोले आणि मिठाची पुडी मिळाली. त्या दिवशी ती फार कामात असतानाही तिने त्यातल्या त्यात वेळ काढून मला दोन तडाखे देण्याचे काम तत्परतेने आटोपून घेतले. पण तोपर्यंत मला राधीने करवंदे दिली होती. एके दिवशी तिने एका मळक्या कपात साबणाचे पाणी केले व एरंडाच्या पानांच्या पोकळ देठांनी डोक्याएवढे रंगीत फुगे करायला शिकवले. जोंधळ्याचे ताट आणून, त्यातील भेंड काढून त्याची गाडी करून दाखवली. काही वेळा ती मला गाणी म्हणून दाखवी. तिचा आवाज फारसा गोड, गुळगुळीत नव्हता; पण अंथरुणात पडल्यापडल्या आईच्या जात्याची घरघर ऐकावी, तसे मला वाटे. त्यात कृष्णाचे एक गाणे होते. कृष्णाने एका बाईचे रूप घेतले व तो एका म्हातारीच्या दारात बसून राहिला. मग पाऊस आला. तशी म्हातारीने त्याला आत घेतले, आणि कृष्णाने तिचे दहीदूध खाऊन तिला फसवले. अशी ती हकीकत होती.

'अवकाळी मृग आला,<br>
करुणा आली त्या म्हातारीला,<br>
जवळ बसे, नाव पुसे—

ती त्या बायकोला,
'माझं ग नाव कृष्णाबाई'
असंच देव बोलला...'

कृष्णाने आपले नाव कृष्णाबाई सांगावे याची मला फार गंमत वाटे. पण मला फार, अतिशय आवडे ते गाणे म्हणजे गाय-वाघाचे होते. एकदा एक गाय चरायला गेली असता वाघाच्या तावडीत सापडते. पण 'घरी वासरू आहे, मला सोड,' म्हणून ती सारखी याचना करते. पण वाघ ऐकत नाही. शेवटी 'मी वासराला एकदा भेटून परत येते' असे ती सांगते. पण वाघ म्हणतो, 'तू परत येशील म्हणून कशावरून?' तर ती सूर्याची शपथ देते. गाय घरी येते, वासराला भेटून त्याचा निरोप घेते आणि परत वाघाकडे येते. पण मग वाघ तिला सोडून देतो. वासराचा निरोप घेताना गाय वासराला म्हणते,–'अरे, आता यापुढे मी तुझ्याजवळ असणार नाही. तुला एकटेच राहायला शिकले पाहिजे. चरायला जाताना तू सगळ्यांबरोबर जा. येताना त्याच्याबरोबर ये. रानात अवेळी भटकू नकोस. संभाळून राहा व सुखाने मोठा होऊन आनंदाने राहा. मी तर जाते.'

हा भाग ज्या ज्या वेळी येत असे, त्या वेळी मला हटकून रडू कोसळे. गाणे तर खूपदा ऐकावेसे वाटे आणि रडू तर अगदी आवरत नसे. गाणी म्हणताना, मी फुगे करताना राधी माझ्या अगदी जवळ बसून असे. एखाद्या पेटलेल्या चुलीजवळ बसले की स्वैपाकघराचा कसा उबदार घरगुती वास येतो, तसा तिला एक वास होता आणि तो मला फार आवडे. आईच्या अंगालाही ऊब होती. पण तिला नेहमी स्वच्छ धुतलेला, साबणाचा वास येत असे, व ती मला तर नेहमी आमच्या झगझगीत धारदार सुरीसारखी वाटे. बाहेर जाताना तिच्याबरोबर राहायला मला फार अभिमान वाटे. पण काड्याच्या पेटीत घातलेली गणेशपाखरे. एकशेआठ वेळा रामनाम लिहून मारुतीच्या गाभाऱ्यात टाकलेली चिट्ठी, परसात उंबराच्या झाडावर बुलबुलांनी बांधलेले घरटे, आत लाल दोरा असलेल्या काचेच्या गोटीला गेलेला तडा, या गोष्टी कशा राधीला सुखदुःखाने सांगाव्याशा वाटत, तशा आईपुढे बोलाव्याशा वाटत नसत. मी वर्गात एकदा हत्तीचे चित्र काढले. तर मास्तरांनी म्हटले, "काय रे बेट्या, या हत्तीला पंडुरोगबीग झालाय की काय? मग त्या काळे डॉक्टरांना तरी नेऊन दाखव!" पोरे कशी पाच मिनिटे खिस्खिस् हसत होती. घरी आल्यावर मी ती हकीकत आईला सांगितली, तर ती उलट मलाच म्हणाली, "तू गाढवासारखं हत्तीचं चित्र काढलंस कशाला?" खरे म्हणजे ते चित्र गाढवासारखं बिलकूल दिसत नव्हतं. दुसऱ्या दिवशी मी राधीला ती गोष्ट सांगितली. ती उठली, तिने आपले फाटके लुगडे आवरले आणि हातात चुलीजवळची फुंकणी घेतली. ती म्हणाली, "चल! दाखव कुठाय् तुझा मास्तर तो! त्याचं डोके भादरते!" मी तर घाबरूनच गेलो. मी म्हटले, "नको गं! आमचे मास्तर फार मारकट आहेत." ती म्हणाली, "जा रे जा! तो एक मारकट असला तर मी सात मारकट आहे!" शेवटी, त्या मास्तरांची बदली झाली,

एक महिन्यापूर्वीच ते गेले, असे मी सांगताच तिने फुंकणी बाजूला ठेवली. खरे म्हणजे पत्कीमास्तर आमच्या मागच्याच गल्लीत राहत होते!

त्या दिवशी दप्तर घेऊन मी घरी आलो त्यावेळी बराच उशीर झाला होता. आई परसात तुळशीपाशी पणती लावण्याच्या तयारीत होती. मी हळूच आत शिरताच तिने मान वर करून पाहिले. तेव्हाच तिच्या कडक डोळ्यांकडे पाहून मी ओळखले, आता मात्र आपली हाडे धड राहणार नाहीत. या आईविषयी मला नेहमी एक आश्चर्य वाटे. बशीत शिरा घालून देताना तो बशीबाहेर सांडेपर्यंत ती अगदी रुंद हाताने सढळ भरी. तेल लावून आंघोळ घालताना तिचा हात मऊ आटवलासारखा फिरे. पण काही वेळा मात्र तिची बोटे अशी कशी दगडाची होत हेच मला समजत नसे. मागे एकदा मी काळे डॉक्टरांच्या घरी सत्यनारायणाचा प्रसाद द्यायला गेलो होतो. तेथे बाहेरच्या टेबलावर काचेचा चौकोन होता. त्यात असलेली लहानलहान फुले मला फार आवडली, म्हणून मी तो चौकोन उचलून आणला. मला चोरी करायची नव्हती, आणि कागदावर ठेवायला काही हवे होते असेही नाही. उलट, दुसऱ्या दिवशी मी तो परत देऊन टाकणार होतो. पण तो माझ्या हातात पाहून आईने मला असे बडवले की त्यापुढे पत्कीमास्तर म्हणजे अगदी कापूसबोळा! दुसऱ्या दिवसापर्यंत गाल-पाठ ठणकत होती. आबा अनेकदा माझ्या बाजूने बोलत! पण त्या दिवशी मात्र ते देखील घाबरून गप्पगार बसले होते.

आत्ताच पाहा! यावेळी एवढा अंधार झाला होता. मग आधी परसात जाऊन तुळशीपुढे पणती लावायची, की मला उशीर का झाला याची चौकशी करत बसायचे? पण आईने हातातली पणती बाजूला ठेवली आणि माझा हात धरून मला खस्सदिशी पुढे ओढले.

"कुठं होतास रे इतका वेळ?" तिने करड्या आवाजात विचारले.

"कोण मी?" मी उत्तर आठवण्यासाठी वेळ काढत म्हणालो.

"तू नव्हे. टिपू सुलतान! म्हैसूरचा वाघ!" ती वेडावत म्हणाली, "बोल! कुठं होतास भटकत?"

"मी महादेवाच्या देवळात खेळत होतो."

"लाज नाही वाटत खोटं बोलायला?" ती कडाडली, "आज सोमवार. मी तर तिथे अर्धा तास होते की!"

"अग, त्या देवळात नव्हे, मी मोठ्या महादेवाच्या देवळात होतो." मी गोंधळून म्हणालो.

"मी तर आज मोठ्या महादेवाच्या देवळातच गेले होते." ती विजयाने म्हणाली, "आता खरं खरं सांग कुठं होतास ते!"

"पण सोमवारी तिथं गर्दी असते. मी दिसलो नसेन तुला!" मी अगदी भेदरून कसाबसा म्हणालो.

"थांब! तुझी हाडं सैल केल्याखेरीज तू वठणीवर यायचा नाहीस! चांगला निर्ढावलेला बेरड झाला आहेस तू. आज सोमवार होय रे माकडा?" ती म्हणाली.

मग माझ्या ध्यानात आले, खरेच आज सोमवार नाही, मंगळवार आहे! पण आता काही इलाजच राहिला नव्हता. आताच माझे गाल गरम होऊ लागले होते. पाठीत बसणाऱ्या धुमक्यांचा आवाज कानी ऐकू येऊ लागला होता.

"बोल! त्या चेटकीबरोबर गेला होतास की नाही मसणात?" आई चिडून म्हणाली. मग मला सारे सांगावेच लागले. मी राधीबरोबर गेलो होतो, पण मसणात नाही! मी शाळेहून लवकर परतलो होतो. येताना तिने मला खिडकीतून हाक मारली आणि माझ्या हातावर भोपळ्यासारख्या रेघा असलेले दोन मोठे रायआवळे ठेवले. असले रसरशीत,सुरेख आंबट आवळे मी कधी पाहिले देखील नव्हते. मी आणखी दोन मागितले.

"अरे, मी काय पोतंभर आवळे आणून ठेवलेत की काय घरात?" राधी हसून म्हणाली, "त्या करंदीकरांच्या घरी मिरचीपूड टाकून द्यायची होती, म्हणून मी गेले होते. तेव्हा त्यांना विचारून मी दोनचार आवळे घेतले झालं. ती करंदीकरकाकू आहे ना, ती फार मोकळी आहे. ती म्हणाली, 'घे की! जळ्लं त्यात काय विचारावयाचं? दररोज सूपभर खाली पडून जातात मातीत.' मी म्हटलं, तुला एक दिवस घेऊन जाईन. अरे झाड अगदी लहान आहे. माझ्या खांद्यावर चढलास की झाडावरूनच तुला आवळे काढता येतील."

प्रत्यक्ष झाडावर चढून असले आवळे काढून खायचे, या आनंदाने माझे पायच गेले. मी तसेच राधीला करंदीकरांकडे नेले. तिच्या खांद्यावर पाय देऊन मी झाडात गेलो, तेव्हा सगळीकडे आवळेच आवळे पाहून किती तोडू नि किती खाऊ असे होऊन गेले मला. मी दप्तर भरून घेतले आणि खाली उतरलो. तोपर्यंत अंधार पडायला आला होता.

आईने सारे ऐकून घेतले व पिशवीतले सगळे आवळे काढून बाहेर फेकून दिले.

"आता पुन्हा त्या कैदाशिणीकडे गेलास तर पाय मोडून देईन! वरवंट्याकडं बघितलं तर तो तडकतो. असली बया ती! आणि तिथं जाऊन गुलगुल गोष्टी करत बसतोस! थांब! तुला चांगलं लक्षात राहील असं शिकवते." आई म्हणाली. आणि तिने खिडकीत एक देवदारी फळकूट होते ते उचलले.

आज कधी नाही ते आबादेखील माझ्यावर संतापले. ते देखील उठले आणि हातवारे करत ओरडून म्हणाले, "खरंच! नाहीतरी कार्टं फार बिघडत चाललंय्. त्याला चांगलं शिकवलं पाहिजे." त्यांनी मला हाताला धरून ओढले नि डोळे गरगरत ते आईला म्हणाले, "आण ते फळकूट. मीच त्याला चांगली अद्दल घडवतो. चल रे माडीवर!"

आबांनी मला एकदादोनदा ढकलून माडीवर नेले. आबादेखील फळी घेऊन धावलेले पाहून मात्र मी रडकुंडीला आलो. पण माडीवर दुसऱ्या सोप्यावर आल्यावर त्यांचा कठोर चेहरा एकदम वितळला व डोळे मिचकावून ते हसले. त्यांनी दोनचारदा ती फळी शास्त्रासाठी माझ्या अंगाला लावली न लावली.

मी म्हटले,

"आबा हे काय?"

"काय म्हणजे? फळीनं मारीन असं मी म्हणालो होतो ना? मी तुला आता फळीनं मारतो आहे. किती जोरात मारीन असं कुठं मी सांगितलं होते? मी बोलण्याप्रमाणं करणारा माणूस आहे. आणि खोटं सांगणं तर मला बिलकूल पसंत नाही." आबा म्हणाले. मला एकदम हसू येताच 'शश्' करत त्यांनी मला गप्प बसवले व हळूच म्हटले, "अरे, त्या पिशवीत एखादा रायआवळा शिल्लक राहिला आहे का बघ रे! मलादेखील ते फार आवडतात."

त्या दिवसापासून मात्र आबा माझे दोस्त झाले. ते राधीविषयी चौकशी करत, आणि त्यांनी न विचारलेल्या पुष्कळ गोष्टी मी त्यांना सांगत असे.

पण त्या दिवशी मी राधीच्या घरी गेलो त्यावेळी तेथे असे काहीतरी वाट पाहत असेल अशी मला कल्पना नव्हती. मी जाताच ती एकदम जवळ आली नि हसत म्हणाली, "बघ! तुला एक कुत्रं हवं होतं ना! मी आणलंय् एक. काल परांजपेकडे पाणी भरायला गेले होते. त्यांच्याकडे आता तीन चार कुत्री झाली आहेत, आणि त्यांच्या ओरडण्यानं ती माणसं अगदी कंटाळून गेली आहेत. बाईनं तर सांगितलं, "राधी, दररोज एकेक घेऊन जाऊन सोडून ये त्यांना कुठेतरी मसणात. जीव अगदी भंडावून सोडला बघ त्यांनी!' मग मी हे त्यातल्या त्यात लहान कुत्रं आणलं तुझ्यासाठी. मात्र त्याला थोडे दिवस दोरीनं बांधून ठेवायला पाहिजे बरे का सवय होईपर्यंत."

तिने एका सुतळीने कुत्र्याला खिडकीला बांधून ठेवले होते व पुढे एका मातीच्या थाळीत भाकरीचा तुकडा टाकला होता. मला पाहताच ओळख पटल्याप्रमाणे ते कुत्रे शेपूट हलवू लागले. त्याचा काळा रंग कावळ्याच्या पंखासारखा चकचकीत काळा होता,पण ऐन वेळी काळा रंग संपल्याप्रमाणे पाठीवर मात्र चार बोटे पांढरा डाग होता. मी त्याला हळूच पांढऱ्या डागावर स्पर्श केला. ते लगेच माझी बोटे चाटू लागले.

"आवडलं तुला? नाहीतर मला अडाणीला कुत्र्यात काय समजतं दगड?" राधी म्हणाली. पण मला ते फार आवडले म्हणताच ती अगदी खूष झाली. पण मला आईची आठवण होताच मी हिरमुसून गप्प झालो. ती कधी त्या कुत्र्याला अंगणातदेखील येऊ द्यायची नाही याची मला खात्री होती.

"का रे, गप्प का?" राधीने विचारले.

"पण हे ठेवायचं कुठं? आई तर—"

राधी हसली व तिने मला डोक्यावर थापटले. ती म्हणाली, "नाहीतरी हे तू घरी नेऊच नकोस. इथं राहील की ते माझ्याजवळ. तुला हवं त्यावेळी तू त्याला फिरवून आण आणि मग बांध त्याला खिडकीला."

एकदम सारे दरवाजे उघडल्याप्रमाणे मला फार मोकळे वाटले आणि मी धावतच घरी आलो. त्या दिवशीही मला उशीरच झाला. पण आई स्वैपाकघरात होती. मी हळूच

आत सटकलो व माडीवर आबांकडे गेलो. मी एकदम त्यांच्या खांद्यावर पडून सांगितले, "राधीनं मला छान कुत्रं आणलंय!"

मी एकदम पडल्याने विडीचा झुरका घेताना आबांना ठसका लागला. ते खोकत म्हणाले, "कार्ट्या! माणूस आहेस की बकासूर आहेस! आता घरी मात्र आणू नकोस तुझं कुत्रं. तू जाणे, तुझं कुत्रं जाणे! ते सगळे बाहेर! नाहीतर तू आणि मी––दोघांनाही धर्मशाळेत रहावं लागेल बघ. जगदंबा तशी कुणाला सैल सोडायची नाही!"

नंतर एकदा त्या कुत्र्याला घेऊन मी आबा कचेरीहून येत त्या रस्त्याला उभा राहिलो, आबांनी त्याच्याकडे पाहिले नि म्हटले, "हेच तुझं काळं काय रे? अशक्त दिसतंय. खायलाप्यायला घातलं पाहिजे पुष्कळ. पण फार जीव लावू नको रे पोरा! जिवंत गोष्टींना जीव लावून गोत्यात पडू नये माणसानं."— आबा अनेकदा असेच काहीतरी बोलत व त्यावेळी ते मला एकदम निराळे, दूरचे वाटत. आम्ही न बोलता परतलो. वाटेत त्यांनी एक पैशाचा रोट घेतला आणि मला दिला. "त्याला खायला घाल आणि राधीकडे त्याला सोडून परी ये परत." ते म्हणाले.

पण काळे घरात आले, आणि राधीचे आयुष्य मात्र बदलून गेले. तिला आता सवाष्ण म्हणून कुणी बोलवायला तयार नव्हते. केळकरांच्या घरी तर त्या माणसांनी राधीला 'उंबरा ओलांडू नको' म्हणून चक्क सांगितले. देसायांच्या घरातील वार बंद झाला,आणि करंदीकरांची माणसे तीनचार महिन्यांसाठी मुंबईला गेली, त्यामुळे त्यांच्याकडील पडझड कामेदेखील बंद झाली. कारण काळे घरात आले, आणि तेव्हापासून गल्लीत चेटकाचे प्रकार फारच वाढले. एकदा गल्लीच्या कोपऱ्यावर लिंबू व कुंकू घातलेला भात दिसला. काळ्यांच्या अंगणातील डाळिंबाचे झाड पाहतापाहता वाळून गेले. त्याच्या आदल्या दिवशीच राधी काळ्याला घेऊन तेथे गेली होती आणि त्याने त्या झाडाला अंग घासले होते. रमाकाकूंनी राधीने दिलेला कढीलिंब घेतला आणि त्यांची गाय आटून बसली. भागीरथीबाईंचा रहाट गडगडा मोडून नव्या घागरीसकट पाण्यात पडला. बाळंतपणासाठी आलेल्या गौरीचे मूल तर सातव्या महिन्यातच गेले. आता राधी रस्त्याने चालू लागली की बायका सरळ बाहेर येऊन तिला शिव्या देऊ लागत. गणेशवाडीभटाच्या नाऱ्याने तर चारपाच पोरांची एक टोळीच केली होती. आणि ती भिंतीआडून राधीला दगड मारत.

गणेशवाडीभटाचा नाऱ्या म्हणजे सगळ्या गावावरून ओवाळून टाकलेले, आडदांड, होळीत अर्धवट जळालेल्या ओंडक्यासारखे पोर होते. तो माझ्याहून चारपाच वर्षांनी मोठा असेल; पण त्याला शाळा नाही, शुळा नाही, आणि गणेशवाडीभटाने त्याला लाथ मारून घराबाहेर काढले होते. तो आता उगाचच खोड्या करत लक्ष्मीला सोडलेल्या रेड्याप्रमाणे गावभर भटके. आमच्या शेजारी रामभाऊ दड्डीकर राहत. त्यांची बायको सावित्रीबाई मोठी जाडजूड अजस्र बाई होती आणि तिचा दंड माझ्या मांडीएवढा होता. गल्लीच्या टोकाला काळे यांचा दवाखाना होता. त्यांची बायको तर रस्त्याने चालली की कपड्यांचे मोठे कपाटच फिरायला चालले आहे असे आम्हाला वाटे. तर या नाऱ्याने कुठलेतरी

डांबर आणून सावित्रीबाई व काळीणबाई यांची निकाली कुस्ती होणार अशी जाहिरात महादेवाच्या देवळाच्या भिंतीवर लिहून ठेवली होती. पिंपळकट्ट्याजवळच्या गंगव्वाला दररोज फुले लागत. सायकलीला एक करंडी अडकवून ब्राह्मणाचा एक मुलगा येत असे व पानात बांधलेल्या फुलांचा पुडा उघड्या खिडकीतून आत टाकून जात असे. एकदा या नाऱ्याने त्याला कोपऱ्यावरच गाठले, आपण गंगव्वाच्याच घरी जाणार आहो असे सांगून फुलांचा पुडा घेतला, आणि मग त्यात दोन मोठ्या बेडक्या घालून पुडा खिडकीतून आत फेकला. नंतर गंगव्वा, तिची मुलगी भीमा यांच्या किंकाळ्या चांगल्या अर्धा तासभर गल्लीत निनादत होत्या. त्याशिवाय घरात चारपाच कपबश्या फुटल्या, दूध सांडले, आरसा खाली पडला, हे निराळेच. भास्कराचार्य ज्योतिष्याच्या घरावर तेथील 'येथे रमल सांगितले जाईल' ही पाटी काढून गणू शिंप्याची 'सदरे-चोळ्या शिवणार' ही पाटी लावणारा नाऱ्याच! खरे म्हणजे अण्णाबुवा इतका चिकू माणूस, की आबा तर सांगत की, एकदा भीक मागायला आलेल्या भिकाऱ्याच्याच भांड्यातून त्याने मूठभर तांदूळ काढून घेतले. गणेशवाडीभट म्हणे की, अण्णाबुवाने आपल्या मुंजीतल्या अक्षता नातवाच्या मुंजीत पुन्हा वापरण्यासाठी अद्याप जपून ठेवल्या आहेत! यांतले खरेखोटे किती कुणास ठाऊक म्हणा. पण या अण्णाबुवाच्या घरी सार्वजनिक हळदीकुंकू आहे असे सगळीकडे आमंत्रण देऊन त्याच्या घरी बायकांची झुंबड पाठवणारी पोरे नाऱ्याच्याच टोळीमधली. या नाऱ्याला समोर पाहिले की आम्ही तर धूमच ठोकत असू.

या नाऱ्याने एकदा म्हणे अमावास्येच्या रात्री, राधी काळ्याला घेऊन पिंपळासमोर उदबत्त्या लावून बसली होती असे पाहिले होते. आता रात्री दररोज कुणी ना कुणी राधीच्या घरावर दगड फेकत असे. एकदा कुणीतरी चिंध्या तेलात बुडवून पेटवून तिच्या खोलीवर टाकल्या होत्या. खोलीवर पत्रा होता व राधीने जाळ ऐन वेळी पाहिला होता म्हणून बरे. पण भाजलेला हात घेऊन ती पंधरा दिवस तळमळत होती. तिच्याशी आता कुणी उघडपणे बोलत होते की नाही कुणास ठाऊक. फार तर कधी गणेशवाडीभट मात्र तिला पत्रावळीतून काहीतरी देई. कधीतरी तो काळ्याला घेऊन फिरायला जात असे आणि पैशाला तीन मिळणारी पिवळी लाकडासारखी घट्ट बिस्किटे त्याला खाऊ घाली. एकदा मी शिंप्याकडे आबांचा सदरा झाला आहे का हे पाहायला गेलो होतो, तेव्हा गणेशवाडीभट तेथेच होता. गणूचे बाकीचे सारे अंग ठीक होते, पण गुडघ्याखालील पाय मात्र पाळण्याच्या खुराप्रमाणे सारे वीतभर होते. त्यामुळे मशीनवर तो उभ्यानेच काम करी. ते मशीनही गणेशवाडीभटानेच त्याला धंद्यासाठी घेऊन दिले होते. गणू तसा थोडा नाकखुपशा माणूसच होता. त्याने गणेशवाडीभटाला विचारले, "भटजी, तसल्या बिगनेशी कुत्र्याला घेऊन कशाला हिंडता फुकट तुम्ही?"

गणेशवाडीभटाने त्याच्याकडे एखाद्या बेडकाकडे पाहावे तसे पाहिले आणि तो म्हणाला, "तू चिंधीचोर तेवढा उपटसुंभासारखा मला शिकवायचा बाकी राहिला होतास बघ! अरे, त्या कुत्र्याला काही खायला दिलं, तर ते जाणेल तरी. मी मरायला लागलो तर एकदा

येऊन जाईल, घसा ताणून ओरडेल तरी. पण तुमच्यासारख्यांची ढुंगणं धूत जन्म काढला तर करंगळीवर तुम्ही मुतायला तयार होणार नाही, डुक्करचंदानो! अरे लडदू, चार कुत्री भोवती ठेवून फोटो काढून घ्यायला दत्ताला लाज वाटत नाही. एक कुत्रं बरोबर घेऊन हिंडायला मला सोट्या रे कसली लाज?"

गणू गप्पगार झाला होता. काळ्याची बाजू गणेशवाडीभटाने घेतल्यामुळे मला फार बरे वाटले होते. विशेषतः दत्ताबद्दलचे त्याचे शब्द मला फार आवडले होते. मला जर कुणी कुत्र्याविषयी काही म्हटले, तर तेच म्हणून दाखवण्याचे मी तेथल्या तेथेच ठरवून टाकले होते.

एके दिवशी आईने मला समोर उभे केले. आबाही बाजूलाच होते, पण विडी ओढीत, गप्प. आईने माझ्यापुढे एक बोट नाचवत म्हटले, "मी यांनाही सांगितलं आहे. यापुढे राधी घरात सवाष्ण म्हणून यायची नाही. तिची त्यांनी विचारपूस करायची नाही. आणि तूही लक्षात ठेव. तिच्याकडे गेलास, बोललास तर याद राख. तुला माझी शपथ आहे. जर तू शपथ मोडलीस, तर मी पटदिशी मरून जाईन."

आईच्या मरणाच्या कल्पनेनेच माझ्या अंगावर सर्रकन काटा आला. मी तिला शपथ दिली खरी, पण मला एकदम खूप रडावेसे वाटू लागले. आबा एकदम उठले व डोक्याला रुमाल गुंडाळतच घराबाहेर पडले.

मी शाळेहून येताना राधीने मला एकदा दोनदा हाक मारली, पण मी मान हलवून तसाच परतलो. परंतु त्यावेळी माझ्या डोळ्यांत पाणी आले होते. नंतर–नंतर तर मी शाळा सुटल्यावर मागच्या गल्लीने येऊन परसातून घरात येऊ लागलो. मला कुठे जावेसे वाटत नव्हते, काही खेळायची इच्छा होत नव्हती. संध्याकाळचे खाणेदेखील मला काही वेळा नकोसे होऊ लागले. राधीदेखील रस्त्यात फारशी कधी दिसत नसे. कधीतरी वेड्यावाकड्या पट्ट्यांच्या खिडकीशी तिचा चेहरा, कपाळावर उधळलेले कुंकू, अस्ताव्यस्त केस दिसत. पोरे तेथून जायला घाबरत, आणि रविवार–बुधवार या बिब्ब्याच्या दिवशी तर त्यांना ती बाजूच बंद असे. एकदा संध्याकाळी मी खिडकीत बसलो होतो, तेव्हा काळे रस्त्याने चाललेले मला दिसले. मला न राहवून मी एकदम दारात धावलो आणि त्याला बोलावले. मला पाहताच ते पटकन कट्ट्यावर चढले आणि खुळ्यासारखे तेथल्या तेथे उड्या मारू लागले. आईने ते केव्हा पाहिले कुणास ठाऊक, ती हातात काठी घेऊन आली आणि तिने नेमकी काळ्याच्या पाठीवरच्या पांढऱ्या तुकड्यावर हाणली. के के करत काळे पळून गेले, पण मला मात्र फार शरम वाटली. मी अगदी कळवळल्यासारखा झालो. मीच त्याला बोलावले नसते, तर त्याला हा तडाखा मिळाला नसता...

मी अनेकदा रात्री अंथरुणात जागाच तडफडत पडे. काही वेळा मला राधी, काळे यांची स्वप्ने पडत. काळे गाडीखाली सापडले आहे, राधीला दगड लागून तिच्या कपाळावरचे रक्तच कुंकवासारखे दिसत आहे, नाऱ्या आणि ती उनाड पोरे हातात धगधगीत दिवट्या

घेऊन राधीला अंगभर भाजत आहेत, असे पुष्कळदा दिसे व छाती दडपून गेल्यासारखी होई.

एकदा रात्री मला आईने हलवून जागे केले व दिवा लावला. आबाही उठून बसले होते व माझ्याकडे पाहत होते. माझा चेहरा ओलसर झाला होता. आईने माझे डोळे–तोंड पदराने पुसले.

"हे बघ, तुला जर उद्यापासून राधीकडे जायचं असेल तर जात जा. माझी शपथ सुटली." ती म्हणाली, "पण झोपेत राधी म्हणत ओरडत जाऊ नकोस. या आठवड्यात तिसरी खेप ही तुझी ओरडण्याची!"

मी एकदम उठून बसत विचारले, "खरंच जाऊ? शपथ?"

"शपथ." आई म्हणाली, "तुझं नशीब तुझ्या बरोबर. मी तरी त्याला सावरूनसावरून किती सावरणार? आणि मी तरी काय तुला जन्मभर पुरणार आहे? सारं घरच फितूर, तर मीच एकटी कशाला जीव टांगणीला लावून घेऊ?" ती अंथरुणावर पडली आणि बाजूला वळून तिने तोंडावरून पांघरूण घेतले.

दुसऱ्या दिवशी शनिवार होता आणि शाळा सकाळीच होती. मी धावतच जाऊन राधीला भेटलो. ती त्या अल्मीनच्या पातेल्यात चहा उकळत होती. मला पाहताच तोंडावर बोट ठेवत 'अय्यो!' म्हणत ती खिळल्यासारखी उभी राहिली. मी भडाभडा सारी हकीकत तिला सांगून टाकली.

"म्हणजे आईची शपथ मोडून तू इथे आलास?" तिने विचारले.

"नाही ग. तिने सुटली म्हटलं. जायला देखील सांगितलं मला." मी म्हणालो. मग काही न बोलता राधीने मला एकदम जवळ घेतले व फणी फिरवलेले माझे केस विसकटून टाकले. "तुझ्या आईचं तुझ्यावर फार प्रेम आहे, नाही?" ती म्हणाली व उगाचच हसली.

त्या दिवशी कितीतरी दिवसांत राधी आमच्या घरावरून गेली. तिला परशाच्या दुकानातून गूळ घ्यायचा होता. मी खिडकीत बसलो होतो. तेव्हा तिने मुद्दाम घराकडे पाहिले व ती माझ्याकडे पाहून हसली. पण तिचे कपडे पाहून मात्र मला तिची फार लाज वाटली. अंगावरचे लुगडे चार ठिकाणी मोठे फाटले होते. पाठीवरचा पदर तर एकपट्टी उरला होता व त्यातून आतली ठिगळाची चोळी दिसत होती. ती गेली तरी मी बराच वेळ तसाच बसून होतो. आई आतून माझ्याजवळ आली तेव्हा तिच्या हातात एक जुनेरे होते.

"जा! घाल जा तिच्या मढ्यावर ते!" ती कठोरपणे म्हणाली, "एकेकाची देणी असतात जन्मात. ती फेडल्याखेरीज गत्यंतर नसतं कुणाला."

मी जुनेऱ्याची घडी घेतली व निघालो. पण आबांनी मला थांबवले.

"तू झालं तरी आडदांड म्हसोबाच आहेस. ते कागदात गुंडाळून नेशील की असंच धरशील हातात?" ते म्हणाले. घरातील रद्दी माडीवरील कोनाड्यात ठेवलेली असे. त्यांनी

एका वर्तमानपत्रात जुनेरं गुंडाळलं आणि माझ्या काखेत दिले. मग माझ्या चड्डीच्या खिशात त्यांनी हळूच दोन रुपयांच्या नोटा घातल्या व खुणेनेच त्या राधीला द्यायला सांगितले.

मी ते लुगडे देताच ते अंगाशी धरून राधी भ्रमिष्टासारखी बसली. काळे कुठे भटकत गेले होते कुणास ठाऊक. राधी म्हणाली, "तुझी आई म्हणजे देवी आहे बघ. फक्त जीभच तिखट आहे. तुमच्या रखमेकडून तिने मला तीनचारदा जेवण पाठवलं होतं. माहीत आहे?"

मला तर कधी आईचा स्वभावच समजला नाही. ती घरी राधीला किती शिव्या देत असे हे मला माहीत होते, म्हणून मी गप्प राहिलो. घरी आल्यावर आईने विचारले, "दिलंस? काय म्हणाली ती?"

तिला तिच्या तिखट जिभेविषयी मी काही सांगितले नाही. राधीचे आपले ठीक होते. दूर राहून असले काही बोलायला तिला भीती नव्हती. पण आईसमोर उभे राहून तसे सांगायचे म्हणजे पायच मोडून घेण्यासारखे होते. मी फक्त एवढेच तिला सांगितले, "ती म्हणाली, तू म्हणजे एक देवी आहेस."

आता एवढ्यावरही आईने माझ्या पाठीवर हलकीच चापट मारली व ती म्हणाली, "सटवीच आहे की ती!"

आज आमची परीक्षा संपली. आता आम्ही—म्हणजे आई आणि मी, आबांना तर कधी सुटीच नसे—मामाच्या गावाला जाणार होतो. परीक्षा चालू असताना मी गेलो नव्हतो, म्हणून गावाला जाण्याआधी मी राधीकडे गेलो. ती त्या गोणपाटावर पडली होती. तिला पाहताच मी घाबरून गेलो. तिचा एक गाल थोडा सुजला होता, आणि पिवळसर पांढरा दिसत होता.

"त्या तुझ्या काळ्यानं काल मला कसं कचकन् चावून घेतलं बघ!" ती रागाने म्हणाली, "आणि मी त्याला विहिरीच्या भिंतीवरून फक्त उचलून आणत होते. नाहीतर दोन दिवस सारखं वचवच अंगावर धावत होतं सगळ्यांच्या. आणि आत्ता बघ, सुतळी तोडून कुठं मसणात जाऊन बसलंय कुणास ठाऊक!"

"मग त्या ठिकाणी काय लावलंस तू?"

"मी चुना-हळद लावली आहे सध्या. रात्री त्याच्यावर विड्याचं पान बांधलं की जाईल ते एकदोन दिवसांत. आता विड्याचं पान मात्र आणायला हवं कुठूनतरी!" जमिनीचा आधार घेत ती उठली. तिने कोनाड्यातील एका भांड्यातून मला तीन बदाम दिले.

"पण आता तुम्ही कधी येणार गावाहून? महिन्याने का?—बराय. मला विसरू नका. नाहीतर मोठ्या गावाला जाऊन आल्यावर राजश्री मला ओळखणार नाहीत." ती म्हणाली आणि हसली. पण तिच्या सुजलेल्या गालामुळे तिचे हसणे बघून मला गुदमरल्यासारखे झाले.

का कुणास ठाऊक, पण मी परत आल्यापासून मला फार हुरहूर लागली. मी आबांना सारे सांगितले. पण ते काहीतरी लिहीत होते आणि त्यांनी नुसते हूं हूं म्हटले. आई सुताराच्या लक्ष्मीला जायची तयारी करत होती. कुठे गावाला जायचे असले म्हणजे ती त्या लक्ष्मीला गेल्याखेरीज जात नसे. तिनेही ऐकून न ऐकल्यासारखे केले व जडगोळ्या मनाने मी गप्प बसून राहिलो.

दुपारी शांत असलेल्या गल्लीत एकदम गोमकाला ऐकू आला. मी धावत बाहेर गेलो. आता आबा आईदेखील हातातील काम सोडून बाहेर येऊन पाहू लागली. गळ्यात तुटकी सुतळी घेऊन काळे एका टोकाकडून वेडेवाकडे धावत येत होते. ते आमच्या घराजवळ आले व गिरगिरू लागले. पण त्याच्याकडे पाहाताच आपले काळे ते हेच की काय हे मला समजेना. त्याचे डोळे निर्जीव झाले होते, तोंडातून लाळ गळत होती आणि गळा दाबून धरल्याप्रमाणे ते खरखरीत ओरडत होते. इतक्यात मागून पेरवाएवढा दगड आला, आणि मला न ओळखता काळे पुढे धावले. मागून काळ्यांच्या दवाखान्यातील महादू गडी, गणू शिंपी, नाऱ्या व चारसहा पोरे हातात काठ्या-दगड घेऊन धावत होती.

माझे अंग तर थंड झाल्यासारखे झाले. ही माणसे काळ्याला मारणार म्हणताच माझ्या पोटात खळगा पडला आणि माझे पाय नकळत रस्त्याकडे वळले. नंतर बाळूही आला, आबा बाहेर पडले, आणि आम्ही मागोमाग गेलो.

काळे शेवटी अण्णाबुवाच्या घराची भिंत नि बस्तवाडाचा आडवा कट्टा यांत सापडले व मागे वळून वचवच अंगावर येऊ लागले. गणूने नारळाएवढा एक दगड उचलला आणि दबकन् त्याच्या पांढऱ्या डागाच्या पाठीत घातला. काळे घडी केल्याप्रमाणे दुमडले व ओलसर ओठ आचक्याने मागे घेत घोगरेपणाने ओरडू लागले. मग त्या सगळ्याच माणसांना वेड लागल्याप्रमाणे झाले. त्यांनी एकदम गर्दी केली व पाचसात काठ्यांतच काळ्याचे झटके बंद झाले. जास्त खात्री करण्यासाठी नाऱ्याने ते अगदी निपचित झाल्यावरही दोनचार काठ्या घातल्या. नंतर त्याने कुठूनतरी एक दोरी आणली. ती त्याच्या तंगडीला बांधली व काळ्याला दरदर कचऱ्याच्या कुंडात नेऊन टाकले.

मी भानावर आलो, त्या वेळी मला समजले की आबांनी माझा हात घट्ट धरला आहे आणि ते मला घराकडे ओढत आहेत. अद्यापही काळ्याला या माणसांनी मारले यावर माझा विश्वास बसला नसता. पण समोरच कचऱ्यात काळे पडले होते आणि आता त्यावर माश्या जमू लागल्या होत्या. मी माझा हात हिसकावून घेतला आणि तसाच पळत राधीकडे गेलो. ती आताही गोणपाटावर झोपून होती. मी म्हटले, "राधी, आपल्या काळ्याला मारले लोकांनी."

"मारलं? कुणी?" उठून बसत ती म्हणाली. मग मी तिला सारे सांगितले.

"तू रडू नकोस. डोळे पूस. ते मेलं असलं तर इलाज नाही. रडून काय कधी परत मिळालं आहे?" तिने माझे डोळे पुसत म्हटले. पण तिने लुगडे बदलून आईने दिलेले जुनेरे नेसले, नंतर पदर आडवा खोचून हातात कपडे वाळत घालायची काठी घेतली आणि ती

बाहेर पडली. तिचा चेहरा सकाळपेक्षा जास्त सुकल्यासारखा झाला होता आणि ती आता संतापल्यामुळे तर तो जास्तच भयानक दिसत होता. तिने मला घरी जायला सांगितले. पण मी तिच्या मागूनच गेलो.

ती आली त्या वेळी गणू शिंपी व नाऱ्या अद्यापही कचऱ्याच्या कुंडाजवळच उभे होते नि मधूनमधून काळ्याला डिवचत बोलत होते. राधीने मागून जाऊन नाऱ्याच्या पिंढरीवर काठी हाणताच तो केकाटतच पाय नाचवू लागला, व गणू वीतभर पाय लपकलपक करीत टुण्दिशी कट्ट्यावर चढला.

"मढी ओढली तुमची, बेरडांनो! समजलं की नाही काठी बसली की कसं वाटतंय ते?" ती ओरडली व गणूकडे हातवारे करीत म्हणाली, "ए खेकड्या! उतर की खाली! आता कशाला पळतोस? खाली पाय टाक. तुझ्या पायाला दोरी बांधून टाकते बघ याच कुंडात!"

पण इतके बोलूनही गणू काही खाली यायला तयार नाही. तोपर्यंत ही गर्दी जमली. आबा आले, गणेशवाडीभट आला. गल्लीतील बायकाही दारे उघडून तेथूनच पाहू लागल्या. गणूलाही आता थोडा धीर आला. आपल्या पोराला मारले म्हणून हा दैत्यभट आता काही गप्प बसायचा नाही, याची त्याला खात्री होती. राधीचा तोंडपट्टा अजूनही चालूच होता व काठी आपटत ती नाऱ्याच्या अंगावर धावून जात होती. तो मागे सरून आपल्या टाळक्यात उभा होता व उर्मटपणे तिच्याकडे पाहात होता. गणेशवाडीभट पुढे झाला नि म्हणाला, "राधी, तू जा आता घरी. उगाच वडावडा बोलून काय करणार तू?"

राधी हात नाचवत म्हणाली, "तुम्ही म्हणणारच तसं. तुमच्या पोरानं गुण उधळले आहेत. त्याचा कैवार घ्यायचाच की आता!"

गणेशवाडीभट तुळशीएवढ्या राधीपुढे नारळाच्या झाडासारखा दिसत होता. आता तो हात उगारून फाडकन तिच्या मुस्काटात देणार अशी मला भीती वाटली व माझे अंग आकसल्यासारखे झाले. पण एखाद्या मुलीला समजावावे त्याप्रमाणे तो शांत सौम्य आवाजात म्हणाला, "तसं नाही. उगाच गैरसमज करून घेऊ नकोस. मला आता मुलगा उरला नाही. तू ज्याला मुलगा म्हणतेस तो जर उद्या गटारात मरून पडला तर मी त्याच्या नावानं आंघोळ करणार नाही. पण कुत्रं मेलं हे एका दृष्टीने बरं झालं. त्याला मारणं जरूर होतं."

"का—का म्हणून? ते वेडंविद्रं, काळं होतं म्हणून?" राधी म्हणाली, "मग उद्या तुम्ही मलादेखील काठ्यांनी माराल की! मी आतापर्यंत खूप सहन केलं. मी दगडाचा मार खाल्ला, त्या रेड्यानं घरात डांबर टाकलं, घराला आग लावण्यापर्यंत त्याची मजल गेली. आता मी गप्प बसू? येऊ दे ते खापरतोंडं कार्ट, त्याचे काप करून तळून काढते त्याला! तो निःसंग झाला असेल, पण प्रसंग पडला तर मी शंभर निःसंग आहे."

"ते म्हणे काल एका शेळीला चावलं, दोनचारजणांच्या अंगावर धावून गेलं. तुलादेखील थोडा प्रसाद मिळाला !" तिच्या हातातील काठी घेत गणेशवाडीभट म्हणाला, "ते आता धोक्याचंच झालं होतं. राधी, जा आता घरी."

राधी फार नाखुषीने जायला निघाली, पण मला त्यातल्या त्यात बरे वाटले. नाहीतर आणखी काही कमीजास्त झाले असते, तर नाऱ्याने तिची खोली जाळून टाकायलाही कमी केले नसते. माणसे हळूहळू पांगली. पोरेही घरी गेली. आता कचऱ्याच्या ढिगावर कचरा होऊन काळे मात्र निपचीत पडले होते. गल्लीच्या एका टोकाला असलेल्या पत्र्याच्या खोलीत त्याचे खाणे–राहणे झाले, आणि दुसऱ्या टोकाला आता त्याचे संपणे झाले. एका अरुंद गल्लीएवढे आयुष्य जगून काळे मरून गेले.

आमची गाडी पहाटेला होती. थंडीत कांबळे पांघरून व्यंकू गाडीवाला धमणी घेऊन आला. आबाही आमच्याबरोबर स्टेशनला येणार होते. धमणी राधीच्या घराजवळून जाणार होती. पण ती अद्याप उठली नव्हती, कारण आत दिवा नव्हता. पण मला एकदम काळ्याची आठवण झाली. त्याच्या पाठीवरील पांढरा डाग, बरोबर चालताना पायात घोटाळण्याची त्याची सवय, रोठ दिल्यावर तो तोंडात घेऊन थोडा वेळ उगाचच नाचण्याचा आनंद, हे एकदम मला आठवले. त्याला घेऊन मी एकदा शाळेत गेलो होतो, तेव्हा त्याच्याशी खेळायला पोरांची एकच झुंबड उठली होती. एकेक पेन्सिल तिकीट ठेवूनही मला अकरा पेन्सिली मिळाल्या होत्या. त्याचे वेडेवाकडे ओलसर पळणे, पोटात आग पेटल्याप्रमाणे बेभान पळणे, मरायच्या आधीच मेलेले डोळे, हे सारे मला दिसू लागले, आणि एकदम रडायला येऊ नये म्हणून मला तोंड घट्ट आवळून धरावे लागले. तोपर्यंत गाडी रस्त्याला लागली. पहाटेचे थंड वारे खिडकीतून तोंडावर बडवू लागले आणि आईला जास्त चिकटून बसल्यावर मनात सुटीचे विचार येऊ लागले.

मी सुटीला गेलो खरा; पण कधी एकदा घरी परत येतो असे मला होऊन गेले. मामाच्या घरी पहावे तिकडे टेबलखुर्च्या. कधी कुणी पाटावर, सतरंजीवर आराम बसत नसत. आई मला सकाळी स्वच्छ कपडे द्यायची व पाचपाच मिनिटाला 'मळवलेस तर जेवण मिळणार नाही' असे बजावत राहायची. मी ते कपडे घालून भेंड्याच्या बाहुलीप्रमाणे अंग आखडून ताठ हिंडे. कधी आंबा, चिंच हातात आलीच तर, 'सर्दी होईल ना?' म्हणून हटकून कुणीतरी ती हातातून काढून घेत असे. मामाची मोटार होती. तिच्यातून आम्ही खूप हिंडलो. नदी पाहिली, मोठी बाग बघितली. पण नदीच्या पाण्यात पाय बुचकळायला मिळाले नाही, ओले हिरवे गवत पायाला लागले नाही. आई एवढी ताठ, पण दागिन्यांनी भरलेल्या मामीपुढे उगाचच दबून वागत होती. वसंत तर मला नेहमी हिणवायचा, "तुमच्या घरी फोनोग्राफ आहे? मोठ्या आरशाचं कपाट आहे?" आमच्या घरी असले काही नव्हते. पण आमच्याकडे इतर खूप होते. घरी लालभडक आंबट असे लिंबाचे लोणचे होते, परसात पारिजातक होता, सोप्याला शिवाजीचे मोठे रंगीत चित्र होते, मामाला काही आबांप्रमाणे चिकण मातीची घरे करता येत नव्हती. शिवाय आमच्याकडे राधी होती. तिची आठवण झाली की मला काळे आठवे. पण त्याच्याविषयी मात्र मी येथे कुणालाच काही सांगितले नव्हते. शेवटी एके

दिवशी मामांनी मला कपडे शिवले, आईला पातळ दिले आणि मोटारीतून स्टेशनवर आणून सोडले. सुटी संपली. मी गाडीतून उतरलो आणि आबांना घट्ट चिकटलो.

"अरे थांब थांब! आता भेटायचंच की!" ते हसून म्हणाले, "आधी गाडीतून सामान तरी काढू या."

आम्ही आत आलो. मी येताना कागदात गुंडाळून काळ्या तुळशीचे एक रोप आणले होते. मी ते हळूच आबांना दाखवले. त्यांनी ते उचलून पाहिले तर ते वाळून गेल्यासारखे झाले होते. आबांनी मान हलवीत म्हटले,

"जगणार नाही पोरा हे. मी आणून देईन दुसरं."

मला फार वाईट वाटले. आपल्याला एक तुळस पाहिजे असे राधीने मागे एकदा म्हटले होते. म्हणून इकडे परत यायचे म्हणताच चार दिवस आधी मी ते कागदात गुंडाळून ठेवले होते. गावाहून तिला तुळस आणून देण्याचा आनंद काही मला मिळणार नव्हता. येथे तसली खूप झाडे होती. शांतीच्या परसात तर तसले रान माजले होते. पण 'गावाहून मला काय आणलंस' असे राधीने विचारले, तर काय सांगायचे तिला?'

चहा झाल्यावर मी तसाच निघालो. चहाचा कप खाली ठेवून आबा लगेच उठले नि त्यांनी मला थांबवले. "कुठं निघालास तू?" त्यांनी विचारले.

"राधीकडे." मी म्हटले.

ते एकदम गप्प झाले. त्यांनी माझ्या खांद्यावर हात ठेवला व ते म्हणाले, "तू जाऊ नकोस तिकडे. राधी फार आजारी आहे."

माझे पायच गळाले. मी गावाला जातानाच ती झोपून होती. तिचा गाल सुजला होता.

"मग तर भेटायलाच पाहिजे की!" मी हट्टाने म्हणालो.

"नाही. ती तुला ओळखणार नाही." माझ्याकडे न पाहता आबा म्हणाले.

"ते शक्यच नाही. मी हाक मारताच ती मला ओळखील." मी विश्वासाने सांगितले.

आबा आत गेले. 'राधीकडे जाऊ नकोस' असे आबांनी तरी कधी मला म्हटले नव्हते. त्यामुळे तसेच जाणे माझ्या जिवावर आले. मी गावाहून आलो म्हणताच बाळू आला नि त्याने मला सारी हकीकत सांगितली. कालपासून राधी वेड्यासारखे नाचत कुत्र्याप्रमाणे ओरडू लागली होती आणि लोकांनी तिच्या खोलीला बाहेरून कुलूप घातले होते. गणेशवाडीभटाने खोलीवरचा पत्रा बाजूला करून शिंक्याने काहीतरी खाणे आत सोडले होते; पण ते तसेच होते. तासातासाला ती वचवच ओरडत होती.

माझ्या अंगावर काटा आला व मला काही सुचेना. बाळू गेल्यावर तर मी खुळ्यासारखा बसून होतो. मग आईने दुकानातून रॉकेल आणायला सांगितले तेव्हा मी मुद्दाम उलट रस्त्याने राधीच्या घराजवळून गेलो. घराला खरेच कुलूप होते. समोरच्या कट्ट्यावर चारपाच माणसे - पोरे बसून होती व मधूनमधून विड्या ओढत होती. मी खिडकीजवळून जाताना वर पाहिले, व घाबरून माझ्या हातातील बाटलीच खाली पडून फुटली. खिडकीत राधीचा चेहरा होता. पण त्या खिडकीत तो दिसला म्हणूनच तो राधीचा म्हणायचा.

नेहमी कपाळभर लांब आडवे असणारे कुंकू पुसून गेले होते, चेहरा सुजला होता व डोळे काचेचे असल्याप्रमाणे दिसत होते. "राधी! राधी! मी आलो परत सुटीहून!" न राहवून मी एकदम म्हणालो. तिने माझ्याकडे मान तिरपी करून पाहिले. पण एक नाही की दोन नाही. "परत आल्यावर तू मला ओळखणार नाहीस" असे तिने मला म्हटले होते. पण आता खुद्द तिलाच माझी ओळख लागेना.

कट्ट्यावरची माणसे फिदीफिदी हसली, "राधी! राधी! मी आलो परत सुटीहून!" हे शब्द एकाने ताल धरून गाण्याप्रमाणे म्हटले आणि मग बाकीचे सगळे मिळून त्याचे गाणे करून घोळून घोळून म्हणू लागले. मला एकदम रडू कोसळले व दुकान, रॉकेल, फुटकी बाटली सारे विसरून मी धावत घरी आलो नि माडीवर एका बाजूला जाऊन पडलो.

संध्याकाळी राधीचे ओरडणे वाढले. अगदी धोपेश्वराच्या घरापर्यंत ते कर्कश घोगरेपणाने ऐकू येत होते. तिच्या शेजारच्या ग्रामोपाध्येमास्तरांनी तर कालच आपली मंडळी गावात पाठवून घर बंद केले होते. माणसांची गर्दी वाढू लागली. संध्याकाळी मी त्या गर्दीत सारखा नवस करीत उभा राहिलो. राधीचे ओरडणे ऐकले की अंगाच्या चिंध्या होत आहेत असे वाटे. मी थोडा पुढे गेलो व आबांचा हात घट्ट धरून उभा राहिलो. ते फुटल्या आवाजात म्हणाले, "आता ही टिकेलसं वाटत नाही." मी माणसे मेलेली पाहिली होती. पण मरताना पाहण्याची पहिलीच खेप होती.

—आणि तेही राधीलाच!

"ती आता रात्रभरही टिकणार नाही. तू जा आता घरी. इकडे येऊ नकोस." आबा पुन्हा म्हणाले. त्यांनी माझा हात सोडला नि मला घराकडे ढकलले. पण मी मागेच रेंगाळत राहिलो. आता समोरच्या कट्ट्यावर नाऱ्या आपली टोळी घेऊन बसला होता व मधूनमधून कुत्र्यासारखा ओरडत होता. त्याचा आवाज झाला की खोलीतून राधीचाच आहे हे न ओळखू येणारा, भीषण घोगरा आवाज फुटत होता. नाऱ्याने मग कुठूनतरी तांब्याभर पाणी आणले व खिडकीसमोरच पाण्याची धार धरली. तेव्हा तर ओरडणाऱ्या राधीची हाडे ताणून खोलीभर उधळली असतील असे मला वाटले, व मला साऱ्या अंगाला झटकन मुंग्या आल्या असा भास झाला.

एकदोघांना बाजूला ढकलून आबा पुढे गेले आणि त्यांनी नाऱ्याच्या हातातील तांब्या हिसकावून घेऊन गटारात फेकला. आबा दिसायला अगदी बारीक सोवळ्याच्या काठीसारखे होते, पण त्यांनी ढकलताच नाऱ्या बाजूला कलंडला.

"पुन्हा जर असं काही केलंस, तर वेतानं फोडून काढीन!" ते संतापाने म्हणाले. त्यांचे हात एकसारखे थरथरत होते. आबांना इतके संतापलेले मी कधीच पाहिले नव्हते. तोच माझ्या मागून मला जोराने बाजूला ढकलत गणेशवाडीभट पुढे गेला. आता तरी त्याच्या अंगावर उपरणेही नव्हते व कपाळावरील शीर सापाच्या पिल्लाप्रमाणे ताठ झाली होती. तो आबापेक्षा चांगला हातभर उंच होता. त्याने पुढे जाऊन नाऱ्याचे मानगूट धरले व त्याला जवळजवळ तसेच वर उचलले.

"आब्या! तू पहिल्यापासून अगदी शेंबूडकिडा आहेस बघ!" तो चिडून म्हणाला, "म्हणे वेतानं फोडतो! असल्या वेळी बोलायचं नसतं, करायचं असतं. माझ्याकडे बघ आता." त्याने बोटे रुंद केली व आपला तुळईसारखा जाड काळा हात फिरवत नाऱ्याच्या थोबाडीत एक ठेवून दिली. वाळूच्या पोत्यासारखे ते कार्टे, पण चक्क आडवे पडले व त्याचे दोनतीन दात चुरमुऱ्यासारखे बाहेर पडले. आबांनीच जर आवरले नसते तर गणेशवाडीभटाने आपला पोह्याच्या लाटेसारखा पाय नाऱ्याच्या छातीवर घातला असता.

"असं शिकवायचं असतं!" तो आबांना म्हणाला. तो कट्ट्यावर चढला व एकेका पोराचे मानगूट पकडून त्याने त्या सगळ्यांना खाली ढकलून दिले. "आता इथं दिसलात हरामखोरांनो, तर याच्यासारखे होईल!" नाऱ्याकडे बोट दाखवत तो ओरडला. नाऱ्या व त्याची पोरे गपगार नाहीशी झाली. गणेशवाडीभट भिंतीला टेकून उकिडवा बसला, पण त्याची नजर माझ्याकडे गेली.

"चल रे, तूही चालता हो! जा घरी जाऊन पड!" तो गरजला.

मी घरी परतलो त्या वेळी आई दारातच होती. तिने माझ्या पाठीवर आटवलासारखा मऊ हात फिरवला व काही न बोलता ती आत गेली. आज तिने काही स्वैपाक केला नव्हता. येताना काय आणले होते, तेच तिने माझ्यापुढे ठेवले. पण माझी भूकच मेली होती. कानात सारखे राधीचे ओरडणे ऐकू येत होते, तिचा कुंकू नसलेला भकास चेहरा दिसत होता. तिने मला ओळखलेही नाही, हेच सारखे मनात डाचत होते.

रात्री अंथरुणावर पडलो, तेव्हा आबा घरी आले. त्यांनी आईला काहीतरी सांगितले व एक जुना पंचा बरोबर घेतला. ते मला म्हणाले, "राधी मेली रे. सुटली बिचारी. आता त्या यातना काही मला बघवत नव्हत्या."

ते बाहेर जाताना आई दारापर्यंत गेली. नंतर तिने चुलवणात लाकडे घातली व पाणी तापायला ठेवले. मग ती अंथरुणावर पडली व भिंतीकडे वळली.

मला माझे अंग निर्जीव झाल्यासारखे वाटत होते. मला सारखे काही ना काही आठवू लागले व डोळ्यांतील पाणी थांबेना. राधीच्या खांद्यावर चढून मी रायआवळे काढले, तिच्याकडून किती वेळा तरी गाय–वाघाचे गाणे ऐकले, काळवंडलेल्या पातेल्यातील गुळाचा चहा....फाटून गेलेले लुगडे....'तुझ्या आईचं तुझ्यावर फार प्रेम आहे, नाही?...तुझी आई देवी आहे...माझी ओळख विसरू नका हं!...मारलं? कुणी मारलं?..."

माझे डोके तर गच्च आवळल्यासारखे झाले. आईने माझा हुंदका ऐकला असावा. ती जवळ सरकली व तिने आपला हात माझ्या अंगावर टाकला.

मी दचकून जागा झालो. आई मला हलवून उठवत होती. "चल, राधीला नेत आहेत." ती म्हणाली. आई अशा इतर वेळी मला कधी बाहेर यायला देत नसे. पण आज मात्र तिने मला मुद्दाम उठवले. मी तिच्याबरोबर जाऊन दारात उभा राहिलो. दोनचार कंदील घेऊन माणसे जात होती. आबांनीही खांदा दिला होता. आमच्या

घरावरून जाताना न पाहता, न हसता जायची राधीची ही पहिलीच खेप. आणि आता यापुढे तर ती या रस्त्याने जाणारही नव्हती. कधीच जाणार नव्हती.

मी परत अंथरुणावर येऊन पडलो. आबांनी राधी मेल्याचे सांगितल्यापासून मला राधीची आठवण येताच सारखी सुताराच्या लक्ष्मीची आकृती डोळ्यांसमोर दिसू लागली होती. ती लक्ष्मीची मूर्ती लाकडाची असून ओबडधोबड होती. ती उंच, उग्र होती व ती लालभडक रंगाने रंगवलेली होती. तिचे चिकटवलेले केस खरबरीत वाटत आणि तिच्याही कपाळावर कुंकवाचा आडवा पट्टा असे. तिला सहा हात होते. त्यांत तलवार, धान्याचे कणीस, फूल या वस्तू होत्या. एका हाताच्या तळव्यावर चांदीचे नाणे खिळा ठोकून बसवलेले होते. एका हातात पितळी तामले होते व सुतार दर शुक्रवारी त्यात चार थेंब दूध टाकी. उरलेला हात रिकामा होता,पण तो आशीर्वादासाठी वर उचललेला होता.

मला वाटले, राधीनेदेखील असेच सगळे मला सहा हातांनी दिले. तिच्या ज्या ज्या आठवणी मला येत, त्या त्या साऱ्या तिने मला दिलेल्या, केलेल्या गोष्टींच्याच होत्या. मी मात्र तिला काहीसुद्धा दिले नाही. मी तुळशीचे झाड आणले, वाळून गेले. पण मी ते तिच्यासाठी आणले होते हे देखील तिला कळले नाही. मी तिला कधी काही विचारून घेतले नाही. ती पूर्वी कुठे होती, तिची आई कशी होती, तिच्या लहानपणी काय काय घडले, याबद्दल मी कधी आपुलकीने चौकशी केली नाही. तिनेही काही आपण होऊन मागितले नाही, सांगितले नाही. आणि आता तर ती निघूनच गेली होती. हा माझा अप्पलपोटेपणा आठवून मला माझे सारे अंग पोकळ होत आहे असे सारखे वाटत होते. खरेच माझे चुकले. तिला विड्याचे पान पाहिजे होते, ते तरी त्या दिवशी घरातून नेऊन दिले असते, तरी मला आता थोडे बरे वाटले असते. तेवढेच समाधान माझ्याजवळ राहिले असते.

आबा आले, त्या वेळी उजाडले होते. त्यांचा चेहरा अगदी दमून गेला होता. व तो इतका हताश झालेला मी पूर्वी कधी पाहिला नव्हता. त्यांनी कट्ट्यावरच सदरा काढून ठेवला व पंचाचे मुटकुळे बाजूला ठेवले. आई जागीच होती व तिने चुलवणावर पाणी तापवून ठेवले होते. तिने आबांवर दोनचार तांबे पाणी ओतले व आबा शुद्ध झाले. गणेशवाडीभटही आबांबरोबर होता. त्यानेही दोन तांबे पाणी घेतले व पिळून टाकलेल्या पंचानेच अंग टिपले. जाताना तो आबांजवळ थांबला व म्हणाला, "आबा, जा आता थोडा वेळ पड. नाहीतर तू अंथरूण धरशील उद्या. आता झाल्या गोष्टी मनाला लावून घेत बसू नकोस. अरे हे चालायचंच. तू काही कमी केलं नाहीस तिच्यासाठी. इतके दिवस खोटंदेखील बोलत आलास!"

आबा एकदम चपापले व त्यांनी अविश्वासाने गणेशवाडीभटाकडे पाहिले. पण नंतर मात्र त्यांची मान खाली गेली.

"त्यात शरमायची काही जरुरी नाही, मला माहीत होतं सारं. मी दोन–अडीच वर्षांमागे तिकडं एकदा गेलो होतो. आणि तू केलंस तेच मीही केलं असतं. पण

केल्यानंतर असा खून केल्यासारखा मात्र चेहरा केला नसता. पण तू लेका, पहिल्यापासूनच शेपूटसिंहच म्हणा. झाले ते झाले! काही गोष्टी पुष्कळदा अशा घडतात, की त्या गप्प गिळून बसावं लागतं. तुला माहीत आहे? मी एका खेड्यात राहत होतो त्या वेळी बहिणीला दिवाळीला आणायला मी चौदा मैल चालत गेलो. येताना गाडी केली, बहिणीला हौसेनं आणलं. तेव्हा माघारी बाहेरून कडी लावून कुणीतरी आमचं घरच जाळून टाकलं होतं. बहीण आली दिवाळीला, आणि तिला पाहायला मिळाली दादा-आईची जळालेली प्रेतं! हे असं चालायचंच!'' गणेशवाडीभटाने जाताजाता आबांच्या पाठीवर थाप मारली. तिच्या दणक्याने आबा वाकलेच.

आता थंडी होती म्हणून आबांनी सदरा घातला व विड्यांचा जुडगा घेऊन कुणाशी न बोलता ते माडीवर चालले.

''अर्धा कप चहा करून देऊ का?'' आईने विचारले. पण आबांनी चहा नको म्हटलेले पाहून तर मला फार आश्चर्य वाटले. चहाला ते कधी नको म्हणत नसत, पण आईदेखील नेहमी प्रथम चहा करूनच त्यांना विचारत असे. पण आज चूल थंड होती. पण आबांनीही नको म्हटले होते. आबा वर जाताच मीही त्यांच्याबरोबर गेलो. मला खूप बोलायचे, विचारायचे होते. पण आबा गुडघे उंचावून भिंतीला टेकून बसले व त्यांनी विड्या ओढायला सुरुवात केली. एक झाली, दोन झाल्या, चार झाल्या, पण त्यांनी एक शब्दही काढला नाही. मग मात्र मला राहवेना. मी त्यांच्याजवळ सरकलो व म्हणालो, ''मरताना राधी कशी दिसत होती, नाही आबा? मला तर प्रथम ती ओळखलीच नाही.''

त्यांनी एक दीर्घ निःश्वास सोडला व ते म्हणाले, ''म्हणजे आता उरलंसुरलंदेखील संपून गेलं म्हणायचं. परमेश्वराची इच्छा. झालं! हे सगळं पुढं असं होणार हे माहीत असतं तर गोपाळाला मी माझ्याबरोबर चल असं म्हटलंच नसतं.''

''पण त्याला आता हॉस्पिटलमध्ये कसं कळवायचं सारं?''

आबांनी चमकून पाहिले व नुकतीच पेटवलेली विडी तशीच कोपऱ्यात टाकून दिली. ''कुणाला कळवायचं, आणि कसलं काय घेऊन बसलास!'' ते हताशपणे म्हणाले, ''तिला आहे कोण कळवायला?''

''पण आबा, तुम्हीच म्हणत होता ना, की गोपाळभटाला खूळ लागलंय म्हणून त्याला हॉस्पिटलमध्ये ठेवलंय म्हणून?'' मी आश्चर्याने विचारले. आबा उठले व मागे हात बांधून उगाच येरझाऱ्या घालू लागले.

'होय रे. ते बारा-तेरा वर्षांपूर्वी. मी, गणेशवाडीभट, धोपेश्वरमास्तर या सगळ्यांनी मिळून त्याला तिथं ठेवलं. नंतर काय झालं, माहीत आहे? तो तीन वर्षांपूर्वी मेला. मला दोन दिवस जेवण गेलं नाही. मी शब्द टाकताच भाबडा गोपाळ आपला सारा संसार दोन गाठोड्यांत घेऊन माझ्याबरोबर आला. कुठं जायचं, काय करायचं, याबद्दल एक शब्द त्यानं विचारला नाही. रक्ताचा नव्हे, गोताचा नव्हे. पण तुला कल्पना येणार नाही,माझ्यासाठी तो गुरासारखा राबला! पाठचा भाऊ इतकं करणार नाही! तो मेला हे मी इथं सांगितलं

असतं तर राधीचं काय हाल झाले असते, माहीत आहे तुला? तिला कुत्र्यांनी जवळ केलं नसतं!"

हे सारे ऐकून तर मी गप्पच झालो. तिचा नवरा मरून इतके दिवस झाले, पण आबांनी राधीला ती गोष्ट सांगू नये हे मला फार विलक्षण वाटले. "पण आबा, हे खोटं सांगितल्यासारखं नाही का?" न राहवून मी एकदम म्हणालो.

आबा एकदम थांबले व किंचित खाली वाकून माझ्याकडे उग्रपणे पाहू लागले. ते थोडे चिडून गणेशवाडीभटासारखा आवाज चढवत म्हणाले, "बेट्या! भुईतून अजून वर आला नाहीस, तुला अजून लंगोटीदेखील अडकली नाही, आणि मला खरंखोट्याचा उपदेश करतोस? आणखी पन्नाससाठ वर्षं जगून झाल्यावर असल्या गप्पा मार! मी त्या वेळी इथं तुझ्यासमोर नसणार. माझ्या हाडांचं सत होऊन गेलं असणार त्या वेळी. त्या वेळी जगून, म्हातारा होऊन, स्वत:शीच विचार करून बघ कधीतरी, खोटं बोलल्याखेरीज तुला जगता आलं असतं का ते! मोठ्या गप्पा मारतोस आता जीभ लांब करून! मी त्या वेळी नसलो म्हणून काय झालं! तू आठवण करून तुझ्या मनालाच सांग म्हणजे झालं!"

आबांच्या आवेशाने तर मी भेदरूनच गेलो व त्यांच्याकडे पाहातच राहिलो. पण त्यांना तसे कधी पूर्वी पाहिले नव्हते.

कधी नाही ते आबांचे डोळे पाण्याने भरले होते!

एकोणीस

# मरण स्वस्त होत आहे

## बाबूराव बागूल

मी आणि माझा कविमित्र घरात होतो. तो अंथरुणावर उताणा पडला अन् खिशातील कागद हातात घेऊन म्हणाला, "मघाशी जेवताना मी लिहिलेला मजकूर आता काव्यात बसवतो. तोवर तू तुझी कथा पुढे ओढ..." मी कथा पुढं ओढू लागलो. पण कथा जागची हालत नव्हती. मी कागद फाडून टाकले. तसा माझा मित्र म्हणाला, "माझी ही कविता बरोबर आकार घेत नाही. साला कच्चाच मजकूर तुला वाचून दाखवितो—

"ही मुंबई आहे....

...या मुंबईला स्वातंत्र्याचं स्वप्न सर्वांआधी पडलं आहे. अन् स्वातंत्र्याचं साक्षात दर्शनही सर्वांआधी घडलं आहे...

...यंत्रयुगाचा जन्म याच मुंबईत झाला. अन् यंत्रयुगाचा प्रकाश याच मुंबईच्या रस्त्यानं बसून दाही दिशांत दौडत गेला...हे शहर अति भव्य आहे. दिव्य आहे. अन् ते एक महाकाव्यही आहे. हे मुंबईचे रस्ते म्हणजे त्या महाकाव्याचे सर्ग आहेत.

...स्वातंत्र्याचं गंगावतरण या मुंबईत झालं. अन् स्वातंत्र्याचं गंगाजल याच मुंबईच्या रस्त्यानं गावोगाव वाहत गेलं...कारण हे रस्ते शाहिरांच्या रक्तानं न्हालेले आहेत. शूरांच्या पराक्रमी प्राणांनी पुनीत झालेले आहेत. अन् हे शहर शंकराप्रमाणे रुद्रभयंकर आहे...."

कशी वाटली? या हिऱ्यांना मी कवितेच्या कोंदणात पैलू पाडून बसवतो. अन् मराठी कवितेतला एक मौलिक दागिना देतो."

मी टेबलावर पाय पसरीत म्हणालो, "दे!" आणि मी लिहीत असलेल्या कथेचे कागद घेऊन कथेचे शीर्षक लिहिले, "मरण मुंबईत स्वस्त होत आहे."

"काय लिहिलंस?"

"मरण मुंबईत स्वस्त होत आहे."

"छान. आता कथा जमेल." अन् तो त्याची कविता जमवू लागला. पण त्याला कविता जमत नव्हती. लिहिलेली प्रत्येक ओळ तो खोडीत होता. दुसरी लिहीत होता. कागद भरल्यावर कागद फाडून टाकीत होता. अन् मलाही वैताग आला होता. मीही कागद खराब करून कंटाळलो आणि वैतागून म्हणालो, "चला फिरून येऊ."

"साली माझीही कविता कोंदणात बसत नाही. बळ लावून ढकलली तरी आत शिरत नाही. शालनसारखी हट्टी आणि नकटी आहे; चलो..."

आम्ही दोघे वस्तीत बाहेर आलो. मुख्य रस्त्याला लागलो. रस्त्याच्या रेल्वेच्या बाजूला एकाखाली एक अशी पुष्कळ पाले होती. दुसऱ्या बाजूला दुकाने, एक बँक, अन् शाळा होती. पालांच्या बाजूने मला हाक आली, "मास्तर..."

मी तिकडे पाहिले. भिमू कदम तोल सावरीत माझ्याजवळ येऊन म्हणाला, "ब्रॅन्डीसारखी आहे. घेता का? मी घेत होतो. घेताना तुम्ही दिसला म्हणून हाक मारली. चला."

"जेवलोय, आता नको. बाईनं आणली की तुम्ही?"

"ती साली कालपासून पुन्हा बेपत्ता झाली. आता लवकर येईलसं वाटत नाही. फार मारली व्हती. सारखी बाजूच्या मद्रासनीचा संशय घेत व्हती. मागं त्या केरवा मनीवालीचा, त्याच्या आधी त्या आता सडून मरू लागलेल्या पोरीचा संशय घेत व्हती. मास्तर, सालं त्या पोरीचं वय आता सोळा-सतरा असंल. पण आतून-बाहेरून सडली. रगातपिती झाल्यासारखी दिसते...तरी कंबार लचकावीत चालते. ...बरी सडली. फार लवकर चालू झाली. आये पण तशीच. तरणी पोर टाकून एका खाटकाबरोबर पळून गेली. अन् खरं सांगू मास्तर, मना बाई आवडत नाही. आसतं काय तिथं,—हाडं अन् कातडं...

"मी नाही असाच मागं खून केला, अन् आयुष्याचा असा सत्यानाश केला. तवापासून मला बाईचा अन् बाटलीचा कंटाळा येतो, राग येतो. पैसा हातात असला म्हंजी मी बाटलीकडे जातो. नाहीतर हाये आपली पुडी–गांजाची. अन् ती भांडायला लागली, रडून पाया पडायला लागली, सोंशय घ्यायला लागली म्हंजे तिच्याजवळ जातो. कंटाळा येतो. जातो. ते बघा. ते भूत तुमच्याकडं टक लावून बघतं हाये. जातो. साला कोणीतरी येईल. पिऊन जाईल."

तो उरलेली दारू प्यायला त्याच्या पालात शिरला. अन् आम्ही आमच्याकडे पाहणाऱ्या त्या पोरीकडे पाहू लागलो. ती जुन्या पुराण्या पोत्याने बनविलेल्या तिच्या पालापाशी उभी होती. तिचे डोळे, तोंड सुजलेले होते. अन् तोंडावर काळे डाग अन् तांबूस चट्टे दिसत होते. अंगावर धड पातळ नव्हते. अन् तिच्या पोटात अन्न होते की नाही हे कळत नव्हते. पण ती फार थकलेली, गळून गेल्यासारखी दिसत होती.

"वयाच्या केवळ सतराव्या वर्षी जीवनाने त्या गरिबाला काय भयंकर शिक्षा दिली. केवळ आई पळून गेली म्हणून पोट भराया ती धंद्याला लागली. साली ही एक जन्मठेप आहे. पण दिली कोणी? का दिली? गुन्हा काय?....चल..."

आम्ही रस्त्याने चालू लागलो. पालाकडे पाहू लागलो. प्रत्येक पाल रेल्वे फेन्सिंगचा आधार घेऊन उभे केलेले होते. रेल्वे फेन्सिंगच्या बाजूने चारपाच फूट उंच होते. अन् रस्त्याच्या बाजूने रस्त्याला मिळालेले होते. चारी बाजूंनी केलेले कंतान, पोते उडून जाऊ नये म्हणून त्यावर दगड ठेवलेले होते. त्या पालाकडे आणि विशेषतः दारू पीत बसलेल्या भिमूकडे बघत माझा मित्र म्हणाला,

"तो फार निराश दिसतोय. मरणोत्सुक दिसतोय. त्याची तुला काही माहिती आहे?"

"आहे. त्याचे नाव भिमू कदम. तो सातारकडचा. मराठा क्षत्रिय घराण्यातला. त्याच्या कुठल्यातरी पूर्वजाने परंपरेने प्राप्त झालेल्या धनदौलतीचा धुराळा केला. त्याच्या नंतर नावारूपाला आलेला फक्त भिमू हा एकुलता एक माणूस होता. पण त्याने खून केला."

"कोणाचा?"

"बायकोचा."

"का?"

"सांगतो. त्या वेळी तो पहिलवान होता. त्याच्या नावाचा अगाजा गावोगाव पसरत होता. त्याला पाहून उभा गाव थरकत होता. अन् गावोगावचा लहानथोर त्याला मान देत होता. असा तो काळोखात पडलेले कूळ वर काढीत होता. नाव कमावीत होता. अन् नाव कमाविण्यासाठी शरीर. कीर्ती वाढविण्यासाठी बायकोचे नाव घेत नव्हता. अन् तो पुढे येतो आहे म्हणून त्याला खाली करण्यासाठी त्याचा त्याच गावातील पिढ्यान् पिढ्यांचा शत्रू त्याच्या बायकोवर जाळं टाकीत होता. सहवासासाठी उतावीळ झालेली ती बाई काही महिन्यांतच त्याच्या जाळ्यात घावली. अन् आंधळ्यासारखी तो सांगेल तशी वागू लागली. तशी आवईची आग गावात धुमसू लागली. त्यालाही चटके देऊ लागली.

"एक दिवस संध्याकाळी आखाड्यात न जाता घरात घुसलेल्या त्याच्या शत्रूला अन् बायकोला ती नागवी एकत्र असताना कुऱ्हाडीनं खांडोळी करून मारलं. अन् सरळ पोलिस ठाण्यावर जाऊन त्यानं खरी हकीकत सांगितली.

"जेलमधून सुटल्यावर तो जगण्याबद्दल, मरण्याबाबत येवढा उदासीन झाला होता की त्याला गावी जावंसं वाटलं नाही. नोकरीधंदा करावासा वाटला नाही. वाटेल ते काम करीत होता–पोटापुरते खाऊन उरलेले पैसे दारूत उधळीत मिळेल तिथे झोपत होता. पोलिसांनी नेलं तर खुशाल आठ दिवस कस्टडी भोगून येत होता. असं रस्त्यावरल्या कचऱ्यासारखं वाऱ्यावर उधळत त्यानं पाच वर्ष घालविली, अन् वांद्र्याच्या खाडीकडेच्या झोपडपट्टीत त्याला ही बाई सापडली. ती आहे कच्छकडची झाडूवाली. बघशील तर चाट होशील. अंगाने भरलेली. रंगाने गोरी, डोळ्यांत काजळ घालणारी. अन् दोनचार बिल्डिंगमधील कुटुंबांचे संडास धुणारी. त्या कुटुंबांतील काहींना हातभट्टीच्या बाटल्या पुरविणारी. मोठी नखरेल, अन् जहांबाज. पाच वर्षांनंतर भिमूला बायकोची गरज वाटू लागली. म्हणून तो तिच्यासंगती राहू लागला. तिलाही तो येवढा आवडू लागला की ती त्याला कमवून खाऊपिऊ घालू लागली. त्याला येणारे निराशेचे जबरदस्त झटके सहन करू लागली. मार खाऊ लागली. वांद्र्याला असताना एका मित्राने देऊ केली म्हणून कत्तलखान्यातील मेंढरं, बकरी कापण्याचा नोकरी त्यानं स्वीकारली. तो निराशेनं एवढा बदलून गेला होता की तो खुशाल बकरी, मेंढरं कापू लागला. काही दिवसांत भराभर कातडी कुशलतेने उसवू लागला. एकदा मेंढरांच्या गळ्यावर सुरी फिरवीत असताना

मरत्या मेंढराची नजर त्यानं बायकोवर घाव घातले त्या वेळी झाली होती तशी त्याला दिसू लागली. तिची धडपड त्याला त्या मेंढरात दिसू लागली. अन् कोर्टात त्याने दिलेली जबानी तरवारीसारखी लखलखीत होऊन त्याच्या डोळ्यांपुढे तळपू लागली...'साहेब, माझं कूळ गेल्या कैक पिढ्या अंधारात खितपत पडलं होतं. मी वर काढीत होतो. नाव कमावीत होतो. अन् ती माझी बायको जरा थांबली असती, कळ काढली असती तर मेली नसती. पण ती माझ्या नावावर, तपावर कुऱ्हाडी घालू लागली. मला माणसातून उठवू लागली. म्हणून उठलो; अन् तिच्यावर-तिच्या–बापावर कुऱ्हाड घातली! आता जगण्याची हौस संपली. फाशी द्या..."

"असं म्हणाला? वा, वा. सुंदर. पुढं काय झालं?"

"ही आठवण त्याला झाली. तशी त्यानं सुडानं वेडं होऊन त्या रक्ताच्या थारोळ्यात तडफडणाऱ्या मेंढरावर भराभरा घाव घालायला सुरुवात केली. त्याचा तो खुनी आवेश पाहून बाकीची खाटीक मंडळी धावली. त्यांनी त्याच्या हातातून सुरी काढून घेतली; अन् त्याला शांत केलं. त्याची नोकरी गेली अन् खराब केलेले मटन अन् त्यामुळं झालेलं नुकसान मालकानं भरून घेतलं. मग त्याला निराशेचे एवढे जबर झटके येऊ लागले की तो अन्न खाईना. झोपेना. सारखा एके ठिकाणी बसून राहत होता, अन् गांजा ओढीत होता. ती कच्छकडची बाई काम करी. त्याला दारू देई. माणसांत आणू पाही. पण कोसळत्या पावसानं त्याला आलेली ग्लानी काही कमी होईना. प्रत्येक पावसाळ्यात त्याला असे जबरदस्त झटके येत. तो वेड्यासारखा सुन्नबहिरा होई, नाही तर उत्पात करी. त्याच वेळी वांद्र्याच्या खाडीकाठचं त्याचं झोपडं वाहून गेलं. त्यानं दुसरीकडे वाचलेलं सामान घेऊन नवं बांधलं. म्युन्सिपालटीनं ते मोडलं. त्यातून सामान वाचलं ते घेऊन तो इथं आला. हे मोडल्यावर तो कदाचित दुसरं बांधील. किंवा बांधणारही नाही. एखादे वेळी गांजा ओढावी, दारू प्यावी तसा गाडीखाली सहज जीव देईल."

"अन् त्याची बायको–म्हणजे ती झाडूवाली दुसरा नवरा करील!" कविमित्र म्हणाला.

"आताच करते. आठ दिवस बाहेर राहून येते. तो तिला काही म्हणत नाही. कोडगा आहे, भाडखाऊ आहे म्हणून नाही, तर तो एखाद्या साधूसारखा उदास आहे. जपणं जगणं त्याच्या ठायी एक झालेलं आहे. मन मेलेलं आहे किंवा यापेक्षाही त्याचं दुखणं वेगळेही असेल..."

"काय भयानक कॅरेक्टर आहे. यावरच तू कथा लिही. 'मरण मातीमोल आहे' हे नाव दे."

इतक्यात गाडी धडधडत गेली. आमची दोघांचीही नजर तिकडे गेली. गाडीच्या उजेडात चारपाच बायका रेल्वेच्या बाजूला आमच्याकडे पाठी करून अन् बाजूला टमरेल ठेवून बसल्या होत्या. आम्ही शरमून नजरा खाली केल्या. अन् खाली मान घालून कविमित्र म्हणाला, "ते कुणाचं झोपडं?"

"ते राणू नागवेकराचं. तो क्षयी आहे. त्याला चार मुले आहेत. बायको इथल्या काही बंगल्यांत घरकाम करते....तो बुटपॉलिश करतो. परंतु बुटपॉलिश करणारी लहान मुलं त्याला धंदा करू देत नाहीत. अन् तो काम करताना खोकू लागला तर क्षयजंतूंपासून वाचण्यासाठी गिऱ्हाईक नाकाला रुमाल लावून उठतं. चालू लागतं. कोणी अर्धवट कामाचे पैसे देतात, कोणी देत नाहीत. त्यामुळेच या झोपडपट्टीची आणि माझी ओळख झाली. घरात मन लागेना म्हणून बागेत येऊन लिहीत बसलो होतो. तोच बोंबाबोंब झाली. एका तडफडणाऱ्या माणसाकडे लगबगीने माणसं जात असल्याचे पाहून मीही तिकडे धाव घेतली. बघतो तर हा राणू नागवेकर छाती दाबून वेदनेनें तडफडत होता. घामानं भरला होता. मी चौकशी केली, तेव्हा कळलं की त्याची बायको आजारी आहे. चार मुलं आहेत. त्याला क्षय आहे. काही तरी पैसे कमाविण्यासाठी तो दिसेल त्या माणसाचे बूट पकडी. खाली टाकलेली चप्पल उचलून पॉलिश करू लागे. असाच त्या माणसाचा बुटाचा पाय त्यानं धरला अन् तो बूट सोडवू लागला. तसा पाय सोडवून घेण्यासाठी त्या माणसाने पाय जोरानं झाडला. त्याची लाथ राणूच्या छातीत बसली. इकडं राणू तडफडत होता. एक उडाणटप्पू दिसणारा कडक कपड्यांतील तरुण त्याची छाती चोळीत होता. दुसरा एक मध्यमवर्गीय म्हातारा त्याच्याजवळ बसून उपरण्याने वारे घालीत होता. आणि पुष्कळ माणसांनी त्या लाथा झाडणाऱ्या तरुण गाढवाला गराडा घातला होता. कोणी म्हणत होतं त्याला पोलीस स्टेशनावर न्या. डॉक्टरला बोलवा. त्याला सोडू नका. मारा. एकदोघांनी तर त्याला मारण्याचं ठरविलं. काही लोक मध्ये पडले. तो तरुण प्रत्येकाला ओरडून सांगत होता, 'त्याला काही लागलं नाही. त्याचं ढोंग आहे. तो पैसे घेण्यासाठी तसं करतो आहे.'

आणि इकडे राणूचं तडफडणं वाढत होतं. त्याच्या तोंडातून लाल थुंकी येत होती. ती गर्दीनं पाहिली. तशी सबंध गर्दी तरुणावर उलटली, अन् त्यानं घाबरून एक दहाची नोट राणूला दिली. अन् मोठ्या मिनतवारीने सुटका करून घेतली.

नंतर मी त्याला सहानुभूतीनं बागेत भेटला असताना विचारलं तेव्हा त्यानं सांगितलं की तो जेव्हा म्हणाला, 'तो पैसे घेण्यासाठी करतो आहे.' त्यावेळी त्याचेच शब्द पकडून त्याला फसवण्याचं मी ठरविलं. मी नंतर खरोखरच खोटेपणानं पाय झाडू लागलो. पैसे मिळाले अन् त्यातून माझ्या बायकोचं दुखणं पुरं केलं. आठ दिवस पोरांना भात मिळाला. दररोज कोणी तरी लाथ झाडावी म्हणून मी प्रत्येकाचे पाय गपकन् धरतो. पण कोणी लाथ झाडीत नाही. दहा पाच रुपये देत नाही. अन् मला चांभाराची पोरं पॉलिश करू देत नाहीत. गिऱ्हाईक सापडू देत नाहीत. कावळ्यानं किडा उचलावा तसं ते गिऱ्हाईक उचलतात. मला फसवतात. चिडवतात, रडवतात, मी त्या छोट्या सैतानांचा खेळ झालेय. म्हातारं जनावर पाहून कावळ्यानं टोचा मारून तोडावं तसं ते मला करतात. जीव नकोसा करतात.

"हा राणू पातळं छापणाऱ्या दुकानात प्रिंटर होता. अन् अपुऱ्या पगारात कसा तरी संसाराचा गाडा ओढीत होता. त्याची आई मेली अन् त्याच्यावरच्या आधीच्या कर्जात कर्जाचा डोंगर रचून गेली. तो कर्ज फेडता फेडता क्षयी झाला. काम होईना म्हणून मालकाने काढून टाकला. अन् दुसरा मालक त्याला नोकरीवर घेईना. खायला मिळावं म्हणून पागडी घेऊन खोली काढली. झोपड्यात आला. झोपडपट्टी हातभट्टीवाल्यांमुळे जळाली म्हणून तो पुढं अन् झोपडं मोडणारे मागे असं करीत इथे आला. मी त्याला एकदा विचारलं होतं – "पावसाळ्यात कुठे राहणार?" "पावसाळ्यात पैसे जमले तर इथं नाहीतर रेल्वे फलाटाला. नाहीतर नव्या बांधकाम चाललेल्या इमारतीच्या आडोशाला. आम्ही काय फेकून दिलेली माणसं, कुत्र्यामांजरासारखं रहायचं. कुठंही जगायचं. . . "

हे ऐकून कविमित्र म्हणाला "ही सारी मारलेल्या मनाची माणसं आहेत. त्यांचं दु:खच एवढं जगड्व्याळ आहे की त्यांना दुसरा विचारच सुचत नाही. . .यांना कोणी जाणीव दिली तर. . . ?"

"तर हे रोम जाळतील!"

"चल ! तो काका बोलावतो आहे." आम्ही दोघे काही पाले मागे टाकून चालू लागलो.

"आईये जनाब." आम्ही चाचाजवळ उभे राहिलो. माझा कविमित्र आश्चर्याने चाचाकडे पाहात उभा राहिला. काकाचे रंगरूप खानदानी नबाबाचे वाटावे असे होते. कवीने विचारले, "आप नबाब खानदानके है ?

"कैसे ?"

"आपलं नाक येवढं तरतरीत मोठं कसं? माझे जेवढे खानदानी मुसलमान मित्र आहेत त्या सर्वांचं नाक असंच उंच आहे."

"हे डोक्याला काय लागलंय ? तोंड, डोकं का सुजलंय? मी चाच्याला विचारले.

"मी बदनशिबी आहे. काल रात्री इकडे रेल्वेत तट्टीला गेलो. रुळाला पाय अडकून पडलो. रुळावर किती वेळ बेशुद्ध होतो माहीत नाही. पुष्कळ खून गेला. आमचा हा तीनपत्रेवाला रामूभय्या तट्टीला आला. खिसा पाकीट पहावं म्हणून जवळ आला. अन् मग ओळखताच इकडं घेऊन आला.

"आता कसं आहे?"

"हे काय?" त्याने आपले बँडेज बांधलेले पाय दाखवले.

"जलाल कुठं आहे?"

"गेलाय् पाणी आणायला स्टेशनवर."

"बरं. उद्या येईल." चाचा नेहमी पैसे मागतो म्हणून मी आवरते घेतले.

"आठ एक आणे आहेत का? आज मार्केटला जाता आलं नाही."

मी आठ आणे दिले, अन् आम्ही पुढे झालो.

"याचा परिचय?"

"झोपडी संघाच्या लोकांमुळे याच्याशी माझा परिचय झाला. हा चाचा हैद्राबाद संस्थानात एकेकाळी शिक्षक होता. त्याला उर्दू अन् फारसी येते. इंग्रजी अर्ज लिहिण्यापुरती येते. मुलं मुंबईला आहेत म्हणून हा बायको वारल्यावर खेतीवाडी खंडानं देऊन मुंबईला आला. त्याची तिन्ही मुलं बिघडलेली होती. एकजण अजिबात कामातून गेला होता. तो कोणा नाचणाऱ्या गाणाऱ्या धंदेवाल्या बाईकडे पडून होता. पैसा होता तोवर प्रिया होती. पुढं तो तिचा चाकर झाला. दुसरा व्यसनाधीन होता. अन् तिसऱ्याचा दोन बायकांचा न पोसता येणारा प्रचंड पोरवडा होता. पहिली गेली अन् दुसरी गेली ती बाळंत होताना मेली. अन् पोरं संभाळण्याची जबाबदारी म्हाताऱ्यावर आली. काही महिन्यांनी मुलांचा बाप प्रचंड पोरवडा म्हाताऱ्यावर टाकून फरारी झाला. अन् म्हातारा त्या छोट्या राक्षसांना खाऊ घालण्यासाठी खोली विकून रस्त्यावर आला. अन् कळती पोरं हॉटेलात, कुठं श्रीमंत माणसाकडे खाण्यावारी चिकटवू लागला. तरी दोन बाकी राहिले. भेंडीबाजारापासून झोपड्या मोडणारे पोलिस मागं अन् हा दोन पोरं घेऊन पुढं असा रस्तोरस्ती राहत इथं आला. या इथंवर येण्यात त्याला सात-आठ वर्ष लागली. अन् कळू लागलेल्या पोरांनी संगत सोडली. आताचं धाकटं पोर अन्न मागून आणतं. हा म्हातारा खातो. गप्पा मारतो. अधूनमधून मार्केटात जाऊन रोजावारी कोणी सांगितलं तर विशेष करतो. बरोबर दिसत नाही. अन् चष्मा घेण्याची कुवत नाही, माझ्यासारख्याकडून चार आठ आणे घेऊन तो विडीकाडी भागवितो. अन् दिवसाचे डोंगर अल्लाचं नाव घेत ओलांडीत राहतो."

या चाच्यावर गोष्ट लिही, - 'मरण फार स्वस्त होत आहे '...सून मरते म्हणजे बाळंतपणं लादून मारली जाते. दहा मुलं. त्यांच्या जगण्या-मरण्याची बापाला पर्वा नाही. तो त्यांना सोडून जातो. म्हातारा तेच करतो. अन् दहापैकी एकच मूल जवळ ठेवतो. त्याचीही पर्वा नाही. छान जमेल. गेटवेपासून इथंपर्यंत दिसणा-या अनेक रस्त्यांवरील पोरांकडे लक्ष तरी जाईल. लिही..."

" ...ती बघ, ...साटिनच्या घागऱ्यातील हिरव्या चोळीतील लाल झिरझिरीत ओढणीवाली खूप जिवंत वाटते. आतापर्यंत पाहिलेल्या माणसांत जोमदार दिसते. रंग येवढा काळा असूनही डोळ्यांत भरते." माझा कविमित्र केरवा मणी विकणाऱ्या बाईकडे पाहात राहिला. काळ्या दगडातील पुष्ट मूर्तीसारखी ती टणक वाटत होती. "ती दररोज सकाळी एक ट्रंक घेऊन बाहेर पडते – अन् संध्याकाळी पारखून एखादा पुरुष घेऊन येते. ट्रंकेत दातवण, कुंकू, मेण, सुया, काळ्या पोती, काचमणी, लहान मुलांचे वाळे, बिंदल्या, केरवा मणी – आणि नको असलेले केस काढण्याचे साबण असतात. धंदा करते. तिकडून हॉटेलात आणलेल्या पुरुषाकडून जेवून येते. सकाळी उठून तोंड धुऊन नास्त्याला हॉटेलात जाते."

"...आणि यानं तर झोपडंही बांधलेलं नाही. कोण हा?"

"हा बारकू माझ्या गावाकडचा. जवळचा. दोन्ही पायांनी पांगळा आहे. त्यामुळे तो नेहमी त्या खुर्चीच्या आकाराच्या गाडीत बसलेला असतो. त्या गाड्यातच बसून खातो; अन् बैलाप्रमाणे बसल्या जागी शेणमूत टाकतो आणि हिंदु पुराणातील स्त्रीसारखी त्याची बायको सारजा, त्याचं आई जसं मुलाचं सर्व काही करते तसं करते. गावी तिला लोक सत्पतिव्रता म्हणतात. आणि तीही स्वतःचा उल्लेख सत्पतिव्रता म्हणून बोलताना करते. तिच्या डोक्यात जर ते पुराणातील थोर स्त्रियांचे आदर्श नसते तरी ती बारकूजवळ राहिलीच नसती. कारण बारकू जरी पांगळा असला तरी महाभयंकर माणूस आहे. तो पूर्वी पाणाड्याचं काम करी. अन् विहिरीच्या खोदाईचं काम करी. जमिनीच्या पोटातील खळबळ त्याला ऐकू येते. पाणी दिसतं. एकदा तो विहीर खोदत असताना पाणी आलं तसा तो खाली कोसळून पडला, अन् असा लुळा-पांगळा झाला. अंथरुणावर पडून राहू लागला. जनावरासारखी बसल्या जागी घाण करू लागला. त्याच्या या घाणीला त्याचा वडील भाऊ-भावजय कंटाळली. आणि त्यांनी त्याला घराबाहेर काढला. बारकू बायको अन् दोन मुलं घेऊन मुंबईला आला, आणि-आपल्या बायकापोरांचं, विशेषतः वडील मुलीच्या देखणेपणाचं भांडवल करून पैसा करू लागला.

"तो मुंबईला आला त्यावेळी त्याच्या डोक्यात सुडानं, ईषेनं पेटलेल्या शेतकऱ्याच्या डोक्यात जे विचार घुसतात, तेच विचार होते. त्याला घराबाहेर हाकलणाऱ्यावर मात करण्याचे; वेगळं शेत, घर बांधण्याचे, आपल्या मुलांना राजासारखं हुकूम सोडून शेतीवाडीचे काम करून घेण्याचे विचार होते. धडक्या भावापेक्षा गावात मोठं व्हायचं, ही स्वप्नं पुरी करण्यासाठी जसं वागावं तसंच तो वागत होता.

"मुंबईला आले त्या वेळी आठ महिने ते कुटुंब एकत्र बसत होतं. तरी आठ महिन्यांत दोनशे-अडीचशे रुपये मिळाले. अन् अजून त्यामध्ये सभ्यपणा, शेतकरीपणा जागा असल्याने तो पावसाळा काढण्यासाठी गावी गेला. जवळचे पैसे गावातील एका श्रीमंत दुकानदारापाशी अनेक लोकांच्या साक्षीने ठेवून पावसाळा संपता संपता मुंबईला आला. यावेळी मात्र इतर भिकारी कुटुंबांचं ऐकून, पाहून तो सर्व कुटुंब एकत्र बसण्याऐवजी फुटून बसू लागला. पैशाच्या लोभापायी बायकापोरं वेगवेगळी बसवण्याचं धाडस त्याच्यात निर्माण झालं. त्याची बायको तान्हं मूल मांडीवर घेऊन स्टेशनाच्या तोंडावर डोळ्याला गूळ लावून, आंधळी होऊन बसू लागली. ब्राह्मणाच्या गरीब पोरांची ऐट करून त्याचा पोरगा शेंडी, जानवं, कपाळाला गंध लावून देवळाच्या दारावर बसू लागला. इतर काळ्यानिळ्या पोरांपेक्षा अधिक पैसे, फळं आणि खाण्याचं गोडधोड मिळवू लागला. आणि त्याची भरात येऊ लागलेली मुलगी त्याच्या सांगीनं हाततोंड साफ करून नीटनेटका भांग पाडून, तंग तरतरीत लुगडं नेसून त्याचा गाडा लोटीत रस्तोरस्ती फिरू लागली. तिच्या उराकडे, तोंडाकडे रोखून बघणाऱ्या माणसांकडे बघून हसू लागली. हात जोडून भिक्षा मागू लागली. अन् तरुण माणसांना बिनदिक्कत खुणावू लागली आणि तिच्या आईबापाचं मुंबईला आल्यापासून जे रात्रीचं पाहिलं होतं ते करण्याची इच्छा तिच्या

रक्तात खळबळ माजवू लागली. आणि काही दिवसांनी ती तेच करू लागली. आपला तरुण देह भाड्याने देऊ लागली, आणि मिळणारे पैसे बापाला देऊ लागली.

"आणि गावी भावावर मात करण्याच्या ईर्षेपायी आपले कुटुंब किती खोल गाळात चालले आहे याची त्याला शुद्धच नव्हती. तो एखाद्या भुकेलेल्या वाघासारखा पैशावर झडपा घालीत होता, अन् आपल्या कुटुंबाची पर्वाच करीत नव्हता. असे काही दिवस गेले आणि एके दिवशी बापाच्या हातावर थोडे नाही चांगले तीस रुपये ठेवून ती एका माणसाबरोबर गेली, ती महिनाभर आलीच नाही.

"आली तेव्हा पार बदलून आली. एखाद्या नुकत्याच सासरी गेलेल्या चांगल्या घरातील नववधूसारखी दिसत होती. तिचा रंग गोरापान झाला होता. केसाला काळीगर्द चकाकी आली होती. चेहरा फुलासारखा फुलला होता. कपाळावर कुंकू आणि अंगावर चांगलं भारी लुगडं-पोलकं होतं. पोरीचा हा ब्राह्मणी अवतार पाहून ते दोघेही खूष झाले. त्याने तिला खुणवून जवळ बोलावलं अन् तिच्या डोक्याचं चुंबन घेतलं. अन् चला, पोरीचं लग्न झालं नाही तरी खायला प्यायला, लेण्यानेसण्याला चांगलं घर मिळालं. इथं खराबी होण्यापरीस हे बरं असं सारजाला वाटलं. तिनं तिला मनात दुःख असतानाही विचारले-"पातळ कुणाचं?"

"तिचं!"

"भेटायला आलीस?"

"नाही. त्यांनी हाकलून दिलं!"

"का दिलं?" सारजाने घाबरून विचारलं.

"त्याची बायको रुसून गेली होती. तीन महिने झाले तरी येत नव्हती म्हणून मला ठेवली. तिला कळलं. ती तिचे भाऊ घेऊन आली. त्यांनी मला घराबाहेर काढलं. मी आले."

"हे मुलीचं बोलणं ऐकून त्याला बरं वाटलं; अन् सारजाला वाईट वाटलं. अशाच प्रकारं ती बापाला पैसे देऊन चार वेळा बाहेर जाऊन महिना-पंधरा दिवस राहून आली; पण पहिल्या वेळेला जी सुखसोय होती ती काही मिळाली नाही. एकानं तर तिला फॉरस रोडला विकायला काढली होती. म्हणून ती एकदम परक्या माणसाबरोबर-पहिल्यासारखी बाहेर जायला घाबरू लागली-तिथंच धंदा करू लागली. तिला घटकेसाठी घेऊन जाणाऱ्या प्रत्येकाला मात्र ती विचारत होती, 'ये, मला इथून घेऊन जातो का? खोली घेऊन मला बायको करून राहतो का?' पण कोणी तिला बायको करून घ्यायला तयार होत नव्हते. जास्तीत जास्त तिला घेऊन हाजी मलंग किंवा अशाच सोयीच्या ठिकाणी जात होते, अन् तिला फूटपाथवर धुळीत लोळत झोपण्याचं, राहण्याचं, वाटेल त्या मवाल्यांना तो देईल त्या किमतीत शरीर देणं नकोसं झालं होतं. जनावरांप्रमाणे उघड्यावर आईबापाचं अन् तिचं वाटेल त्याशी एकत्र येणं तिला तिरस्काराचं वाटू लागलं. आईबापाबद्दल तिला तिळमात्र आदर, माया अन् भीती राहिली नव्हती. झोपडं बांधण्याची बापाला केलेली

विनंती त्यानं झिडकारली तेव्हापासून ती त्यांच्यापासून दूर पळून जाऊ पाहत होती. तिच्या धाकट्या भावाचीही आईबापाबद्दल अशीच भावना होती. त्याला बापाच्या ढुंगणाला लागणारी घाण, त्याची दुर्गंधी असह्य होऊ लागली होती. तोही बापापासून इतर अनेक मुलांप्रमाणे दूर होऊ पाहत होता. पण बहिणीप्रमाणं त्यालाही मार्ग सापडत नव्हता.

"ते दोघे अशा मन:स्थितीत असताना पावसाळा आला. अन बारकू फक्त मुलाला अन् रुपयांनी जड झालेल्या कंबरेच्या कश्याला घेऊन गावी गेला. मुलीनं पावसाळ्यातही पैसा कमवावा म्हणून तिला, अन् तिनं पैसा उधळू नये, पळून जाऊ नये म्हणून आयुष्यात पहिल्यांदाच बायकोला सोडून गावी गेला. तिला त्यानं गावी नेलं असतं तर तिच्या मनातील वणवे विझले असते. पण पैशाच्या अति लोभापायी त्यानं नेलं नाही हे समजून ती पळण्याची नुसती डोळ्यात तेल घालून वाट पाहू लागली. पावसाळा सुरू झाला. पडत्या पाण्यात हॉटेल दुकानांच्या वळचणीला, पायरीला कुत्र्यामांजरासारखं अंगाचं मुटकुळं करून झोपणं, जागा मिळाली नाही तर जागत, कुडकुडत, भिजत बसणं तिला असह्य वाटू लागलं. तिनं एक महिना अनुभवलेलं सुखी आयुष्य तिला दु:खाच्या जात्याखाली अधून मधून भरडून काढू लागलं. त्यामुळे तिला कोणी कितीही पैसे देऊ केले तरी ती आधी जागा विचारीत होती. त्यांनी सांगितलेली जागा उत्तम वाटली तरच जात होती. पूर्वीप्रमाणे संडासात, झुडपाआड ती कितीही पैसे देऊ केले, तरी जात नव्हती. अन् पडत्या पावसात तिनं महिनाभर पलंगावर, मऊ गादीवर समाधानानं, कौतुकानं जे शरीरसुख घेतलं होतं, चांगलं, तेलकट, तुपट खाणं खाल्लं होतं त्याचे अन् तिच्याबरोबर बायकोप्रमाणे प्रेमानं, मानानं वागणाऱ्या त्या माणसाचे आठव येत होते. तिला रडवीत होते. सरतेशेवटी या सुखद आठवाने तिचं खरं जिणं एवढं असह्य झालं की आईला पन्नास रुपये देऊन तिने स्वत:ला विकून घेतलं. अन् एका माणसाबरोबर वेश्याघर जवळ केलं. गेली ती खोल दरीत पडल्याप्रमाणं कधी वर आलीच नाही.

"दोन महिन्यांनी तो दीड हजाराचं खरेदीखत करून आला. आता फक्त त्याला दोन बैल, गाडी अन् एक बारकंसं घर बांधायचं होतं. मुंबईला आल्यावर मुलगी पळाल्याचं कळताच त्यानं भावाला पत्र लिहिलं, माझी पोरगी गाडीखाली मेली. तू काही येऊ नको. मीच लवकर येतो.

"आणि पोरीच्या कमाईची पुरी जबाबदारी पोरावर टाकून दिली. तो सकाळ संध्याकाळ पोराला ब्राह्मण बनवून देवळापुढे बसवीत होता. मधल्या वेळात बूट पॉलिश करायला सांगत होता. पण पोरगं बापाचं न ऐकता नुसतं बूटपॉलिश करू लागलं. अन् आस्ते आस्ते शहाणपण घेत बापापासून दूर होऊ लागलं. कधी त्याच्याजवळ येऊ लागलं. कधी रात्रीचंही बाहेरच राहू लागलं. अन् एक दोन वर्षांत कायमचंच नाहीसं झालं.

"अशी कळती कमवती दोन मुलं निघून गेली तरी त्याची लालसा संपली नव्हती. नुकत्याच वाढत चाललेल्या पोरावर त्याचा डोळा होता. त्याचे हातपाय पंगू केले तर ते

अधिक करुणास्पद दिसेल, त्यामुळे अधिक पैसा मिळेल यासाठी तो देखण्या गोऱ्यापान मुलाचे हातपाय पिरंघळून वाकडे तिकडे करायला सांगत होता. ती ऐकत नव्हती. त्यामुळे त्यांची नेहमी भांडणे होती होती. असे काही दिवस गेले. अन् तिनं रडत ओरडत सांगितलं, "मूल चोरीला गेलं.." ती सारखी रडू लागली. अन्न घेईनाशी झाली. अन् मुंबई सोडून कायमचं गावी जाण्याचं विनवू लागली, पण तो ऐकत नव्हता. अन् तो आपल्यालाही एखादे दिवशी विकील असा तिने धसका घेतला होता.

"मुंबईला आल्यापासून फूटपाथवरचं आयुष्य सुरू केल्यापासून त्याचं नुकसान झालं होतं तरी त्याला विशेष दुःख वाटत नव्हतं. कारण त्याचा बूटपॉलिश करणारा मुलगा आज नाही तरी उद्या त्याच्याकडे येणार होता. अजूनही आपणाला पुष्कळ मुलं होतील असा त्याला विश्वास वाटत होता. एवढंच नव्हे तर एकानं त्याला आपली मुलगी देऊ केली होती. अन् त्यानं आपल्या भावावर मात केली होती. अवघी महारवाड्यातील माणसं त्याला मान देत होती.

"असे आणखी काही उन्हाळे त्याच्या डोक्यावरून गेले. त्याचे डोईचे केस पांढरे होऊ लागले. अन् अंगाला थरके येऊ लागले. या काळात त्याला तीन मुलं झाली. पहिल्या पोरीप्रमाणं त्याची चौथीही मुलगी उपवर झाली. लोकांच्या डोळ्यांत भरू लागली. अन् केवळ नाव मिळविण्यासाठी तिचं लग्न मोठ्या धुमधडाक्यानं त्यानं ठरवून टाकलं. पण तिच्या शीलाला अथवा जिवालाही धोका होईल हे ठाव असूनही तो तिला गावी पाठवीत नव्हता. कारण तिच्या रूपावर त्याला अधिक पैसा मिळत होता. अन् अशा या पोरीवर एक भयंकर प्रसंग गुदारला. त्याच्या त्या कोवळ्या मुलीवर जबरी करण्यासाठी आठदहा जणांनी त्यांना गरडा घातला, अन्..."

मी तो प्रसंग सांगणार तोच आमच्या बाजूचे पाल बॉम्ब फुटल्याप्रमाणे हादरून गेले; कोसळून पडले. कोणी तरी जीव तोडून किंकाळ्या फोडीत राहिले. आम्ही तिकडे बघतो तो एक नागिणीसारखी तकतकीत, काळ्या रंगाची, दंडात चांदीच्या कड्या, पायात चांदीच्या कड्या असलेली सडसडीत अंगाची एक नागवी तरुण मुलगी जीव घेऊन 'पळावे' तशी बाहेर आली. तशी तिच्यामागे दोन तरुण हातात सुरे घेऊन आले. ओळीने झेप घेऊन त्यांनी तिच्या उघड्या अंगावर वार केले. दुसऱ्याने तिचा मद्रासी बांधणीचा आंबाडा धरून तिला खचकून मागे ओढली. तशी ती जिवाच्या आकान्ताने किंचाळू लागली.– अन् पालातील अनेक माणसे धावू लागली. सर्वांच्या पुढे भिमू होता. त्याच्या हातात त्याची रिकामी बाटली होती. अंगावर येणारी गर्दी पाहून त्या तिच्यावर बलात्कार करणाऱ्या धावबाज मवाल्यांनी रेल्वेत उडी घेतली, अन् रेल्वेची खडी लोकांच्या अंगावर फेकीत ते अंधारात दिसेनासे झाले. सर्व गर्दी त्या कोसळून पडलेल्या पालाभोवती जमली.

ती मुलगी रस्त्यावर पालथी पडली होती. तिच्या जखमांमधून रक्त वाहत होते. कोणी तरी तिच्या अंगावर फडके टाकले अन् पाल वर उचलून काही माणसे आत घुसली. आत तिचा नवरा रक्ताच्या थारोळ्यात कण्हत पडला होता. त्याला अंगावर लांबलचक तीनचार

जखमा झाल्या होत्या. नवऱ्याजवळ झोपलेल्या विवाहित तरुणीवर नवऱ्यासमक्ष बलात्कार होणार होता. तो सारा प्रकार पाहून-ऐकून माझा कविमित्र तळापासून हादरून गेला, अन् कमालीच्या व्यथित सुराने म्हणाला,

"चल!"

आम्ही दोघे पुढे चाललो होतो. स्टेशनजवळ आलो होतो. स्टेशनावरच्या नळावर तुफान गर्दी होती. पाण्यासाठी माणसे भांडत होती. अन् रेल्वेचा एक पोलिस कोणी तरी तरुण मुलगी मिळते का म्हणून एक दोन स्टेशनातील गुंड पोर घेऊन त्या गर्दीला मदत देत होता. आणि चाच्याचा नातू जलाल हातात जस्ताची तपेली घेऊन मांजरासारखा गर्दीत घोटाळत होता.

माझा मित्र म्हणाला, "मी लिहिलेला मजकूर फेकून देतो. अन् एकच ओळ ठेवतो– ही मुंबई आहे. इथं माणसाला माणूस खातो, अन् मरण स्वस्त होतं...!"

# लेखक परिचय

**दिवाकर कृष्ण केळकर :** (19 ऑक्टोबर 1902 - 31 मे 1973)

जन्म गुंटकल, जिल्हा गुलबर्गा येथे. मुंबई, पुणे व सांगली येथे शिक्षणासाठी वास्तव्य. एम.ए., एलएल.बी. नंतर हैद्राबाद येथे वकिलीस आरंभ. 1922 च्या **'मनोरंजन'** अंकातून 'अंगणातला पोपट' ही पहिली कथा प्रसिद्ध.

त्यांचा पहिला कथासंग्रह 'समाधी व सहा गोष्टी' 1927 मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'रूपगर्विता आणि सहा गोष्टी' (1941) आणि 'महाराणी आणि इतर कथा' (1955) हे संग्रह प्रसिद्ध झाले. आपण फार थोड्या गोष्टी लिहिल्या असे ते म्हणतात. 'किशोरीचे हृदय' (1934) आणि 'विद्या व वारुणी' (1944) ह्या त्यांच्या कादंबऱ्या आणि 'तोड ही माळ' (1934) हे त्यांचे नाटक. 1950 साली मुंबई येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अधिवेशनात कथा शाखा संमेलनाचे ते अध्यक्ष होते. लातूर येथील मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद. अतिशय अबोल व सामाजिक जीवनात फारसे न मिसळणारे व्यक्तिमत्त्व.

दिवाकर कृष्णांना कथेच्या नव्या रूपाची जाणीव झालेली होती. त्यामुळे 'गोष्टी' ची लघुकथा झाली. दिवाकर कृष्ण हे मराठी लघुकथेचे एक शिल्पकार. कथानकाच्या चमत्कृतिपूर्ण गुंफणीपेक्षा हळुवार हाताने केलेल्या चिरंतन भावनांच्या आविष्काराने लघुकथेमध्ये अधिक सखोलपणा व सामर्थ्य येते हे दिवाकरांनी दाखविले.

**नारायण सीताराम फडके** : (4 ऑगस्ट 1894 - 22 ऑक्टोबर 1978)

मराठी कथा–कादंबरीसृष्टीतील अतिशय लोकप्रिय लेखक. एम.ए. नंतर तत्त्वज्ञानाचे अध्यापन, 'कलेसाठी कला' अशी वाङ्मयीन भूमिका आग्रहाने मांडणारे ज्येष्ठ समीक्षक. फडक्यांनी न हाताळलेला असा एकही वाङ्मयप्रकार मराठी भाषेत नाही. 1940 मध्ये ते रत्नागिरी येथे भरलेल्या साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष होते. भारत सरकारने त्यांना 'पद्मभूषण' देऊन गौरविले. इंग्रजी व मराठीत विपुल लेखन केले आहे.

'अल्ला हो अकबर', 'दौलत', 'अटकेपार', 'प्रवासी', 'अंजली', 'हसू आणि आसू', 'सितारा मंझिल' इत्यादी सुमारे 74 कादंबऱ्या प्रसिद्ध. 'फडके यांच्या गोष्टी भाग एक आणि दोन', 'लोला आणि इतर गोष्टी', 'प्रीतिपुष्प', 'अभ्यंगस्नान', 'मिठी बाजूबंद' इ. तीस कथा संग्रह; 'युगांतर', 'संजीवन', 'जानकी' इ. नाटके; 'प्रतिभासाधन', 'लघुकथा लेखन तंत्र व मंत्र' इ. टीकाग्रंथ; 'टाकीचे घाव', 'मैफल', 'झंकार' इ. टीकालेखांचे

संग्रह; 'किर्लोस्करः व्यक्ती आणि कला', 'दादाभाई नौरोजी', 'टिळक', 'गांधी', इत्यादींची चरित्रे, 'रुमझुम' हा काव्यसंग्रह अशा प्रकारचे वैविध्यपूर्ण साहित्य. त्यांना 'युगप्रवर्तक फडके' असे म्हटले जाते. त्यांच्या काही सहित्याचे अनुवाद गुजराती, हिंदी, तमीळ, इत्यादी भाषांत झाले आहे.

**विष्णु सखाराम खांडेकर :** (19 जानेवारी 1898 - 2 सप्टेंबर 1976)

जन्म सांगली येथे. शालेय शिक्षण सांगलीला. इंटरपर्यंतचे शिक्षण पुण्यास. दक्षिण कोकणातल्या शिरोडे गावी 1920 ते 38 पर्यंत इंग्रजी शाळेचे मुख्याध्यापक. 'वैनतेय' साप्ताहिकाचे सहसंपादक व "ज्योत्स्ना" मासिकाचे संपादक. 1938 नंतर लेखन हाच व्यवसाय.

कथा, कादंबरी, लघुनिबंध, पटकथालेखन, समीक्षा इ. अनेक क्षेत्रांत त्यांना मानाचे स्थान मिळाले ते त्यांच्या प्रसन्न लेखनामुळे. 'जीवनासाठी कला' ही त्यांची भूमिका. 1941 मध्ये सोलापूर येथील साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष, नाट्य सम्मेलनाचे अध्यक्ष आणि महाराष्ट्रातील अनेक छोट्या मोठ्या साहित्य सम्मेलनांचे अध्यक्ष, 'ययाती' कादंबरीला साहित्य अकादमीचा पुरस्कार व एक लाख रुपयांचे ज्ञानपीठ पारितोषिक.

'पूजन', 'नवा प्रातःकाल', 'फुले आणि दगड', 'घरट्याबाहेर', 'सांजवात', 'हस्ताचा पाऊस', 'चंदेरी स्वप्ने', इ. अनेक कथासंग्रह. 'हृदयाची हाक', 'कांचनमृग', 'उल्का', 'पांढरे ढग', 'क्रौंचवध', 'अश्रू', 'ययाती', 'अमृतवेल' इ. कादंबऱ्या महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरील तमीळ, गुजराथी, कानडी भाषकांत लोकप्रिय. मराठी लघुनिबंधाचे शिल्पकार. 'वायुलहरी चांदण्यात', 'सायंकाल', 'मंझधार' इ. अनेक लघुनिबंध संग्रह. मराठीत 'रूपककथा' हा वाङ्मयप्रकार समृद्ध केला. त्यांचे टीकालेख 'धुंधुर्मास', 'रंग आणि गंध', 'रंग व रेषा' इ. पुस्तकांत समाविष्ट केले आहेत. 'अभिषेक' हा त्यांच्या वाङ्मयीन भाषणांचा संग्रह. 1920 पासून त्यांनी सतत लेखन करून मराठी साहित्यात एक युग निर्माण केले. मराठीतील ज्येष्ठ व श्रेष्ठ कादंबरीकार व समीक्षक.

**यशवंत गोपाळ जोशी :** (17 डिसेंबर 1901 - 7 नोव्हेंबर 1963)

जन्म भिगवण, जि.पुणे येथे. प्राथमिक शिक्षण पुण्यास. आर्थिक ओढगस्तीमुळे इंग्रजी पाचवीत असताना शिक्षण सोडले. मिलिटरी अकौंट्स, येरवडा सेंट्रल जेल, रेल्वे, बर्माशेल, पुस्तक दुकान, छापखाने यांमध्ये हंगामी स्वरूपाच्या नोकऱ्या केल्या. शिवाय शाडू व सुगंधी तेले करून विकण्याचा, वर्तमानपत्रे विकण्याचा उद्योग केला. लेखनास आरंभ, त्यानंतर वि. वि. बोकीलांचा 'वळवाचा पाऊस' हा कथासंग्रह छापून प्रकाशन व्यवसायास आरंभ. 'प्रसाद' मासिकाचे संपादन व प्रसाद प्रकाशन संस्थेतर्फे उत्तमोत्तम प्रकाशने.

कथालेखनाने लेखनाचा आरंभ–'यशवंत' या केवळ लघुकथेला वाहिलेल्या मासिकाच्या

पहिल्या कथास्पर्धेत 'शेवग्याच्या शेंगा' या कथेला प्रथम पारितोषिक. त्यांच्या 'पुनर्भेट भाग एक' (1932) या पहिल्याच कथासंग्रहाचे वाचकांनी स्वागत केले. 1932 ते 1943 पर्यंत पुनर्भेटचे सात भाग प्रसिद्ध झाले. 'तुळशीपत्र आणि इतर गोष्टी' (1937), 'रेघोट्यांचे दैवत' (1947), 'मायेच्या सावल्या' (1947), 'जाई-जुई' (1949), 'तरंग' (1950) इ. त्यांचे काही कथासंग्रह, 'पडसाद' (1938), 'होमकुंड' (1936), 'वहिनीच्या बांगड्या' (1950), 'शेवग्याच्या शेंगा' (1955) या त्यांच्या कादंबऱ्या. 'श्रीकांत' (1937), 'त्रिदोष' (1927) इ. त्यांच्या कादंबरिका. 'प्रियाराधन ऊर्फ श्रीमुखात' (1930), 'भोळाशंकर' (1972) ही त्यांची नाटके. 'बोलका सिनेमा' (1932) हे प्रहसन. 'दुधाची घागर' या पुस्तकातून त्यांचे आत्मचरित्रपर लेखन, या शिवाय 'आवडत्या गोष्टी' (1935), 'साभार परत' (1939) हे संपादित कथासंग्रह, 'साहित्यिकांची सफर' (1941), 'अनौपचारिक मुलाखती' (1942), 'लक्षात राहिलेली माणसे' (1961), 'मेळ' (1947) ही अन्य काही पुस्तके. 'प्रसाद' मधून त्यांचा 'सुबोध ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ प्रकाशित झाला. 'पडसाद' कादंबरीच्या आधारे प्रभात फिल्म कंपनीने 'माझा मुलगा' हा बोलपट प्रकाशित केला. या शिवाय 'वहिनीच्या बांगड्या', 'शेवग्याच्या शेंगा' इ. चित्रपटांच्या कथा.

**वामन कृष्ण चोरघडे** : (16 जुलै 1914 - 1 डिसेंबर 1995)

नागपूर जिल्ह्यातील नारखेड येथे जन्म, शिक्षण नागपूर येथे. एम.ए., बी.टी. नंतर जी. एस. कॉलेज ऑफ कॉमर्स, नागपूर येथे अध्यापन. निवृत्तीनंतर महाराष्ट्र विद्यापीठ पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळाचे भूतपूर्व संचालक. 1978 मध्ये चंद्रपूर येथील मराठी साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष.

'प्रतिभा' साप्ताहिकात नव्या वळणाची काव्यात्मक कथा लिहून त्यांनी सर्वांचे लक्ष वेधून घेतले. 'सुषमा' (1936), 'यौवन' (1941), 'संस्कार' (1950), 'नागवेल' (1957), 'चोरघडे यांची कथा' इ. कथासंग्रह. 'संपूर्ण चोरघडे' या पुस्तकात 1969 पर्यंतच्या त्यांच्या कथा एकत्रित केल्या आहेत. 1960 नंतर 'मजल', 'बेला', 'ख्याल' हे कथासंग्रह; 'साहित्याचे मूलधन' हे लोकसाहित्य विषयक पुस्तक. याशिवाय टीकात्मक स्फुट लेखन आणि 'जडण-घडण' (1981) हे आत्मचरित्र. मराठीतील नव्या-जुन्या कथेचे शिल्पकार.

**चिंतामण विनायक जोशी** : (19 जानेवारी 1892 - 21 नोव्हेंबर 1963)

पुण्यास जन्म. पुण्यातच शालेय व महाविद्यालयीन शिक्षण. एम्.ए. नंतर प्रथम सरकारी शिक्षणखात्यात शिक्षक व त्यानंतर 1920 पासून बडोदा कॉलेजात पाली, इंग्रजी व मराठी विषयाचे अध्यापन, 1928 पासून बडोदा सरकारचे दफ्तरदार. 1949 मध्ये निवृत्त.

श्रेष्ठ विनोदी लेखक. कोल्हटकर-गडकऱ्यांनंतर मराठी विनोद समृद्ध केला. चिमणराव व गुंड्याभाऊ या मानसपुत्रांना विनोद साहित्यात लोकमान्यता. 'एरंडाचे गुऱ्हाळ' (1932),

'चिमणरावाचे चऱ्हाट' (1933), 'वायफळाचा मळा' (1936), 'आणखी चिमणराव' (1944), 'ओसाडवाडीचे देव' (1946), 'गुंड्याभाऊ' (1947), 'लंकावैभव' (1947), 'रहाटगाडगं' (1955), 'हास्यचिंतामणी' (1961), 'बोरीबाभळी' (1962), हे विनोदी लेखन. मानवी स्वभावातील साध्या विसंगतीचे मार्मिक दर्शन घडवणारा त्यांचा निर्मळ विनोद मन प्रसन्न करतो. 'चिमणराव स्टेट गेस्ट' या कथेच्या आधारे काढलेला 'सरकारी पाहुणे' हा चित्रपट खूप लोकप्रिय ठरला. त्यांनी 'पाली कंकॉर्डन्स', '(कोश) जातकातील निवडक गोष्टी', 'बुद्धसंप्रदाय व शिकवण' इ. ग्रंथनिर्मिती केली आहे.

**दिगंबर बाळकृष्ण मोकाशी :** (27 नोव्हेंबर 1915 - 29 जून 1981)

नव्या जाणिवांचा आविष्कार करणाऱ्या मराठी कथेचे एक नवे शिल्पकार. रेडिओ दुरुस्तीचा स्वतंत्र व्यवसाय. विविध नियतकालिकांतून लेखन. विज्ञान, धर्म व तत्त्वज्ञान या विषयांची ओढ.

'लामणदिवा' हा पहिला कथासंग्रह 1947 मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'कथा मोहिनी', 'आमोद सुनासि आले', 'असा असावा नवरा', 'वणवा', 'चापलूस', 'तू आणि मी', 'माउली', 'आदिकथा' इत्यादी अनेक कथासंग्रह प्रसिद्ध. 'देव चालले', 'पुरुषाला शंभर गुन्हे माफ', 'आनंद ओवरी', ह्या कादंबऱ्या; 'पालखी', 'अठरा लक्ष पावले', 'ललित अनुभव', 'स्थळयात्रा', इत्यादी प्रवासवर्णनपर लेखन; 'यंत्र आणि तंत्र', 'जमीन आपली आई', ही शास्त्रीय पुस्तके. 'गुपित', 'अंधारदरी' ही कुमारांसाठी लिहिलेली पुस्तकेही लोकप्रिय आहेत.

**गंगाधर गाडगीळ :** (25 ऑगस्ट 1923)

मुंबई येथे जन्म आणि शिक्षण. विल्सन महाविद्यालयातून एम.ए., 1946 पासून शासकीय महाविद्यालयात अर्थशास्त्राचे अध्यापन; एप्रिल 1964 ते जुलै 1971 पर्यंत मोनजी अर्थशास्त्र आणि वाणिज्य महाविद्यालयाचे प्राचार्य. आपटे उद्योग समूह तसेच वालचंद उद्योग समूहाचे आर्थिक सल्लागार.

अर्थशास्त्रज्ञ म्हणून ख्याती. अर्थशास्त्रविषयक लेखन आणि ग्रंथ प्रसिद्ध. नव्या प्रवृत्तीचे कथालेखक आणि समीक्षक म्हणून साहित्य क्षेत्रात वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी. 1940 मध्ये 'प्रिया आणि मांजर' ही पहिली कथा प्रसिद्ध. 'कडू आणि गोड', 'तलावातील चांदणे', 'उद्ध्वस्त विश्व', 'नव्या वाटा', 'कबुतरे', 'भिरभिरे', 'काजवा', इ. प्रमुख कथासंग्रह; 'लिलीचे फूल', 'दुर्दम्य', या कादंबऱ्या; 'खडक आणि पाणी', 'साहित्याचे मानदंड', हे समीक्षाग्रंथ; 'ज्योत्स्ना आणि ज्योती' हे नाटक. आकाशवाणी आणि नियतकालिकांतून अनेक एकांकिका प्रसिद्ध. 'गोपुरांच्या प्रदेशात', 'साता समुद्रापलीकडे' ही प्रवासवर्णने. 'इलस्ट्रेटेड विकली', 'क्रेस्ट', 'थॉट', 'एव्हरग्रीन रिव्ह्यू', 'वेस्टर्न ह्यूमॅनिटिज रिव्ह्यू' इ. दर्जेदार इंग्रजी नियतकालिकांतून कथा, लेख, विनोदी लेख प्रसिद्ध, त्यांच्या कथांचे भारतीय आणि युरोपीय भाषांतून अनुवाद.

पंढरपूरच्या साहित्यसंमेलनात कथाविभागाचे अध्यक्ष (1955), मुंबईच्या अखिल भारतीय लेखक परिषदेचे प्रमुख कार्यवाह (1962), पश्चिम मुंबईच्या रोटरी क्लबचे अध्यक्ष (1971 - 72), मराठी साहित्य मंडळाचे उपाध्यक्ष (1974 पासून), अनेक चर्चासत्रांतून, परिषदांतून भाषणे आणि निबंधवाचन. 1956 - 57 मध्ये मराठीतील श्रेष्ठ लेखक म्हणून मिळालेल्या शिष्यवृत्तीनुसार युरोप - अमेरिकेचा दौरा. साहित्य अकादमीचे मानद सदस्य.

**अरविंद गोखले :** (19 फेब्रुवारी 1919 -- 24 ऑक्टोबर 1992)

विस्कॉसिन विद्यापीठातील एम.एस. ही पदवी. 1943 पासून पुण्याच्या शासकीय कृषी महाविद्यालयात संशोधन व अध्यापन. 1963 पासून मुंबईच्या धरमसी कंपनीत नोकरी. 1979 मध्ये सेवानिवृत्ती.

'नजराणा' (1944) पासून 'मंजुळा', 'विघ्नहर्ता', 'शुभा', 'अनामिका', 'कमळण', 'जोडाक्षर', इ. पंचवीस पेक्षा अधिक कथासंग्रह प्रसिद्ध. भारतीय भाषांतील निवडक कथांचे साक्षेपी संपादन. त्यांचे कथाविश्व नव्या प्रवृत्तीचा वेध घेऊन त्या दृष्टीने जीवन मूल्ये जपणारे असे आहे. भावे स्मृती पुरस्कार, महाराष्ट्र राज्य पुरस्कार, बिहार राज्य पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषद गौरव पुरस्कार (1990) इत्यादी. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या मराठी कथेचे एक बिनीचे शिल्पकार.

**व्यंकटेश दिगंबर माडगूळकर :** (6 जुलै 1927)

जन्म सातारा जिल्ह्यातील माडगूळ या खेडेगावी. 1944 साली माध्यमिक शिक्षणाला रामराम. बेचाळिसच्या स्वातंत्र्य लढ्यात सामील. 1945 मध्ये किर्लोस्कर मासिकात चित्रकार म्हणून नोकरी. 1946 मध्ये प्राथमिक शिक्षक. 1947 ते 57 पुणे, मुंबई अशी भ्रमंती. 'वडारवाडीच्या वस्तीत' ही कथा नवयुग दिवाळी अंकात. 'देवा सटवा महार' ह्या कथेला ''अभिरुची'' मासिकाचे पारितोषिक. 'मौज' मधील 'माणदेशी माणसा' चे लेखन केले आणि कीर्ती मिळाली. यानंतर 'गावाकडच्या गोष्टी', 'हस्ताचा पाऊस', 'काळीआई', 'जांभळाचे दिवस', इ. कथासंग्रह. 'बनगरवाडी', 'वावटळ'. 'पुढचे पाऊल'. या कादंबऱ्या. 'तू वेडा कुंभार', 'सती', 'पति गेले काठेवाडी' ही नाटके. 'बिनबियाचे झाड', 'कुणाचा कुणाला मेळ नाही' ही लोकनाट्ये. 'पांढऱ्यावर काळे' हा ललित लेखांचा संग्रह. 'पुढचे पाऊल', 'सांगत्ये ऐका', 'मानिनी', 'रंगपंचमी', 'धाकटी जाऊ', इ. चित्रपटकथा.

'गावाकडील गोष्टी', 'काळी आई', 'घरदार', 'जांभळाचे दिवस', 'बनगरवाडी', 'सती', या पुस्तकांना राज्य सरकारची पारितोषिके. 'बनगरवाडी' इंग्रजीतून अनुवादित. नॅशनल बुक ट्रस्टने या कादंबरीचा इतर भारतीय भाषांतून अनुवाद केला. शिवाय अनेक कथांचा भारतीय भाषांतून अनुवाद.

सोलापूर जिल्ह्यातील साहित्य संमेलनाच्या मंगळवेढे येथील अधिवेशनाचे अध्यक्ष. 1955 मध्ये आकाशवाणी पुणे केंद्रावर ग्रामीण कार्यक्रमाचे संयोजक. 1955 मध्ये ग्रामीण कार्यक्रमाचे शिक्षण घेण्यासाठी ऑस्ट्रेलियाचा दौरा. 1969 मध्ये फ्रान्स व स्वित्झर्लंडचा प्रवास. कथा लेखनाव्यतिरिक्त व्यक्तीचित्रे, कादंबरी, नाटक, लोकनाट्य, आत्मकथा, प्रवासवर्णने, वन्यजीवनपर आणि इतर ललितगद्य कसदार लेखन; वैशिष्ट्यपूर्ण अनुवाद. जनस्थान तसेच इतर अनेक पुरस्कारांनी सन्मानित.

**पुरुषोत्तम भास्कर भावे :** (12 एप्रिल 1910 - 1980)

जन्म धुळे येथे. बी.ए., एलएल.बी. 1941 - 1948 पर्यंत 'आदेश' ह्या पत्राचे संपादन. वर्तमानपत्रात राजकीय, सामाजिक व वाङ्मयीन विषयांवर लेखन. पुणे येथे भरलेल्या मराठी साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष (1977). याशिवाय नगर येथे भरलेल्या (1964) मराठी नाट्य सम्मेलनाचे अध्यक्ष.

1931 मध्ये किर्लोस्कर मासिकात त्यांची पहिली कथा 'फुकट' ही प्रसिद्ध. तेव्हापासून सतत कथालेखन करीत आले. त्यांची कथा वाचकांना झपाटून टाकते. 'पहिला पाऊस', 'स्वप्न', 'सतरावे वर्ष', 'मुक्ती', 'घ्या', 'बंगला', 'रूप', 'सावल्या', 'देव्हारा', 'कुमांड', 'तपस्वी', 'सात मजले', 'नौका', 'रंगमंच', 'वैरी', इ. सुमारे 27 कथासंग्रह प्रसिद्ध. याशिवाय 'अकुलिना', 'वर्षाव', 'अंतराळ', 'रोहिणी', 'आगराणी', 'रखमाच्या मुली' इत्यादी कादंबऱ्या; 'विषकन्या', 'स्वामिनी', 'पडछाया', 'सौभाग्य', ही नाटके; 'रक्त आणि अश्रू', 'वाघनखे', 'लवंगवेलदोडे', 'मुद्रा' हे लेखसंग्रह असे विपुल साहित्य प्रसिद्ध आहे. विशिष्ट ध्येयासाठी लेखणी व वाणी योजणारे श्रेष्ठ लेखक.

**महादेवशास्त्री जोशी :** (12 जानेवारी 1906 – मे 1992)

गोमंतकातील आंबेडे ह्या गावी जन्म. संस्कृत साहित्य, व्याकरण, काव्यशास्त्र, ज्योतिष यांचा पारंपरिक पद्धतीने अभ्यास. 1935 पासून पुण्यात पुराणे-प्रवचने करीत.

'राण्यांचे बंड' या पहिल्या कथेने (1934) लक्ष वेधून घेतले. 'वेलविस्तार' (1941), 'खडकातले पाझर' (1948), 'विराणी' (1950), 'घररिघी' (1955) इ. महत्त्वाचे कथासंग्रह. गोमंतकीय जीवनाचा वेध घेणारे मराठीतील ज्येष्ठ कथालेखक.

विविध भारतीय भाषांतील व परभाषांतील भारतीय संस्कृतिविषयक ग्रंथांचा अभ्यास करून त्यांनी दशखंडात्मक भारतीय संस्कृतिकोश सिद्ध केला. याशिवाय भारतातील विविध प्रदेश, तीर्थक्षेत्रे, लोककथा, थोर व्यक्ती यांच्या विषयी छोटी मोठी पुस्तके लिहिली आहेत.

**दत्तराम मारुती मिरासदार :** (14 एप्रिल 1927)

जन्म सोलापूर जिल्ह्यात अकलूज येथे. शिक्षण अकलूज, पंढरपूर व पुणे येथे.

एम.ए., बी.टी. या दोन पदव्या मिळवल्यानंतर मराठीचे अध्यापन. तत्पूर्वी वृत्तपत्रीय संपादन व माध्यमिक शिक्षक.

मराठीतील ग्रामीण विनोदी कथेला नवा घाट देणारा पहिला कथासंग्रह, 'बापाची पेंड', त्यानंतर 'भुताचा जन्म', 'ताजवा', 'हुबेहूब', 'चुटक्याच्या गोष्टी', 'गफलत', 'विरंगुळा', 'चकाट्या', 'स्पर्श', 'गप्पागोष्टी', 'भोजनभाऊ माकडमेवा' व 'हसणावळ' इ. कथासंग्रह; 'सुट्टी आणि इतर एकांकिका', 'गाणारा मुलूख' ही नाटिका, 'सरमिसळ'हा विनोदी लेखसंग्रह इ. साहित्य उपलब्ध आहे. 'मिरासदारी' हा निवडक कथांचा संग्रह. महाराष्ट्रात कथाकथन करून लोकप्रियता मिळविली आहे. 71 व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, तसेच 1998 साली महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्षपद.

**शंकर पाटील :** (8 ऑगस्ट 1926 – 18 ऑक्टोबर 1998)

हातकणंगले (जि. कोल्हापूर) तालुक्यातील पट्टनकोडोली येथे. कोल्हापूर येथे शिक्षण. बी.ए. (ऑनर्स), बी.टी. नंतर अध्यापन. आकाशवाणीच्या पुणे केंद्रावर स्क्रिप्ट रायटर कम् प्रोड्यूसर म्हणून नेमणूक झाल्यावर नभोवाणी शेतकरी मंडळाचे काम पाहिले. 1959 मध्ये एशिया फाऊंडेशन स्कॉलरशिप (कॅलिफोर्निया) साठी लेखक म्हणून निवड. एका गावाचा व लोकजीवनाचा अभ्यास करून 'टारफुला' (1964) ही कादंबरी लिहिली. 1960 ते 1968 पर्यंत ललित लेखनावर चरितार्थ चालवता आला पाहिजे असा जिद्दीचा प्रयत्न यशस्वी. 1969 पासून महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती आणि संशोधन मंडळाचे विद्या सचिव म्हणून काम पाहिले.

महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर 'कथाकथन' करून अफाट लोकप्रियता मिळविणाऱ्या पाटलांचा कथासंग्रह 'वळीव' 1958 मध्ये प्रसिद्ध झाला. नंतर 'भेटीगाठी' (1960), 'आभाळ' (1961), 'धिंड' (1962), 'ऊन' (1963), 'खुळ्याची चावडी' (1964), 'पाहुणी' (1964), 'बावरी शेंग' (1963), 'खेळखंडोबा' (1974), 'फक्कड गोष्टी' (1973), 'ताजमहालचे सरपंच' (1977), इ. संग्रह एका मागोमाग आले. 'वळीव' ते 'ऊन' पर्यंत प्रत्येक संग्रहाला उत्तम कथासंग्रह म्हणून महाराष्ट्र राज्याचे पारितोषिक.

'गल्ली ते दिल्ली', 'कथा अकलेच्या कांद्याची', 'लवंगी मिरची कोल्हापूरची', इ. वग–नाट्ये अतिशय लोकप्रिय ठरली. 'वावटळ', 'गणगौळण'. 'पिंजरा', 'केला इशारा जाताजाता', 'एक गाव बारा भानगडी', 'डोंगरची मैना', 'छंद प्रीतीचा', 'अशीच एक रात्र होती', 'ही नार रूप सुंदरी', 'पाहुणी', 'भोळी भाबडी', इ. कितीतरी चित्रपटांच्या पटकथा व संवाद लेखन.

कथा साहित्य, चित्रपट, तमाशा, नाटक इ. सर्व क्षेत्रातील; त्यांच्या कर्तृत्वाचा गौरव म्हणून शासनाच्या वेगवेगळ्या समित्यांचे सदस्यत्व.

**विजया मंगेश राजाध्यक्ष** : (5 ऑगस्ट 1933)

शालेय व महाविद्यालयीन शिक्षण कोल्हापूर येथे. एम.ए. नंतर मराठीचे अध्यापन. 1951 पासून त्यांनी कथालेखनाला आरंभ केला. त्यांचे 'टिंबे' (1965), 'अधांतर' (1965), 'विदेही' (1978), 'अनोळखी' (1973), 'लेडिंग', (1976), 'उघडमीट' (1978), 'पारंब्या' (1976), 'कमान' (1978), 'अकल्पित' (1979) हे कथासंग्रह प्रसिद्ध झाले. त्यांच्या 'अधांतर' व 'विदेही' या संग्रहांना शासकीय पुरस्कार प्राप्त. साहित्य अकादमी पुरस्काराने सन्मानित. 'कवितारती' या टीकालेखांच्या संग्रहात 'महानोर', 'ढसाळ', 'अनिल' इ. कवींच्या काव्याचा परामर्श. 'कदंब' (1979) हा त्यांचा अलीकडील ललित लेखांचा संग्रह. मर्ढेकरांच्या कवितेवर त्यांनी पीएच.डी. साठी लिहिलेला प्रबंध सर्वमान्य. 74 व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद (2001). मराठीतील अग्रेसर कथा लेखिका.

**कमल देसाई** : (1928)

शिक्षण सांगली व धारवाड येथे. मराठी व इंग्रजी हे विषय घेऊन एम.ए. ची पदवी. बी.ए., एम.ए. या दोन्ही परीक्षांत सुवर्णपदक मिळवण्याचा बहुमान. 1956 मध्ये शासकीय महाविद्यालय, अहमदाबाद येथे मराठीच्या प्राध्यापिका. त्यानंतर गोखले कॉलेज, कोल्हापूर, विवेकानंद संस्थेचे महाविद्यालय, मिरज येथे अध्यापन. सध्या भिवंडी येथील कला व वाणिज्य महाविद्यालयात मराठीच्या प्राध्यापिका.

'रंग' (1962) या पहिल्याच कथासंग्रहातील वेगळ्या वळणाच्या कथेने लक्ष वेधून घेतले. 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग', 'काळा सूर्य व हॅट घालणारी बाई' या कादंबरिका. आघाडीच्या कथा लेखिका.

**जी.ए. कुलकर्णी** : (10 जुलै 1923 – 11 सप्टेंबर 1987)

जन्म आणि शिक्षण बेळगाव येथे. 1946 पासून निरनिराळ्या महाविद्यालयांतून इंग्रजीचे अध्यापन.

पहिला कथासंग्रह 'निळा सावळा' 1959 साली प्रकाशित. त्यानंतर 'पारवा' (1960), 'हिरवे रावे' (1962), 'रक्तचंदन' (1966), आणि 'काजळमाया' (1972), 'सांजशकुन' (१९७५), 'रमलखुणा' (1975), 'पिंगळावेळ' (1977) असे संग्रह प्रसिद्ध झाले. 'निळासावळा' आणि 'रक्तचंदन' या दोन संग्रहांस महाराष्ट्र शासनाची पारितोषिके. शिवाय 'रक्तचंदन' या संग्रहाला 'ललित मासिका' तर्फे पुरस्कार मिळाला. साहित्य अकादमीने 1973 मध्ये 'काजळमाया' या संग्रहाला मराठी भाषेतील सर्वोत्कृष्ट कृती म्हणून दिलेले पारितोषिक त्यांनी परत केले.

'रान', 'शिवार', इत्यादी कॉनरॉड रिक्टरच्या कादंबऱ्यांचे अनुवाद. 'अमृतफळे', 'सोन्याचे मडके' यांसारखे अनुवाद. 'मुग्धाची रंगीत गोष्ट' व 'बखर बिम्मची' हे

बालसाहित्य. डोहकाळीमा हा त्यांच्या निवडक कथांचा संग्रह श्री. म. द. हातकणंगलेकर ह्यांनी संपादित केला. 'नियतीदान' हा त्यांचा निवडक कथांचा हिंदी अनुवाद.

जी.ए. माणसा-माणसांमधील भावबंधनाचे विलक्षण सामर्थ्याने दर्शन घडवितात. नियतीच्या विळख्यात गवसलेल्या व्यक्तीच्या आणि व्यक्तिसमूहांच्या वेदनांना वृत्तिगांभीर्याने गोचर करू शकणारा वेगळ्या वळणाचा कथालेखक.

**बाबूराव रामचंद्र बागूल** : (17 जुलै 1930)

जन्म नाशिकचा. तेथेच प्रारंभीचे शिक्षण. नंतर दादर विद्या मंदिर, मुंबई येथे एस.एस.सी. लेखनावर जगण्याची धडपड. 'आम्ही' मासिक संपादित केले पण लवकरच बंद पडले. वेगवेगळ्या नियतकालिकांतून लेखन. 'जेव्हा मी जात चोरली होती' या कथासंग्रहापाठोपाठ 'मरण स्वस्त होत आहे' हा 1969 मध्ये प्रसिद्ध झालेल्या कथासंग्रहाला महाराष्ट्र सरकारचे पारितोषिक. 'सूड' ही कादंबरिका, तसेच नियतकालिकांतून 'कोंडी', 'सरदार', 'भूमिहीन', 'पावश्या', 'मूकनायक', 'पाषाण', इ. कादंबऱ्या प्रसिद्ध. दलित साहित्यासंबंधी व दलितांच्या समस्यांविषयी वैचारिक लेखन. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तकनिर्मिती आणि संशोधन संस्थेच्या मराठी भाषेच्या अभ्यासक्रम समितीचे सदस्य होते. दलित साहित्य व दलितांची चळवळ यांचा स्वतंत्र विचार करणारे अभ्यासक.